# कालिदासाची सृष्टी

वागर्थाविव संपृक्तौ वागर्थः प्रतिपत्तये ॥
जगतः पितरौ वंदे, पार्वतीपरमेश्वरौ ॥ १ ॥

लेखक
प्रा. मा. दा. आळतेकर

किंमत ५ रुपये

मी अगदीं लहान वयाचा असतांना

जे दिवंगत झाले

त्या परमपूज्य तीर्थरूपांच्या

स्मरणार्थ

# प्रस्तावना

हा ग्रंथ लिहिण्याला सुरवात कित्येक वर्षांपूर्वी केली. तो पुरा होऊन वाचकांच्या हातीं देण्याचा योग आला ही समाधानाची गोष्ट आहे. कालिदास आणि त्याचें वाङ्मय यासंबंधी कित्येक ग्रंथ प्रस्तुत निबंधाची रूपरेषा मी आंखल्यावर प्रसिद्ध झाले. प्रो. मिराशी, कविवर्य रह्वाळकर, रा. रा. केशव लक्ष्मण ओगले, रा. रा. केशव अप्पा पाध्ये वगैरे विद्वान् रसिकांनीं निरनिराळ्या दृष्टींनीं या विषयावर लिहिलेलीं पुस्तकें प्रसिद्ध झाल्यामुळें कालिदासासंबंधीं विवेचनांत बहुमोल भर पडलेली आहे. माझा प्रयत्न कांहींसा निराळ्या प्रकारचा आणि या महाकवीचा राष्ट्रीय कवि म्हणून विशेषतः परिचय करून देण्यासाठीं आहे.

मी माझ्या ग्रंथांच्या प्रकाशनासाठीं जी योजना केली आहे तिच्यांतील हा पहिला ग्रंथ होय. या योजनेंत माझ्या पूर्वी नियतकालिकांतून प्रसिद्ध झालेल्या दोन कादंबऱ्यांचा आणि निबंध, गोष्टी, कविता वगैरे असलेल्या एका ग्रंथाचा समावेश केलेला आहे. या योजनेला ज्या कित्येक मित्रांनीं आगाऊ पाठिंबा दिला त्यांचे येथें आभार मानणें युक्त आहे. हें पुस्तक प्रसिद्ध होण्यास माझ्या अपेक्षेबाहेर कालावधि लागला याबद्दल त्यांनीं मला क्षमा करावी.

पुस्तकांत कोठें कोठें अशुद्धें राहून गेलीं आहेत त्याबद्दल सखेद निर्देश येथें करणें अवश्य आहे. छपाईचें काम कर्नाटक छापखान्यांत झालें व तें अगदीं आपुलकीच्या भावनेनें करून दिल्याबद्दल छापखान्याचे मालक रा. रा. मंगेशराव कुळकर्णी यांचे मी मनःपूर्वक आभार मानतों. मुद्रितें वाचण्याच्या कामांत रा. श्री. सी. पुरोहित यांच्या झालेल्या साहाय्याचाहि कृतज्ञतापूर्वक उल्लेख केला पाहिजे.

संपूर्ण ग्रंथांत विवेचनाच्या विशिष्ट पद्धतीमुळें कांहीं प्रसंगीं द्विरुक्ति झालेली आहे; ती टाळली असती तर विवेचनांत त्या त्या ठिकाणीं अपुरेपणा आला असता. तेव्हां स्पष्ट अर्थबोध होण्यासाठीं हा दोष पतकरणें भाग पडलें. अनुक्रमणिकेंत विषयांचें विस्तारानें दिग्दर्शन केलें असल्यामुळें सूची देण्याचें रहित केलें.

विल्हे पार्ले,
२५-१०-३७

माधव दामोदर अळतेकर

# अनुक्रमणिका

**प्रो. माधव दामोदर अळतेकर यांचे प्रसिद्ध होणारे ग्रंथ**

# प्रकाशनाची योजना

## आगाऊ ग्राहकांस विशेष सवलत

यासंबंधीं पूर्वी प्रसिद्ध केलेल्या माहितीपत्रकांतील पृष्ठसंख्या आणि किंमती यांच्यांत, कागदाची किंमत वाढल्यामुळें, थोडाफार फेरफार करावा लागला आहे, व कागदाची किंमत आणखी वाढल्यास किंमती थोड्याशा वाढविणें भाग पडेल. पण या प्रकाशनयोजनेचे पांच रुपये भरून आगाऊ ग्राहक होणारांच्या बाबतींत वाढलेल्या किंमतीचा बोजा त्यांच्यावर पडूं नये असें ठरविलें आहे. म्हणजे पुढील सर्व पुस्तकें त्यांना वीस रुपयांतच मिळतील.

पुढील ग्रंथ क्रमाक्रमानें प्रसिद्ध व्हावयाचे आहेत; क्रमांत फेरबदल झाल्यास त्याची सूचना आगाऊ देण्यांत येईल. ज्यांच्या पाठीमागें× अशी खूण आहे त्यांची उंची कापडी बांधणी केली आहे. त्याखेरीज इतर पुस्तकांना कापडी बांधणी पाहिजे असल्यास प्रतीमागें चार आणे अधिक द्यावे लागतील.

× १ **कालिदासाची सृष्टि**—कालिदासाच्या काव्यनाटकांचें अपूर्व विवेचन. ग्रंथकर्त्यानें अगदीं नवीन दृष्टीनें कालीदासीय वाङ्मयाचें आलोचन या विस्तृत निबंधांत केलेलें आहे. किंमत रुपये २।.

× २ **पानें व फुलें**—ग्रंथकर्त्याच्या कांहीं प्रकाशित व कांहीं अप्रकाशित कविता, निबंध, गोष्टी वगैरेंचा संग्रह. किं. रु. २.

× ३ **ज्ञानेश्वर**—विवेचनात्मक निबंध. किंमत रु. २.

× ४ **हिंदी अर्थशास्त्र**—या विषयावर सांगोपांग माहितीनें भरलेला आणि अगदीं आधुनिक पद्धतीनें लिहिलेला ग्रंथ. किंमत रु. ३.

× ५ **मराठी वाङ्मयाचा संक्षिप्त इतिहास**—किंमत रु. ३.

६ **अपराध कोणाचा?** ग्रंथकर्त्याची ही पहिली कादंबरी. पूर्वी "उद्यान" मासिकांत क्रमशः प्रसिद्ध झाली होती. हिचा विषय सामाजिक असून आकर्षक आहे. किंमत रु. १.

× ७ **मराठी साहित्यशास्त्र**—किंमत रु. ३.

८ **ललिता**—ही कादंबरी "नवयुग" .मासिकांत प्रसिद्ध झालेली होती. किंमत रु. १–८–०.

९ **विपर्यास**—सामाजिक विषयावरील अगदीं आजच्या काळची नवीन पद्धतीनें लिहिलेली कादंबरी. किंमत रु. २.

× १० **कौंट मॉंटे क्रिस्टो**—या अद्भुतरम्य फ्रेंच कादंबरीचें सुरस भाषांतर. दोन भाग; किंमत प्रत्येकीं रु. ३॥

या सर्व पुस्तकांची किंमत रु. २६–१२–० होते. हीं सर्व पुस्तकें घेण्याचें अभिवचन देऊन प्रारंभीं निदान पांच रुपये पाठविणारास तीं वीस रुपयांस मिळतील. टपालखर्चाचा निराळा बोजा पडणार नाहीं. पहिलीं तीन पुस्तकें ग्राहकांच्या हातांत पडल्यावर आणखी निदान पांच रुपये मागण्यांत येतील. ज्या कोणाची इच्छा पांचाहून अधिक किंवा सर्व रक्कम एकदम पाठवावयाची असेल त्यांना तसें करतां येईल. या वर्गणीदारांना प्रो. अळतेकरांची मुक्तबंध आणि नवें मानसशास्त्र व नवी नीति हीं पुस्तकें पाऊणपट किंमतीस मिळतील. मात्र त्याबद्दल टपालखर्च निराळा पडेल.

योजनेसंबंधीं सर्व पत्रव्यवहार पुढील पत्त्यावर करावा :—

**प्रो. माधव दामोदर अळतेकर,**
प्रभावती निवास, पार्क रोड
व्हिले-पार्ले
( बी. बी. ॲंड सी. आय्. रेल्वे )
( मुंबई २४ )

# कालिदासाची सृष्टि

## भाग पहिला

### विषयप्रवेश

पुरा कवीनां गणनाप्रसंगे
कनिष्ठिकाधिष्ठितकालिदासा।
अद्यापि तत्तुल्यकवेरभावा-
दनामिका सार्थवती बभूव ॥

१. कालिदासाच्या कविकुलगुरुत्वाबद्दल कोठेंही दोन मतें नाहींत. प्राचीन पंडित आणि अर्वाचीन टीकाकार, या दोघांनाही जगाच्या महाकविमंडळांत कालिदासाचें स्थान फार उच्च आहे हें मान्य आहे. संस्कृत काव्यमर्मज्ञ आणि युरोपीय वाङ्मयप्रवीण या दोघांनींही कालिदासाची मुक्तकंठानें प्रशंसा केलेली आहे. वरील सुभाषितांत वर्णन केल्याप्रमाणें, कोणी एक रसिक मनुष्य उत्कृष्ट कवींची गणना करूं लागला, तेव्हां कालिदासाचें नांव घेऊन त्यानें पहिलें बोट (करांगुलि) मोजलें आणि दुसरें बोट मोजण्यासाठीं जेव्हां कालिदासाच्या तोलाचें दुसरें नांव तो शोधूं लागला तेव्हां तें त्याला मिळेना; म्हणून करांगुलीजवळच्या बोटाला अनामिका हें यथार्थ नांव मिळालें; अशी कवीनें या सुभाषितांत "अनामिका" या नांवावर कोटी केलेली आहे. तिजवरून संस्कृत वाङ्मयांत कालिदासाची मान्यता केवढी मोठी आहे हें सहज लक्षांत येतें. दुसऱ्या एका कवीनें कालिदासाला "कविकुलगुरु" ही पदवी बहाल करून त्याला कविताकामिनीचा विलास असें म्हटलें आहे. कालिदासाच्या शहाणपणाच्या शेंकडों आख्यायिका प्रसिद्ध आहेत; आणि त्यांवरून त्याच्या भाषाप्रभुत्वाबद्दल व साहित्यनैपुण्याबद्दल लोकांत किती कौतुक होतें हें स्पष्ट दिसतें. त्याच्या घरच्या दासीसुद्धां मोठमोठ्या पंडितांना वादांत हरवीत आणि विद्येंत लाजवीत असें

म्हणतात. अशा प्रकारच्या कथांत अतिशयोक्ति जरी निःसंशय आहे तरी तीवरून सामान्य लोकांतसुद्धां या महाकवीबद्दल केवढा आदर होता हें दिसून येतें. या असल्या दंतकथांमधून कालिदासाचें जें वर्णन आलेलें आहे त्यावरून त्याची विलक्षण लोकप्रियता व्यक्त होते. त्याच्या वास्तविक गुणवैभवाची खरी कल्पना येण्यास अर्थात् अशा दंतकथांवर न विसंबतां त्यानें निर्माण केलेल्या अद्भुत काव्यसृष्टींतच संचार केला पाहिजे. कवि हे शब्दसृष्टीचे ईश्वर आहेत हें सुप्रसिद्ध आहे आणि त्या सृष्टीच्या प्रत्यक्ष दर्शनाशिवाय आणि तिच्या अंतरंगाचा निकट परिचय झाल्याशिवाय त्यांच्या निर्माणशक्तीचें यथार्थ आकलन होणार नाहीं.

२. हिंदुस्थानांत कालिदासाची कीर्ति आसेतुहिमाचल पसरली आहे त्याचप्रमाणें पाश्चिमात्य देशांतही ती सर्वत्र पसरून राहिली आहे हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. ज्या युरोपीय पंडितांनीं कालिदासाचें महाकवित्व मान्य केलें आहे, त्यपैकीं बहुतेकांनीं त्याचे ग्रंथ भाषांतररूप असे वाचले आहेत. ज्या वेळीं दोन समाजांत संस्कृति, धर्म, चालीरीती आणि सांसारिक व पारमार्थिक दृष्टि हीं अगदीं भिन्न असतात आणि या दोन समाजांत प्रचलित असणाऱ्या भाषा निरनिराळ्या असतात तेव्हां भाषांतर करण्याचें काम अतिशय अवघड होऊन बसतें. एकाद्या फ्रेंच ग्रंथाचें इंग्रजींत भाषांतर करणें हें काम एकाद्या इराणी ग्रंथाचें जर्मन भाषेंत भाषांतर करण्यापेक्षां पुष्कळ सोपें असावें यांत नवल नाहीं. एकाद्या हिंदी ग्रंथाचें मराठींत किंवा गुजराथींत भाषांतर करणें जितकें सोपें आहे तितकेंच फ्रेंच अगर जर्मन ग्रंथाचें यांपैकीं एकाद्या भाषेंत भाषांतर करणें हें काम कठीण आहे. अशा परिस्थितींत संस्कृत ग्रंथांचें केलेलें भाषांतर वाचूनच यूरोपीय पंडित कालिदासाच्या कवित्वाला मान तुकवतात यावरून कालिदासाचें स्थान अतिशय श्रेष्ठ कविमंडळांत आहे, आणि त्याच्या उज्ज्वल प्रतिभेमुळें कोणत्याही काळीं व कोणत्याही स्थळीं आल्हाद व सामर्थ्य हीं उत्पन्न होतात, हें सिद्ध होतें. कोणतीही कला म्हटली म्हणजे तींत कलावंताचें अंतःकरण प्रकट झालेलें असतें, किंबहुना आसमंतांतील सृष्टीकडे पाहून तिचा त्याच्या अंतःकरणावर उमटलेला ठसा कलारूपानें प्रकट होत असतो. आणि अशा प्रकारें पदार्थ किंवा विचार व्यक्त करण्याची शक्ति विश्वाचा प्रांत ज्या प्रमाणांत व्याप्त करते त्या प्रमाणांत तिचा (याच शक्तीला प्रतिभा म्हणतात) प्रभाव हा दिक् आणि काल यांना तुच्छ लेखतो. तो कवि किंवा कलावंत आपला काल व देश यांचें स्वरूप व्यक्त करीत नाहीं

असा मात्र याचा अर्थ नव्हे. तर तो येवढंच करून थांबत नाहीं; त्याची करामत याहीपेक्षां पुढची असते. आणि ही पुढची करामत, दिक्कालातीत निर्मितीची करामत, ज्या मानानें अधिक त्या मानानें कवित्वगुणामुळें कीर्तिमंदिराच्या शिखरावर स्थानापन्न झालेल्या महाकवींत प्रविष्ट होण्याची पात्रता त्याच्या आंगीं येत असते. कवीची अर्थव्यक्ति ही विश्वाला जसजशी अधिक व्यापते तसतसा विश्वकवि या पदवीला तो अधिकाधिक पात्र होतो. आणि विश्वकवित्वाच्या सन्मानाचें भूषण ज्यांनीं प्राप्त करून घेतलें ते कवि सर्व काळीं व सर्व देशांत मान्य होतात. म्हणून आम्ही शेक्सपीयरचें कौतुक करतों आणि आंग्ल पंडित कालिदासाचें गौरव करितात.

३. कालिदासाची कविता कोणत्याही देशांत आणि कोणत्याही काळांत आल्हाददायक होते; आणि माणसांच्या अंतरंगांतील अगदीं सूक्ष्म स्थानांचा ठाव काढून स्थूल दृष्टीला गूढ असे त्यांतील अगम्य भाग प्रकट करण्याची शक्ति तिच्यांत आहे, हा सिद्धांत आतां सर्वमान्य झालेला आहे. शाकुंतल नाटकांतील चौथ्या अंकांत महर्षि कण्वाचें त्यानें रेखाटलेलें चित्र पाहून गटेसारखा प्रतिभाशाली कवि हर्षानें नाचला. महर्षि कण्वानें आपलें शरीर आणि मन हीं पूर्णपणें जिंकिलीं होतीं. तो जितेंद्रिय होता. तरी सुद्धां या चौथ्या अंकांत त्याचें मनुष्यपण (अमानुष असें त्याचें जितेंद्रियत्व होतें तरी) आणि त्या मनुष्यपणाची खूण म्हणजे प्रियजनांविषयीं प्रेम हीं जोरानें वर उसळून आलेलीं आपण पाहतों. या चित्रांत कालिदासाच्या काव्यकलेची परम सीमा झाली आहे असें रसिक टीकाकारांचें मत आहे. मनुष्य कितीही थोर असो, त्याचे विचार कितीही उच्च असोत, त्याचें वर्तन कितीही उदासीन असो, त्यामुळें मानवी अंतःकरणांतील भावनांना तो अगदीं पारखा होईल हें संभवनीय नाहीं. ब्राम्ही स्थितीप्रत पोंचलेला निवृत्तिनाथ ज्ञानेश्वराच्या समाधिप्रसंगीं धाय धाय रडूं लागला असें नामदेवानें वर्णन केलें आहे. त्याच्यासारख्या परमज्ञानी, परमहंसवृत्तीच्या महंताला आपल्या लाडक्या भावाचा वियोग सोसवला नाहीं. फ्रेंच कथाकार आलेक्झांद्र ड्यूमा याच्या "मांते क्रिस्तोंचा कौंत" या कादंबरींत असें वर्णन केलें आहे कीं त्या कौंतनें आपली अंतःकरणवृत्ति पार बदलून टाकिली होती आणि सामान्यपणें माणसाला दुष्कर असा कठिणपणा तींत त्यानें आणला होता. पण ज्या वेळीं यौवनदशेंतील प्रणयकथा त्याच्या दृष्टीपुढें उभी राहिली तेव्हां अंतःकरणाचा सगळा कठीणपणा

मावळून तो सामान्य माणसाच्या भूमिकेवर येऊन आदळला—कां या 'सामान्य माणसाच्या भूमिकेला खऱ्या माणुसकीची म्हणून स्वर्गीय भूमिका म्हणावें? महर्षि कण्वानें शारीरिक इच्छा आणि मोह यांना पार जिंकून टाकिलें होतें; परंतु ज्या सुकुमार बालिकेला केवळ दयार्द्र भावानें त्यानें सांभाळिली आणि लहानाची मोठी केली तिच्याबद्दल अंत:करणांत उत्पन्न झालेला प्रेमातिशय त्यालाहि जिंकतां आला नाहीं. अशा प्रकारें मनुष्यस्वभावाचें हें वास्तविक स्वरूप पाहून आपणांस आपल्या भौतिक भूमिकेचा विसर पडतो आणि प्रत्यक्ष स्वर्गलोकांतील उच्च शिखरावर आपण आरूढ होतों. स्वर्गाचा अहंभाव नष्ट होऊन त्यालाही पृथ्वी धन्य वाटावी अशी पृथ्वी निर्माण करणारा कवि भेटला म्हणजे त्यानें सत्य व्यक्त केलें आहे हें तर आपल्याला पटतेंच पण त्याबरोबर दया आणि श्रद्धा यांचाही प्रादुर्भाव आपल्या ठिकाणीं होतो. मनोरम संस्कृत भाषेंत अशा प्रकारची अर्थव्यक्ति करून कालिदासानें भरतखंडांत तर मोठा लौकिक मिळविला आहेच, पण त्याच्या सुंदर काव्यांचीं भाषांतरें वाचून परदेशांतील काव्यमार्मिकांना आणि मानवी जातीबद्दल श्रद्धा व दया असणाऱ्या सत्पुरुषांनाही मोठा विस्मय व आनंद वाटला.

४. इतर बहुतेक संस्कृत कवींप्रमाणेंच कालिदास ज्या काळांत झाला, त्यासंबंधीं निश्चित आणि विश्वसनीय माहिती उपलब्ध नाहीं. त्याच्या ग्रंथांतील अंतर्गत प्रमाणावरून त्याचा काळ ठरविण्याचा प्रयत्न पुष्कळ विद्वानांनीं केला आहे आणि तो ठरवितांना इतर ग्रंथांत आलेले उल्लेखहि त्यांनीं विचारांत घेतलेले आहेत हें सांगावयास नकोच. अशा प्रयत्नांत वरचेवर असें होतें कीं युरोपीय पंडित संस्कृत कवींचा काळ शक्य तेवढा अलीकडे आणून ठेवितात, आणि कित्येक हिंदी पंडित आघात-प्रत्याघात न्यायानें तो शक्य तेवढा मागें ओढतात. कालिदासाच्या बाबतींत असेंच झालें आहे. कित्येकांनीं त्याला इसवी सनाच्या चवथ्या किंवा पांचव्या शतकांत आणून सोडला आहे तर दुसऱ्या कित्येकांनीं त्याला ख्रिस्तापूर्वी सहाव्या किंवा सातव्या शतकापर्यंत नेऊन पोहोंचविला आहे. ख्रिस्तानंतरच्या शतकांत कालिदास झालेला नसून तो ख्रिस्तापूर्वीच्या कोणत्या तरी शतकांत झाला असावा असें मानण्यास आतां पुष्कळ अंतर्गत पुरावा मिळालेला आहे. आणि बऱ्याच तज्ज्ञ विद्वानांच्या मताप्रमाणें ख्रिस्तापूर्वीच्या चवथ्या शतकापूर्वी तो झाला असेल हें संभवनीय नाहीं. म्हणजे ख्रिस्तापूर्वी तिसऱ्या किंवा चौथ्या शतकांत तो झाला असावा. प्रस्तुत निबंधांत कालनिर्णयाच्या अव-

घड विषयांत शिरण्याचें प्रयोजन नाहीं. कालिदासाच्या कालनिर्णयासंबंधीं जें संशोधन झालेलें आहे त्याची ज्यांना माहिती पाहिजे असेल त्यांनीं तत्संबंधीं प्रसिद्ध झालेले निबंध वाचले पाहिजेत. काव्यचर्चा करतांना, विशेषेंकरून ज्याची कीर्ति दिक्कालातीन आहे अशा कवीच्या काव्याची चर्चा करतांना, तो कोणत्या शतकांत झाला किंवा तो कोणत्या ठिकाणीं रहात असे या गोष्टी जरी महत्त्वाच्या आहेत तरी त्याच्या काव्यांतील गुण आणि त्याच्या काव्यांतून प्रतीत होणारा ध्वनि यांचें महत्त्व निःसंशय फार अधिक आहे. कवीची काव्यरचना बरोबर समजण्याला त्याच्या काळाची माहिती असणें हें अर्थात् आवश्यक आहे. कालिदासासंबंधीं निश्चित माहिती कांहीं मिळत नाहीं ही मोठ्या खेदाची गोष्ट आहे. ज्यावेळीं आर्यसंस्कृतींतील अत्युत्तम कल्पना नष्टप्राय झाल्या नव्हत्या अशा काळांत तो होऊन गेला असें अनुमान करण्यास हरकत नाहीं. वर्तमानकालीन माणसांना स्फूर्ति मिळावी यासाठीं भूतकाळाचीं उज्ज्वल चित्रें त्यानें रंगविलीं असें म्हणतां येईल; किंवा वर्तमानकालीन उदात्त प्रसंगांचें वर्णन करून पुढें येणाऱ्या पिढ्यांना मार्ग दाखविण्याचा प्रयत्न त्यानें केला असेंही म्हणतां येईल. कसेंही असलें तरी, ज्या उज्ज्वल कल्पनांचा व विचारांचा पुरस्कार आपल्या ग्रंथांतून त्यानें केलेला आहे आणि जीं मनोरम स्वभावचित्रें त्यानें रंगविलीं आहेत त्यांवरून वर्तमानकाळाहून अत्यंत भिन्न अशा भूतकाळाचें वर्णन तो करीत आहे असें वाटत नाहीं. शंभर वर्षांहून अधिक काल पाश्चिमात्य कल्पनांचा परिचय झाल्यावरसुद्धां कालिदासानें रेखाटलेलें आर्य संस्कृतीचें अथवा हिंदु संस्कृतीचें स्वरूप आज आपण जर पाहिलें तर उज्ज्वल आणि स्फूर्तिदायक दिसतें; आणि जर त्यानें वर्णिलेल्या संस्कृतीचा आपण स्वीकार केला तर आमच्या समाजव्यवस्थेंतील दूषित स्थलें नाहींशीं होऊन तो समाज पुनः जोमदार व कर्तृत्ववान् होईल असें खात्रीपूर्वक वाटूं लागतें आणि अशा प्रकारें समाजाची सुधारणा चालू असतांना, ही सुधारणा आमच्याच महाकवीच्या कल्पनांना अनुसरून असल्यामुळें, परकीयांचें अनुकरण केल्यामुळें स्वाभिमानहानि होण्याचें जें भय वाटत असतें तेंही येथें उत्पन्न होण्याचा संभव नाहीं. कालिदासानें ग्रंथरचना केल्यापासून जगांत पुष्कळ फेरफार झालेले आहेत, म्हणजे जगांतील रूढि व आचार हीं पुष्कळ बदललेलीं आहेत. परंतु ज्या ज्या प्रवृत्तींना कालस्थलानुरूप रूढि व आचार यांचें रूप प्राप्त होत असतें त्या मानवी स्वभावाच्या मूलतत्त्वांत आणि गुणावगुणांत अगदीं विलक्षण असा फेरफार बहुधा होत नसतो. या प्रवृत्तींना आणि

गुणावगुणांना वेळोवेळीं नवीन नांवें मिळत असतील तथापि त्यांच्या मूळ प्रकृतींत क्वचितच फेरफार होत असतो. ज्यावेळीं युरोप खंडांत अद्भुत रसाची आवड होती तेव्हां मराठींत ज्याला दाक्षिण्य ( Chivalry ) असें नांव देतां येईल त्या गुणाच्या मुळांशीं तरी "जे निर्बल आहेत त्यांचें संरक्षण करणें आणि जेथें सौंदर्य आहे तेथें कौतुकानें पूजन करणें" याच भावना होत्या. या जुन्या काळच्या शब्दाला प्रस्तुतच्या व्यवहारांत-ज्यांत स्त्रियांची परिस्थिति बदललेली आहे— पूर्वीचें स्थान नाहीं. परंतु अशक्ताचें संरक्षण करण्याची प्रवृत्ति निरनिराळ्या सामाजिक सुधारणांच्या चळवळींत दृष्टीस पडते आणि सौंदर्याची उपासना ही पूर्वीप्रमाणेंच सर्वत्र सरसहा चाललेली आहे. किंबहुना दुर्बलसंरक्षण व सौंदर्य-पूजन यांचा पूर्वीचा संकुचित प्रांत आतां फार विस्तृत झालेला आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. राजसत्ता जाऊन पुष्कळ ठिकाणीं लोकसत्ता आली आणि जर्मनी, इटली, रशिया वगैरे देशांत लोकसत्तेचीं सूत्रें अनियंत्रित व्यक्तींच्या हातीं गेलेलीं आहेत. परंतु सत्तेचा दुरुपयोग होऊं नये म्हणून राजसत्तेच्या काळांत जेवढी धामधूम चालत असे तितकी किंबहुना त्याहून अधिक धामधूम जेथें लोक-सत्ता आहे तेथेंही चालली आहे असें आपण पाहतों. याचें कारण उघड आहे. माणसांना जें पाहिजे तें तात्त्विक राजसत्तेंत किंवा लोकसत्तेंत नसून जिच्यांत बल व दृढता आहे पण जिचा दुरुपयोग होणार नाहीं अशा सत्तेंत समाविष्ट झालेलें आहे. सत्तेचा योग्य उपयोग होऊन त्यामुळें सर्वांचें कल्याण व्हावें अशी प्रत्येक मनुष्याला इच्छा असते. अशा प्रकारें वस्तूंचें बाह्य स्वरूप जरी पालटलें तरी त्यांचा मूळ स्वभाव हा स्थिर असल्यामुळें भूत आणि वर्तमान यांची या स्वभा-वाच्या आधारावर एकरूपता होते आणि त्याचमुळें भूतकाळचे धागे वर्तमानका-ळांत आणि त्याचे धागे पुनः भविष्यकाळांत गुंतलेले असतात.

५. कवि हे शब्दांचे आणि विचारांचे ईश्वर असतात; या दोहोंचा संबंध परस्परांशीं इतका निगडित आहे कीं त्यामुळें त्यांची ताटातूट करणें अनर्था-वह असतें. अर्थ उत्तम असूनही भाषेच्या दारिद्र्यामुळें किंवा प्रयोजकतेच्या अभावामुळें त्याची हानि होते. आणि भाषेची ठेवण आकर्षक असून जर तींत भरलेला अर्थ अनर्थकारी असला किंवा पंगु असला तर विधवा स्त्रीच्या श्रृंगाराप्रमाणें त्या भाषासरणीचा थाट व्यर्थ वाटतो. भाषासरणीचें सौंदर्य किंवा अशाच प्रकारचे दुसरे शब्द आपण उपयोगांत आणतों त्यांवरून शब्दांच्या

विशिष्ट रचनेंतून विशिष्ट सौंदर्य प्रकट होत असतें हें सिद्ध होतें. तसेंच त्या सौंदर्याला रसिकग्राह्य रूप चढण्याला त्याच्या ठिकाणीं उत्कृष्ट अर्थाचें अधिष्ठान पाहिजे हेंही उघड आहे. कालिदासाचें या बाबतींतील तत्त्व रघुवंशाच्या प्रारंभींच्या वंदनपर श्लोकांत ग्रथित झालें आहे. या श्लोकांत पार्वतीपरमेश्वराचें वंदन केलें आहे. पार्वतीपरमेश्वराचें वर्णन कुमारसंभव काव्यांत कवीनें किती रसाळपणानें केलेलें आहे आणि पार्वतीचें सौंदर्य व शंकराचें जितेंद्रियत्व वर्णन करतांना कवीची वाणी सरसतेच्या अत्युच्च शिखरावर कशी आरूढ झाली आहे हें त्या काव्याच्या रसिक व मार्मिक वाचकांस सांगावयास नकोच. त्याच पार्वती-परमेश्वराला काव्यारंभीं वंदन करतांना कवि म्हणतो:—

वागर्थाविव संपृक्तौ वागर्थप्रतिपत्तये ।
जगतः पितरौ वंदे पार्वतीपरमेश्वरौ ॥

वाक् आणि अर्थ यांच्या निकट संबंधाला कवीनें पार्वतीपरमेश्वराच्या निकट संबंधाची उपमा दिली आहे. पार्वतीपरमेश्वर बाह्यतः दोन असले तरी वस्तुतः जसे एकरूप आहेत त्याप्रमाणें वाणी व अर्थ यांचा प्रकार आहे आणि म्हणून काव्यांत वाणीच्या ठिकाणीं, शब्दांच्या ठिकाणीं, पार्वतीप्रमाणें सौंदर्य व मनोहारित्व पाहिजे आणि भगवान् शंकराप्रमाणें विचारगांभीर्य पाहिजे हा सिद्धांत कवीनें ध्वनित केला आहे. आणि वागर्थप्रतिपत्तीचें हें गूढ लक्षांत घेऊन कवि पार्वतीपरमेश्वरांना वंदन करून हेंच मागतो कीं आपल्या काव्यांत सुंदर शब्दरचना आणि हृदयंगम अर्थवैपुल्य यांची एकरूपता असावी. कालिदासाच्या काव्यजान्हवींत ज्यांनीं यथेच्छ विहार केलेला आहे त्या सर्वांच्या मतें कवीनें या श्लोकांत प्रकट केलेली आकांक्षा फार उत्तम प्रकारें सफल झालेली आहे. संस्कृत टीकाकारांनीं काव्याचे दोन प्रकार वर्णिले आहेत. एका प्रकाराला त्यांनीं द्राक्षारसपाकाची उपमा दिली आहे तर दुसऱ्या प्रकाराला नारिकेलरसपाकाची उपमा दिलेली आहे. द्राक्ष तोंडांत घालतांच विरघळतें, परंतु नारळांतील खोबरें मिळण्यापूर्वी तो फोडावा लागतो. पहिल्या प्रकारच्या कवितेंत तिच्या सामान्य अर्थाचें ग्रहण ताबडतोब होतें व दुसऱ्या प्रकारांत फोड केल्याशिवाय तें होत नाहीं. अर्थात् काव्यांतील ध्वनि हा दोन्ही प्रकारांत केवळ रसिकगम्य आहे व प्रसादगुणयुक्त काव्यांतही म्हणजे वर सांगितलेल्यांपैकीं पहिल्या प्रकारच्या काव्यांतही ध्वनि असेल तरच तें उत्कृष्ट होईल.

केवळ सुबोधता म्हणजे सौंदर्य नव्हे हें उघड आहे. कालिदासाचें काव्य प्रसाद-गुणयुक्त आहे आणि म्हणून तें द्राक्षारसपाक या प्रकारांत येतें. द्राक्षांत माधुर्या-शिवाय पुष्टिदायकताही असते त्याचप्रमाणें कालिदासाच्या काव्यांत ध्वनिरूपानें पुष्टिदायक विचारांचीही रेलचेल आहे. त्याच्या कवितासेवनानें आनंद तर होतोच पण त्याचबरोबर तेजस्विता व सद्भावना याहि आंगीं बाणतात.

६. कालिदासाच्या नांवावर तीन नाटकें, दोन महाकाव्यें, एक खंडकाव्य आणि वर्षांतील निरनिराळ्या ऋतूंच्या वर्णनपर कवितांचा एक संग्रह इतके ग्रंथ प्रसिद्ध आहेत. ऋतुसंहार हें काव्य कालिदासानेंच लिहिलें असावें किंवा नाहीं याबद्दल कित्येकांनीं संशय प्रकट केलेला आहे. कसेंहि असलें तरी, कालिदासानें वर्णन केलेल्या स्वभावचित्रांचा आणि त्यानें रेखाटलेल्या कल्पनांचा व ध्येयपूर्ण सिद्धांताचा विचार करितां या ऋतुसंहार काव्याचा विशेष परामर्श घेण्याचा प्रसंग येत नाहीं. सुप्रसिद्ध मेघदूत हें कालिदासाचें खंडकाव्य होय. हें काव्य म्हणजे कवीच्या प्रतिभेची एक अत्यंत मनोहर प्रतिमा आहे. त्याची रचना नितांतमधुर असून मनुष्याचें अंतःकरण हालवून सोडण्याचा विशेष गुण त्याच्यांत आहे. कित्ये-कांच्या मतें मेघदूत हें कालिदासाचें अत्युत्कृष्ट काव्य आहे; आणि त्याचें हें येव-ढेंच काव्य जरी अस्तित्वांत राहिलें असतें तरी जगांतील महाकवींत त्याचें उच्च-स्थान अढळ राहिलें असतें असें ते म्हणतात. रघुवंश आणि कुमारसंभव हीं दोन त्याचीं महाकाव्यें होत. रघुवंश हें कालिदासाच्या काव्यांत सर्व प्रकारें पूर्णतेला पोहोंचलेलें काव्य आहे. त्यांतील भाषासरणी आणि अर्थ हीं दोन्हीही फार उत्कृष्ट आहेत आणि त्यामुळें अखिल काव्यग्रंथांत त्याचें स्थान अतिशय उन्नत आहे. रघुवंशाच्या मानानें कुमारसंभवाच्या भाषाशैलींत किंचित् कृत्रिमता दिसून येते आणि त्यांतील पुढील सर्ग कित्येक टीकाकारांच्या मतें कालिदासानें लिहिलेले नसावेत. नवव्या सर्गापासून या काव्याची गुणमत्ता कमी होत चालल्याचें दिसतें किंबहुना पहिल्या सात सर्गांच्या मानानें भाषासरणी, ध्वनित विचार आणि काव्य-सौंदर्य या बाबतींत आठवा सर्गहि फिका वाटतो हें कबूल करणें प्राप्त आहे. सुप्र-सिद्ध टीकाकार मल्लीनाथ याची टीका फक्त पहिल्या सात सर्गांचीच उपलब्ध आहे. कुमारसंभवाच्या बाकीच्या सर्गांवर मल्लीनाथानें एक तर टीका लिहिली नसावी किंवा ती लिहिली असल्यास उपलब्ध झालेली नसावी. पण ती लिहिलेली अस-ल्यास तिची अनुपलब्धि संभवनीय वाटत नाहीं. कारण रघुवंश, मेघदूत वगैरे-

वरील मल्लीनाथी टीका हिंदुस्थानांत सर्व प्रांतांत मिळाल्या आहेत. तेव्हां कुमारसंभवाच्या पुढील सर्गांवर जर त्यानें टीका लिहिली असती तर ती कोठें ना कोठेंतरी सांपडल्याशिवाय राहती ना. अशा परिस्थितींत त्यानें फक्त सात सर्गांवर टीका लिहिली असें मानण्याकडे विद्वानांचा अधिक कल आहे. मल्लीनाथाची टीका सात सर्गांपलीकडे नाहीं आणि आठव्या सर्गापासून कुमारसंभवाचें काव्यसौंदर्य कमी झालेलें दिसतें. या कारणांमुळें आठव्या सर्गापासून पुढचें काव्य कालिदासानें लिहिलेलें नसून तें कोणी तरी दुसऱ्या कवीनें त्याच्या भाषासरणीचें अनुकरण करून लिहिलें असावें या उपपत्तीला कारण मिळतें. शिवाय दुसरी एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे. कालिदासाच्या काव्यांत अर्थांतरन्यास हा अलंकार वरचेवर येतो. रघुवंशांत व कुमारसंभवाच्या पहिल्या सात सर्गांत साधारणपणें चार पांच श्लोकांत हा अलंकार एकदां तरी येतोच. परंतु कुमारसंभवाच्या आठव्या सर्गापासून हा अलंकार याप्रमाणें वरचेवर पहावयास न मिळतां अगदीं प्रसंगवशात् आढळतो. कोणत्याही कवीचीं सर्वच काव्यें अत्युत्तम असतात असें नाहीं. त्याचीं कांहीं काव्यें अत्युत्तम असतील तर कांहीं मध्यम प्रतीचीं असतील. परंतु वर्णनपर काव्यांत पहिला भाग अत्युत्तम साधला आहे आणि पुढचा भाग बराच सामान्य आहे असें फार वेळां घडत नाहीं. या सर्व गोष्टी लक्षांत घेतल्यावर कुमारसंभवांतील सातव्या सर्गापुढील भाग कालिदासानें लिहिला असण्याचा संभव जरी अगदीं नाहींसा झाला नाहीं तरी बराच कमी होतो असें म्हणणें प्राप्त होतें. प्रस्तुत ग्रंथांत कुमारसंभवाच्या पहिल्या सात सर्गांचाच उपयोग केलेला आहे.

७. कालिदासानें लिहिलेलीं तीन नाटकें प्रसिद्ध आहेत त्यांपैकीं अभिज्ञान शाकुंतल हें अत्युत्कृष्ट आहे. त्याच्या मानानें मालविकाग्निमित्र व विक्रमोर्वशीय हीं नाटकें एकंदरींत सामान्य वाटतात. अर्थात् शाकुंतलाशीं तुलना न केली तर या नाटकांना अगदीं सामान्यांत गणण्याचें धाडस कोणी करणार नाहीं; आणि त्यांना संस्कृत वाङ्मयांत बरेंच चांगलें स्थान मिळेल यांत शंका नाहीं. विक्रमोर्वशीयांतील राजाच्या विरहावस्थेचें वर्णन वाचून पुष्कळांनीं माना डोलावल्या आहेत. राजा अग्निमित्र आणि मालविका यांच्या प्रणयकथेंतील युक्त्याप्रयुक्त्या वाचून गंमत वाटल्यावांचून रहात नाहीं. दोन्ही नाटकांत कालिदासाची भाषाशैली स्पष्टपणें दिसून येते. पण शाकुंतल हें नाटक फारच निराळ्या प्रकारचें आहे. त्यांतील वस्तु ही क्षुद्र किंवा संकुचित नाहीं; स्वभाववर्णनें हृदयंगम आहेत.

तारुण्यानें मुसमुसलेल्या, अंतःकरणानें निर्दोष, परंतु व्यवहाराच्या लबाडीचें ज्ञान नसलेल्या अशा एका मुलीची ती कथा आहे. या मुलीचा त्याग तिचा पति करतो आणि अशा प्रकारें बालिकेच्या कथेंतून पत्नीची कहाणी निष्पन्न होते, व शेवटीं तीच बालिका व पत्नी पुत्रवती होऊन त्या पुत्राच्या आनंदांत त्याच्या पित्याला आपण केलेल्या किंवा कालिदासानें वर्णन केल्याप्रमाणें आपल्या हातून घडलेल्या अपराधाची क्षमा मागणें न्याय्य वाटतें व ही माता ती क्षमा करून संसाराची विस्कटलेली घडी पुनः नीट करते; आणि अशा प्रकारें बालिकेच्या कथेचें आणि पत्नीच्या कहाणीचें पर्यवसान मातेच्या कथानकांत, मातेच्या गौरवांत होतें. याप्रमाणें स्त्रीच्या या तीन अवस्थांचें मोहक आणि कुतूहलकारक चित्र या एकाच नाटकांत रंगविण्याचें मोठें अवघड कार्य कवीनें मोठ्या चातुर्यानें पार पाडलेलें आहे. आणि त्यावरून कालिदासाचा कवित्वप्रभाव आपणांला पटतो. या नाटकाचीं भाषांतरें युरोपीय भाषांत झाल्यावर पाश्चिमात्य देशांत कालिदासाचें नांव मान्यतेच्या शिखराला पोहोंचलें. प्रस्तुत ग्रंथांत कालिदासाच्या नाटकांपैकीं शाकुंतलाचाच उपयोग बहुतेक केलेला आहे. अशा प्रकारें या निबंधाला मुख्यत्वें-करून आधारभूत असे कालिदासीय ग्रंथ म्हणजे शाकुंतल नाटक व रघुवंश आणि कुमारसंभव हीं काव्यें हे होत. इतर ग्रंथांचा उल्लेख केवळ प्रसंगवशात् केलेला आहे. अर्थात् मेघदूत हें खंडकाव्य कालिदासविषयक निबंधांत कोणीही विसरणें शक्य नाहीं.

शाकुंतल नाटकानें जगांतील अत्युत्तम नाटकांत उच्च स्थान मिळविलेलें आहे ही गोष्ट खरी; पण कालिदासाच्या कवित्वशक्तीचें यथातथ्य अनुमान त्याच्या काव्यग्रंथावरूनच होणें शक्य आहे ही गोष्ट सांगणें आवश्यक आहे. कालिदास व शेक्सपीयर यांची केवळ नाटककार या दृष्टीनें तुलना करून तींत शेक्सपीयरचें स्थान फारच वरचें दिसतें असें कित्येक टीकाकारांनीं म्हटलें आहे. पण कालिदासाच्या कवित्वशक्तीचा सर्वांगीण प्रकर्ष त्याच्या काव्यांत दृष्टीस पडतो म्हणून त्याची योग्यता ठरवितांना केवळ त्याच्या नाटकाकडे पाहून चालणार नाहीं. ज्या प्रकारचें नाटक कालिदासानें लिहिलें आहे त्या प्रकारांत शेक्सपीयरशीं तुलना करूनही तो उन्नतच ठरतो. पण शेक्सपीयरची विविधता व आश्चर्यकारकता हीं कालिदासाच्या काव्यांत आपणांस पहावयास मिळतात हें लक्षांत ठेवलें पाहिजे.

८. कालिदास कोणत्या काळीं झाला, किंवा त्याच्या आयुष्यांत काय काय गोष्टी घडल्या यासंबंधीं विश्वसनीय माहिती उपलब्ध नसल्यामुळें, त्याचें शिक्षण किती झालें होतें, भरतखंडांतील कोणते भाग त्यानें पाहिले होते, आणि त्याचे शिक्षक वगैरे कोण होते यासंबंधीं निश्चितपणें कांहींच सांगतां येत नाहीं. त्याच्या ग्रंथांत मिळणाऱ्या कांहीं अंतर्गत अशा विधानांवरून अशा गोष्टींसंबंधीं कांहीं कल्पना बसवितां येणें शक्य आहे, आणि अशाच कल्पनांवर आपणांला बहुतेक निर्वाह करावा लागतो. उदाहरणार्थ, ज्योतिषशास्त्रविषयक (फलज्योतिष व गणितज्योतिष) उपमा किंवा दृष्टांत कालिदासानें दिलेले आहेत, त्यावरून त्याला आकाशस्थ तारकांच्या गति आणि फलज्योतिष यांची बरोबर माहिती नव्हती असें एका टीकाकारानें म्हटलें आहे. आतां प्रत्येक मनुष्याला प्रत्येक गोष्टीची माहिती असणें शक्य नाहीं; आणि एकाद्या कवीला ज्योतिषशास्त्र किंवा त्रिकोणमिति यांचें ज्ञान नसलें तर त्यामुळें त्याला कमीपणा येतो असें कोणीही म्हणणार नाहीं. शेक्सपीयरच्या एका नाटकांतलें जहाज जेथें बंदरच नाहीं अशा ठिकाणीं येऊन उतरलें आहे. पण उपरोक्त विधान करून कालिदासाचा कमीपणा दाखवावा असा सदर टीकाकाराचाही हेतु नाहीं. पण कधीं कधीं असें होतें कीं प्रत्येक मोठ्या माणसाचे कांहीं अनुयायी किंवा अभिमानी उत्साहानें फार भरून जातात आणि त्याच्या आंगीं नसलेले गुणसुद्धां त्याला चिकटविण्याचा ते प्रयत्न करितात. कालिदासाच्या ग्रंथांतील ज्योतिषविषयक वर्णनावरून त्याचा काल ठरविण्याची खटपट कित्येक विद्वानांनीं केलेली आहे. या टीकाकाराच्या मतें हीं वर्णनेंच बहुतेक ठिकाणीं चुकीचीं असल्यामुळें त्यावरून कालनिर्णयासंबंधीं बांधलेलीं अनुमानेंही चूक असण्याचा बराच संभव आहे आणि या त्याच्या मुद्यांत बरेंच तथ्य आहे हें कबूल केलें पाहिजे. परंतु कालिदासाला ज्या गोष्टी मुळींच माहीत नव्हत्या किंवा माहीत असल्या तरी बिनचूक माहीत नव्हत्या अशा गोष्टी वगळूनसुद्धां त्याच्या ग्रंथांतील अंतर्गत प्रमाणांवरून बरीच माहिती मिळणें शक्य आहे. कालिदासाची जन्मभूमि अमरकंटक, म्हणजे नर्मदा नदीचें उगम-स्थान जेथें आहे तो पहाड आहे, असें कित्येक विद्वानांचें म्हणणें आहे; पण त्याचें जन्मस्थान अमूकच असें निश्चयानें सांगतां येण्याजोगा पुरावा उपलब्ध झालेला नाहीं. पण त्याचा आणि अवंती (उज्जयिनी) नगरीचा संबंध फार निकट होता हें रघुवंश व मेघदूत यांत अवंतीविषयक उल्लेख आलेले आहेत, त्यांवरून सिद्ध होतें. मेघदूतांत वर्णन केलेल्या रस्त्यावर अवंतिका येत नाहीं.

पण मुद्दाम तेथें जाण्याला मेघाला यक्षानें सांगितलें आहे. हिमालय पर्वतांतील प्रदेश व उत्तर हिंदुस्थानांतील प्रदेश यांची कालिदासाला प्रत्यक्ष माहिती चांगली होती असें दिसतें. त्यामुळें तो मूळचा काश्मीरांतील असावा असें अनुमान कित्येकांनीं काढलेलें आहे. दक्षिण हिंदुस्थानांतील प्रसिद्ध स्थळांची त्याला माहिती नसावी असें तरी म्हटलें पाहिजे किंवा आज दक्षिण हिंदुस्थानांत (रामेश्वराव्यतिरिक्त) जीं स्थळें प्रख्यात आहेत त्यांना त्याच्या काळानंतर महत्त्व आलेलें असलें पाहिजे. कांहींही असलें तरी मध्य व उत्तर भरतखंडांत त्याचें वास्तव्य झालेलें असलें पाहिजे असें स्पष्ट दिसतें. कुमारसंभवाच्या सुरवातीला आणि पुढें सहाव्या सर्गांत हिमालयाचें जें वर्णन आहे त्यावरून तें करणारानें हिमालयांतील प्रदेश प्रत्यक्ष पाहिले होते असें स्पष्टपणें वाटतें. कवितांतील कांहीं भाग वाचून काश्मीर व नगाधिराजाच्या अंतरंगांतील अनेक सुंदर प्रदेश यांचें स्मरण, ते ज्यांनीं पाहिले आहेत, अशा वाचकांना, झाल्यावांचून रहात नाहीं. शंकाराच्या विवाहाच्या खटपटीसाठीं सप्तर्षी अरुंधतीसह हिमालयाकडे गेले त्यावेळीं त्या थोर पर्वतराजाची स्तुति करतांना त्यांनीं पुढील मोठें यथार्थ वर्णन केलें—

**मनसः शिखराणां च सदृशी ते समुन्नतिः ।**

[तुझ्या अंतःकरणाची आणि शिखरांची उंची (पक्षीं थोरपणा) ही सारखीच आहे.]

हें वर्णन सर्वकाळ हिमाच्छादित असणारीं हिमालयाचीं गगनभेदी शिखरें ज्यानें प्रत्यक्ष पाहिलीं आहेत त्याखेरीज इतरांना केवळ कल्पनेनें करतां आलें नसतें. समुन्नति शब्दांत केवळ भौतिक उंची येवढाच अर्थ नाहीं तर त्यांत आध्यात्मिक उन्नतीचाही अंतर्भाव होतो. जें चांगलें आहे, कल्याणदायक आहे त्याचा वर्ण शुभ्र समजला आहे आणि म्हणून हिमालयाचें मन आणि शिखर यांच्या तुलनेंत विशेष स्वारस्य आहे. त्याचें मन जसें स्वच्छ होतें, त्यांत किल्मिषाचा लवलेशही नव्हता, त्याप्रमाणें त्याचीं तुंग शिखरें सदासर्वकाळ फेनधवल अशा हिमानें आच्छादिलेलीं होतीं. या आणि अशा प्रकारच्या वर्णनावरून कालिदासाच्या आयुष्यांतील कांहीं भाग तरी हिमालयांतील प्रदेशांत गेला असावा, किंवा तिकडे त्यानें पुष्कळ प्रवास केला असावा असें दिसतें. त्याचप्रमाणें त्यानें पुराण-ग्रंथांचा चांगला अभ्यास केलेला होता आणि शास्त्रांतील मुख्य मुख्य तत्त्वांची व

सिद्धांतांची त्याला माहिती होती. शंकर-पार्वती हीं त्याचीं दैवतें होतीं हें अगदीं उघड आहे. आपल्या पूर्वी झालेल्या नामांकित कवींच्या काव्यांचा अभ्यास त्यानें चांगल्या प्रकारें केलेला होता आणि आपल्या ग्रंथांना विद्वज्जनांची मान्यता मिळावी ही त्याला आकांक्षा होती असें

**आपरितोषाद्विदुषां न साधु मन्ये प्रयोगविज्ञानम्।**

इत्यादि वचनांवरून लक्षांत आल्याशिवाय रहात नाहीं. राजदरबारीं व व्यवहारांत तो चांगला वावरलेला होता. लोकांत प्रचलित असलेल्या दंतकथांवरून तो महापंडित असावा असें दिसतें. तसा तो होता किंवा नाहीं हें सांगतां येणें कठीण आहे. पण त्यानें विद्याभ्यास चांगल्या प्रकारें केलेला होता व आजूबाजूच्या परिस्थितीचें उत्कृष्ट ज्ञान संपादन केलेलं होतें, या गोष्टी त्याच्या ग्रंथवाचनानें मनावर ठसल्याशिवाय रहात नाहींत. त्याच्या कवित्वगुणांबद्दल द्विमत नाहींच; पण तो जगन्नाथपंडितांसारखा पंडित होता किंवा नाहीं या प्रश्नाचा निर्णय उपलब्ध माहितीवरून लागणें सुलभ नाहीं. आर्यसंस्कृतीबद्दल त्याला निश्चित ज्ञान होतें आणि त्यानें काढलेलीं ध्येयात्मक व वस्तुनिदर्शक चित्रें त्याचें अवलोकन व अभिरुचि हीं दाखवितात व तो प्रसन्नात्मा व निश्चयात्मा होता हें सिद्ध करितात.

९. कालिदासाच्या काव्यांत केवळ कल्पनाविलास किंवा अगदीं काल्पनिक कथानक मेघदूताखेरीज इतरत्र दिसून येत नाहीं. त्याचीं महाकाव्यें पुराणग्रंथांच्या आधारावर रचलेलीं आहेत; आणि नाटकेंही तशींच आहेत. तथापि कल्पनेचा विलास प्रकट करण्यासाठीं मूळंची गोष्टसुद्धां निव्वळ काल्पनिक असली पाहिजे अशी आवश्यकता मुळींच नाहीं हें सुप्रसिद्ध आहे. विलायतचा महाकवि शेक्सपीयर यानें आपल्या बहुतेक नाटकांचीं कथानकें बाहेरचीं घेतलेलीं आहेत आणि कित्येक ठिकाणीं तर मूलग्रंथांतील कांहीं वाक्येंच्या वाक्यें जशींच्या तशीं उतरलेलीं आहेत. यावरून शेक्सपीयरची कल्पनाशक्ति उच्च कोटीची नव्हती किंवा त्याच्या ठिकाणीं अद्भुत प्रतिभेचें वास्तव्य नव्हतें असा अर्थ होत नाहीं आणि असा अर्थ होण्याचें कारणही नाहीं. एखादी साधी कथा ही कोरड्या अस्थिपंजराप्रमाणें आहे. त्यांत कल्पनेच्या बळानें जिवंतपणाचें रक्त खेळविणें आणि तो अस्थिपंजर चैतन्यमय करणें यांत तर कवीच्या कौशल्याचें वैशिष्ट्य असतें. आपल्या काव्याला उपयुक्त अशीं कथानकें कालिदासानें पुराणग्रंथांतून घेतलीं आहेत हें खरें; तथापि त्याचा

प्रत्येक ग्रंथ ही त्याचीच स्वतंत्र रचना आहे आणि त्याच्या अद्भुत प्रतिभेचें दर्शन त्याच्या प्रत्येक काव्यांत झाल्याशिवाय रहात नाहीं. त्यानें वर्णन केलेल्या व्यक्ति म्हणजे त्यानें निर्माण केलेल्या सृष्टींतील व्यक्ति आहेत. आणि आपण योजिलेल्या स्वभावपरिपोषाचा परिपाक बिनचूक उतरण्यासाठीं मूळ कथेंत ज्यांना महत्त्व विशेष नाहीं अशा कित्येक गोष्टींत थोडाबहुत फेरफार करण्यालाही तो मागेंपुढें पहात नाहीं. अशा तऱ्हेचीं उदाहारणें त्याच्या ग्रंथांत आपणांस पहावयास मिळतात. अशा तऱ्हेचें स्वातंत्र्य कवीला स्वभावतःच असतें; मात्र या स्वातंत्र्याच्या नावांखालीं काव्यग्रंथांतर्गत किंवा पौराणिक अथवा ऐतिहासिक व्यक्तींच्या सर्वश्रुत स्वभावविशेषांत त्यानें विशेष फरक करतां उपयोगी नाहीं. उदाहरणार्थ, श्रीरामचंद्रानें अनेक स्त्रियांशीं विवाह केला होता असें वर्णन करण्याची मुभा कोणत्याही कवीला नाहीं. परंतु वाल्मीकीनें वर्णन केलेल्या रामचंद्राचें यथार्थ स्वरूप लक्षांत घेऊन मग त्या स्वरूपाला अधिक रमणीयता आणण्यासाठीं वाल्मीकीच्या वर्णनाहून भिन्न असें थोडेंसें वर्णन करण्यास कांहींच हरकत नाहीं. अशा तऱ्हेचे फेरफार जेथें जेथें करावे लागले तेथें तेथें ते कालिदासानें फार सफाईनें केले आहेत. ही सफाई त्याच्या अद्भुत कवित्वाचा एक आल्हादकारक असा महत्त्वाचा भाग आहे. शब्दसृष्टीचा तो ईश्वर होता हें सर्व रसिकांना मान्य आहे. जव्हेरी ज्याप्रमाणें हिऱ्यामाणकांची आणि मोत्यांची कुशल रचना करितो त्याप्रमाणें शब्दांची कुशल रचना करण्याचें सामर्थ्य कालिदासाच्या ठिकाणीं होतें. जव्हेरी जेव्हां हिरे माणिकें एकत्र गुंफून त्यांची कंठी तयार करितो, त्यावेळीं तो हिऱ्यामाणकाहून नवीन असें सौंदर्य निर्माण करतो. त्याचप्रमाणें शब्दरचनेच्या साहाय्यानें नवीन व अधिक सौंदयाची प्रतीति करून देणें हें महाकवीचें कार्य आहे. कालिदासाची भाषावधू मोठी आकर्षक आणि प्रसन्न आहे. पाल्हाळाचा दुर्गुण तिच्यांत बिलकुल नाहीं. अतिशय खोल अर्थ भरलेलीं पण फार थोड्या शब्दांत सांगितलेलीं अशीं सुटसुटीत पण मनोहर वाक्यें लिहिण्याचें कौशल्य त्याच्या ठिकाणीं फार आहे. त्याच्या अप्रस्तुतप्रशंसा आणि अर्थांतरन्यास या अलंकारांच्या माधुर्यानें वाचक एकसारखा तल्लीन होत जातो. प्रसाद म्हणजे अर्थ समजण्यासंबंधानें घोटाळा न होणें (अर्थात् या ठिकाणीं वाचक हा सामान्यतः सुविद्य व रसिक आहे असें गृहीत धरलें पाहिजे.) व हा तर त्याच्या काव्यांतील फारच मोठा गुण आहे. त्याचप्रमाणें संथपणें वहात चाललेल्या त्याच्या काव्यौघांत माधुर्य हा गुण अतिशय आढळतो. संस्कृत टीका-

कारांच्या मतें प्रसाद, माधुर्य व ओज हे मुख्य काव्यगुण आहेत. यांपैकीं प्रसाद व माधुर्य या गुणांत कालिदासाची कविता अप्रतिम आहे. ओज म्हणजे जोरदारपणा व भारदस्तपणा हा गुणहि त्याच्या ठिकाणीं आहे; परंतु ओजस्वी अर्थसुद्धां कठोर शब्दांत घालावयाचा नाहीं हा त्याचा परिपाठ असल्यामुळें हा गुण उपरोक्त दोन गुणांइतका स्थूलदृष्टि वाचकांच्या नजरेंत भरत नाहीं. भवभूतीच्या कवितेंतील हा गुण डोळ्यांत विशेष त्वरित भरतो; पण त्याच्या काव्यांत प्रसाद व माधुर्य हे गुण कालिदासाच्या मानानें कमी वाटतात. एकंदरींत पहातां गुणसंपत्तींत कालिदासाचें स्थान फार उच्च आहे हें स्पष्ट होतें.

१०. कालिदासाच्या ग्रंथांसंबंधीं थोडीशी हकीकत वर दिलेली आहे. त्याच्या दोन महाकाव्यांपैकीं कुमारसंभवाची रचना कालक्रमानें आधीं झालेली असावी असें दिसतें. त्यांतील काव्यवस्तु एकच कथा आहे. रघुवंश हें काव्य एका प्रभावशाली घराण्याचा इतिहास म्हणून लिहिलेलें आहे. या घराण्यांत मोठमोठे पुरुष आणि स्त्रिया होऊन गेल्या. त्यांचीं चित्रें या काव्यांत रेखाटलेलीं आहेत आणि हीं चित्रें जरी निरनिराळीं असलीं तरी त्या प्रत्येकामुळें रघुवंशाची कीर्ति अधिक उज्ज्वल दिसते आणि भिन्न भिन्न प्रकृतीच्या व्यक्तींतसुद्धां कांहीं सामान्य गुणांचा प्रकर्ष प्रतीतीला येतो. या उज्ज्वल गुणसंपदेचें वर्णन कालिदास मोठ्या कौतुकानें करतो--

सोहमाजन्मशुद्धानामाफलोदयकर्मणाम् ।
आसमुद्रक्षितीशानामानाकरथवर्त्मनाम् ॥
यथाविधि हुताग्नीनां यथाकामार्चितार्थिनाम् ।
यथापराधदंडानां यथाकालप्रबोधिनाम् ॥
त्यागाय संभृतार्थानां सत्याय मितभाषिणाम् ।
यशसे विजिगीषूणां प्रजायै गृहमेधिनाम् ॥
शैशवेभ्यस्तविद्यानां यौवने विषयैषिणाम् ।
वार्धके मुनिवृत्तीनां योगेनांते तनुत्यजाम् ॥

अशा रघूंचें वर्णन करण्याचें कालिदासानें ठरविलें. त्याच्या विशाल आणि संपन्न प्रतिभेला योग्य असाच विषय त्याला या थोर वंशानें दिला यांत शंका नाहीं. याप्रमाणें रघुवंशांत आजन्मशुद्ध, फलप्राप्ति होईपर्यंत उद्योग करणारे, समुद्र-

पर्यंत पृथ्वीवर राज्य करणारे व स्वर्गालाही शह देणारे, यथाविधि यज्ञकर्म करून याचकांच्या सर्व इच्छा पूर्ण करणारे इत्यादि गुणांनीं युक्त अशा राजांचें वर्णन आहे; कुमारसंभवांत शिव आणि पार्वती यांचा विवाह व त्यांच्या कीर्तिकेय या पुत्राचा जन्म या मनोरम कथानकावर सुंदर काव्याची उभारणी झालेली आहे. दोन अजिंक्य आणि अद्भुत, तपस्वी आणि पराक्रमी, जितेंद्रिय आणि प्रतापशाली अशा स्त्रीपुरुषांच्या विवाहामुळें अजिंक्य असा वीरपुत्र निर्माण व्हावा या हेतूनें आणि त्या वीरपुत्राच्या हातून असह्य व अनिवार झालेल्या तारकासुराचा निःपात व्हावा म्हणून हा विवाह घडवून आणण्याचा खटाटोप स्वर्गांतील देवांनीं केला होता. कथानकाच्या पार्श्वभूमींत देवांच्या या खटाटोपाची धांदल जरी आपल्या दृष्टीस पडते तरी या काव्यांत शिव आणि पार्वती यांच्या हृदयंगम पण उदात्त प्रणयकथेलाच कवीनें प्राधान्य दिलेलें आहे हें सहज लक्षांत येण्यासारखें आहे. जसजसें हें काव्य आपण वाचीत जातों तसतसा देवांच्या खटाटोपाचा आपणांला विसर पडून केवळ शारीरिक सौंदर्याच्या बळावर शंकराची प्राप्ति होणें शक्य नाहीं असें पटल्यानंतर पार्वती घोर तपश्चर्या करण्याचा निर्धार करते; आणि नगाधिराज हिमालयानें लाडांत वाढविलेल्या कन्येला असुलभ अशा तपोव्रताचा ती अंगीकार करते, आणि शेवटीं आपल्या आध्यात्मिक योग्यतेच्या बलावर, त्या योग्यतेंत शंकराशीं बरोबरी मिळवून, ती त्याची प्राप्ति करून घेते; आणि केवळ शरीरसुखाला तुच्छ लेखणारा शंकर पार्वतीच्या सौंदर्यावरच नव्हे तर तिच्या तपश्चर्येवर व आध्यात्मिक संपदेवर प्रसन्न होऊन तिचा दास बनतो, या हृदयंगम कथेंतच आपलें चित्त रंगून जातें.

या रमणीय प्रणयकथेंत वैवाहिक जीवनाचें तत्त्वज्ञान कालिदासानें गुंफिलेलें आहे; त्याची पुढें यथास्थल चर्चा होईल. पण त्यापूर्वी ज्या समाजाबद्दल कालिदासानें आपल्या काव्यनाटकांतून लिहिलें आहे तो समाज कोणत्या तत्त्वांवर उभारलेला होता; आणि कालिदासाचे ग्रंथ विचारपूर्वक वाचल्यानंतर आणि त्यांतील शब्दांचा संपूर्ण अर्थ लक्षांत घेतल्यानंतर, त्या तत्त्वांचें वास्तविक स्वरूप काय होतें याचा थोडासा विचार करणें आवश्यक आहे. काव्याला काव्यत्व ध्वनीमुळें येतें. हा ध्वनि शब्दांच्या वाच्यार्थामागें दडून बसलेला असतो. तो स्थूल दृष्टीला प्रतीत होत नाहीं. म्हणून उत्कृष्ट काव्याचा संपूर्ण आल्हाद उपभोगण्याचें सामर्थ्य सर्वांच्या ठिकाणीं असतेंच असें नाहीं. कालिदासाच्या काव्यांतील ध्वनि हुडकून

काढण्याचा आपण प्रयत्न केला पाहिजे. आपल्या ग्रंथांत जी समाज-व्यवस्था कालिदासानें वर्णिलेली आहे, ज्या ध्येयात्मक प्रवृत्तींचें चित्र काढलेलें आहे, ज्या प्रत्यक्ष आचारविचारांचें स्वरूप विशद केलेलें आहे, त्यांच्या मुळाशीं कांहीं विशेष तत्त्वें होतीं. पात्रांचें स्वभाववर्णन करतांना त्या तत्त्वांना कालिदासानें प्रत्यक्ष स्वरूप दिलें आहे. अर्थात् हें स्वरूप त्या तत्त्वांना प्रतीत करतें असें जाणूनबुजून वाचकाला तो सांगत नाहीं. कोणताही उत्तम कवि तसें सांगत नसतो. काव्य म्हणजे नीतिपाठाचा धडा नव्हे. या धड्यामध्यें पुष्कळवेळां रुक्षपणा, कोरडेपणा असतो. पण काव्याचा आत्मा रस आहे, म्हणून त्यांत रुक्षपणाला जागा नाहीं. उत्तम कवितेंतून उत्कृष्ट तत्त्वज्ञान निष्पन्न झाल्याचांचून मात्र रहात नाहीं. कालिदासासारख्या महाकवीच्या एकेका चरणावर नीतितत्त्वांनीं भरलेलीं प्रवचनें देतां येतील. कवि सौंदर्याची प्रतीति करून श्रेयाची आवड उत्पन्न करतो; कारण श्रेय आणि सौंदर्य हीं एकरूप आहेत असें सहज-सिद्ध करून देणें यांत तर कवीचें मुख्य कौशल्य आहे. कालिदासानें राजा-प्रजा, गुरु-शिष्य, पिता-पुत्र, ब्राम्हण-क्षत्रिय, ऋषि आणि योद्धे, स्नेही आणि मित्र, पति आणि पत्नी, अशा प्रकारें परिणत समाजांत उत्पन्न होणाऱ्या निरनिराळ्या संबंधाचें वर्णन केलेलें आहे. मुलें, तरुण माणसें, प्रौढ आणि वृद्ध माणसें, स्त्रिया आणि पुरुष, काममुग्ध आणि जितेंद्रिय, भावनावश आणि ज्ञानी अशा सर्वांचीं वर्णनें त्यानें केलेलीं आहेत. आणि तीं वाचून कवीचें अंतःकरण प्रसन्न आणि उदात्त होतें हें तर कळतेंच; पण त्यानें सूचित केलेलीं तत्त्वेंही लक्षांत येतात व योग्य आचरणाचा सरळ मार्ग स्पष्ट दिसूं लागतो.

तेव्हां कालिदासानें निर्माण केलेल्या सृष्टींत प्रवेश करून तींत संसाराच्या निरनिराळ्या परिस्थितींत वावरणाऱ्या लहानथोर स्त्रीपुरुषांचा परिचय करून घेण्याचा आपण प्रयत्न केला पाहिजे. कालिदासाच्या अद्भुत प्रतिभेमुळें त्या सर्वांना चैतन्य प्राप्त झालेलें आहे. कालिदासाच्या या काव्यसृष्टींत एका उदात्त अशा संस्कृतीचें आणि शिक्षणपद्धतीचें निदर्शन करणाऱ्या नमुनेदार व्यक्ति आपणांस भेटतील. आणि ज्या मानववंशांत या व्यक्ति होऊन गेल्या आणि ज्या स्पृहणीय परंपरेचें स्वरूप त्यांचीं चरित्रें वाचून लक्षांत येतें तो मानववंश व ती परंपरा आपल्या देशांत नांदत होती हें समजून या देशाचा भूतकाळ कित्येक अज्ञानी व दुराग्रही माणसें सांगतात तसा दूषणीय नव्हता हेंही आपणांस पटल्या-

वांचून रहाणार नाहीं. ज्या उज्ज्वल भूतकाळाचीं चित्रें कालिदासानें आपल्या ग्रंथांत रंगविलेलीं आहेत, त्याच भूतकाळाच्या पुण्याईनें आपला भविष्यकाळही उज्ज्वल होईल असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्या भूतकाळाची केवळ तांत्रिक नक्कल करण्याची अर्थात् बिलकुल आवश्यकता नाहीं. परंतु त्या काळाच्या उज्ज्वलतेचें रहस्य समजलें म्हणजे भविष्यकालाच्या योग्य उभारणीसाठीं त्या काळीं प्रचलित व मान्य असलेल्या तत्त्वांकडून आपणांस मार्गनिदर्शन झाल्याशिवाय रहाणार नाहीं.

# भाग दुसरा

## सामान्य स्वरूप

तमोगुणविनाशिनी सकलकालमुद्योतिनी
धरातलविहारिणी जडसमाजविद्वेषिणी ।
कलानिधिसहायिनी लसदलोलसौदामिनी
मदंतरवलंबिनी भवतु कापि कादंबिनी ॥

१. कालिदासाच्या ग्रंथांवरूनच त्यानें वर्णन केलेल्या काव्याचें समाजचित्र आपल्या डोळ्यांपुढें दिसतें. त्यांतल्या त्यांत रघुवंशाचा या कामीं फार उपयोग होणारा आहे. या समाजाची रचना कालिदासानें होती तशी घेतलेली आहे; तींत ऐतिहासिक सत्यापलाप त्यानें केलेला नाहीं व कोणताही सत्कवि तो तसा करीत नाहीं. राजाच्या अप्रतिहत सत्तेचें तें युग होतें. ती सत्ता जनकल्याणासाठीं राजांनीं चालवावी अशी शास्त्राज्ञा होती. पण राज्य प्रजासत्ताक नसे. प्रजानुरंजनासाठीं प्रियतम भार्येचा त्याग करणारेही राजे झाले; पण प्रभुत्व राजांचें होतें; प्रजेचें किंवा तिनें निवडून पाठविलेल्या प्रतिनिधींचें नव्हतें. अर्वाचीन काळीं उपलब्ध झालेली जानपदसत्ता तत्कालीन समाजांत सांपडत नाहीं. समाजांत— अर्थात् हा समाज आर्यांचा—ज्यांना सध्यां हिंदु म्हणतात त्यांचा—आहे— चातुर्वर्ण्याचें प्राबल्य होतें; पण त्याबरोबरच आश्रमव्यवस्थेचाही अंमल होता. राजेलोकांत तरी बहुभार्याकत्व होतें आणि एकपत्नीव्रत हा त्यामुळें विशेष सद्गुण समजला जात होता; रामासारख्या अलौकिक पुरुषांतच तो असे; म्हणजे शास्त्र अगर रूढि यांचा पाठिंबा बहुभार्याकत्वाचा होता; पण तें सदोष असून एकपत्नीव्रत हें श्रेष्ठ आहे ही गोष्ट लोकांना पटली होती. तेव्हां अशा प्रकारचे तत्कालीन समाजाचे कांहीं विशेष लक्षांत ठेवून आपण प्रस्तुत विषयाचा विचार केला पाहिजे हें उघड आहे.

रघुवंशांतील राजांचें वर्णन करतांना त्या सर्वांत कांहीं विशिष्ट गुण सामान्यपणानें असावयाचेच असें वर्णन कालिदासानें केलेलें आहे; आणि म्हणूनच या विशिष्ट वंशांतील राजांचें वर्णन करण्याचें आपण ठरविलें असें तो म्हणतो.

काव्याची सुरवात करतांना कवीनें आपला विनय विशेष गौरवानें प्रदर्शित केलेला आहे. कोणीकडे प्रत्यक्ष सूर्यापासून उत्पन्न झालेला रघूंचा वंश आणि कोणीकडे लहानसहान विषयांवर कविता लिहिणारी आपली बुद्धि आणि अशा बुद्धीनें रघूंचें गुणगायन यथार्थ करण्याची हाव धरणें म्हणजे केवळ उंच माणसालाच जें फळ तोडतां येईल तें एखाद्या खुजा माणसानें हात वर करून तोडण्याचा प्रयत्न करण्यासारखें आहे; तेव्हां माझ्यासारख्या मंदानें महाकवीचें यश मिळविण्याची इच्छा धरणें खरोखर धारिष्टाचें आहे, वगैरे सुरवात करून मग कालिदास म्हणतो कीं पूर्वीच्या कवींनीं रघूंचें गायन केलेलेंच आहे; त्यांच्याच अनुरोधानें आपणही प्रयत्न करावा; आणि शिवाय रघूंचे गुण असे कांहीं विशेष कीं त्यांचें वर्णन केल्यावांचून आपणांस राहवेना; त्या गुणांनीं कवीच्या कानांत येऊन सांगितलें कीं आमच्यावर काव्य कर. अशा प्रकारें आपल्याकडे नम्रपणाची भूमिका घेण्यांत कालिदासाचा हेतु उघडपणें हा दिसतो कीं आपण पसंत केलेला विषय किती उत्तम आहे हें स्पष्ट व्हावें. कवीला कोणताही विषय रंगवितां येईल; अर्थात् विषयच श्रेष्ठ व उत्तम असेल तर दुधांत साखर पडल्यासारखें होईल हें सांगावयास नकोच. रघुवंशांतल्या राजांत असामान्य थोर गुण होते म्हणून वर सांगितलें. त्या गुणांचा उल्लेख कवीनें ज्या चार श्लोकांत फार सुंदरपणानें केलेला आहे तो श्लोक पुनः येथें देतों:—

**सोऽहमाजन्मशुद्धानामाफलोदयकर्मणाम् ।**
**आसमुद्रक्षितीशानामानाकरथवर्त्मनाम् ॥**
**यथाविधिहुताग्नीनां यथाकामार्चितार्थिनाम् ।**
**यथापराधदंडानां यथाकालप्रबोधिनाम् ॥**
**त्यागाय संभृतार्थानां सत्याय मितभाषिणाम् ।**
**यशसे विजिगीषूणां प्रजायै गृहमेधिनाम् ॥**
**शैशवेऽभ्यस्तविद्यानां यौवने विषयैषिणाम् ।**
**वार्धके मुनिवृत्तीनां योगेनांते तनुत्यजाम् ॥**
**रघूणामन्वयं वक्ष्ये ॥**

यांत रघूंना दिलेलीं विशेषणें मोठीं आश्चर्यकारक आहेत यांत शंका नाहीं. त्यांत ध्येयात्मक वर्णन आहे; पण हें राजेपणाचें आणि गृहस्थपणाचें ध्येय खरोखर लक्षांत ठेवण्यासारखें आहे व तें काय आहे तें आपण पाहूं.

२. जगांत सर्वच ठिकाणीं जन्मशुद्धीला फार महत्त्व देतात. जन्मशुद्धींत शास्त्रीयदृष्ट्या महत्त्व आहे किंवा नाहीं, नैतिक दृष्ट्या त्या महत्त्वाला मान्यता देणें हें योग्य आहे का अयोग्य आहे, लौकिकांत जें अशुद्ध गणतात तेंच अधिक शुद्ध असतें किंवा नाहीं या प्रचंड प्रश्नमालिकेंत येथें पडण्याचें कारण नाहीं; पण जन्मशुद्धीला महत्त्व जगांत सर्वत्र देतात; आणि वर्णव्यवस्थात्मक समाजांत अर्थात् तिला विशेष मान्यता मिळते या गोष्टी स्पष्ट दिसून येतात. अर्थात् रघूंचें वर्णन करतांना कालिदासानें त्यांच्या शुद्धत्वाचा उल्लेख करावा हें तत्कालीन वस्तुस्थितिनिदर्शक आहे. प्रत्यक्ष सूर्यापासून उत्पन्न झालेला वंश, तेव्हां तो शुद्धिमान् आणि शुद्धिमत्तर असावा यांत आश्चर्य नाहीं. रघुवशांत कामात्मक दुराचरण नव्हतें, असदाचरण नव्हतें हें या विशेषणानें सूचित केलें आहे. कदाचित् सूर्यवंशाचें वर्णन करतांना पांडवांचा सोमवंश व त्यांतील निरनिराळ्या कथा याही कवीच्या स्मरणांत नसतील असें नाहीं. तेव्हां रघुवंशांतले राजे आजन्म शुद्ध होते हें कवि प्रथम सांगतो. ते इतके उद्योगी होते कीं फलप्राप्ति होईपर्यंत उद्योग सोडीत नसत. कर्म या शब्दाचा उद्योग या अर्थी हा प्रयोग लक्ष्यांत ठेवण्यासारखा आहे. फलाचा उदय होईपर्यंत, फल प्रत्यक्ष उत्पन्न होई-पर्यंत, हे राजे आपला कर्ममार्ग सोडीत नसत. अर्थात् राजांची सत्ता समुद्रापर्यंत पसरलेली होती; इतकेंच नव्हे तर त्यांच्या रथांची धाव स्वर्गापर्यंतही गेलेली होती; म्हणजे स्वर्गलोकापर्यंत सत्ता चालविण्याचें सामर्थ्यही त्यांच्यांत होतें. धर्म-शास्त्राला अनुसरून यज्ञ करणें हें त्यावेळीं राजाचें कर्तव्य समजत. त्याप्रमाणें हे राजे अग्नीची उपासना यथाविधि करीत. यथाविधि शब्दांतील मर्म वाचकांच्या सहज लक्षांत येण्यासारखें आहे. यज्ञयाग करणें हें जसें राजाचें कर्तव्य तसें अर्थिजनांना, ज्यांच्याजवळ कांहीं नाहीं पण ज्यांना पाहिजे अशांना दान करणें, देणें, हेंही त्यांचें कर्तव्य असे. हे राजे दातृत्वगुणांत फार उत्कृष्ट होते. कारण ते याचना करणाऱ्यांना यथाकाम संतुष्ट करीत म्हणजे ते मागतील तें त्यांना देत. अर्थात् या ठिकाणीं अतिथीही शहाणे गृहीत धरलेले आहेत; दुर्वासासारखे पुराणग्रंथांत प्रसिद्धीला आलेले धरलेले नाहींत. राजे लोकांचें एक महत्त्वाचें कर्तव्य अपराध करणाऱ्यांना शासन करणें हें आहे; व अपराधानुरूप शासन हे रघुराजे करीत. त्याचप्रमाणें कोणती गोष्ट कोणत्या वेळीं करावी हें त्यांना उत्तम समजे. म्हणजे जें कांहीं करावयाचें तें ते वेळेवर करीत. वेळेवर प्रजेच्या

मागण्यांना मान्यता देणें यांत राजकौशल्य आहे हें उघड आहे. यापुढील विशेषणें मोठीं मार्मिक आहेत. हे राजे द्रव्यसंचय करीत पण तो त्यागासाठीं, वेळेवर द्रव्य दुसऱ्याला देण्यासाठीं करीत. भगवद्गीतेंत संन्यास व त्याग यांतील भेद दर्शवितांना कर्मफल टाकणें म्हणजे त्याग असें सांगितलें आहे. तेव्हां द्रव्यसंपादन हे रघुकुलोत्पन्न राजे उपभोगासाठीं, चैनीसाठीं, लोकांना कंगाल झालेले पहाण्यासाठीं करीत नसत तर त्या द्रव्याचें फल दुसऱ्यांना चाखावयास मिळावें म्हणून करीत असत. ते फार बोलत नसत; बोलण्यांत ते खर्चिक नव्हते, अघळपघळ नव्हते; पण ते जें बोलत तें सत्य बोलत; थापा मारून वेळ मारून नेणें ही नीति त्यांना मान्य नव्हती. ते परमुलखावर स्वारी करीत; पण यश मिळवावें. आपण प्रबल आहोंत हें सिद्ध करावें एवढाच त्यांत त्यांचा हेतु असे. आणि ते गृहमेधी होत, गृहस्थाश्रमी होत, संसारांत पडत, याचें कारण उत्तम संतति निर्माण करावी हा त्यांचा हेतु असे. आपलें बालपण ते विद्याभ्यासांत घालवीत; तारुण्यांत विषयांचा उपभोग ते घेत; म्हातारपणीं ऋषीप्रमाणें वानप्रस्थ व संन्यास या आश्रमांत प्रवेश करून रानावनांत रहात; आणि शेवटीं देहत्यागही योगप्रणीत मार्गानें करीत. या सर्व वर्णनांत अतिशयोक्ति आहे हें उघड आहे. काव्यांत अतिशयोक्ति थोडीशी असतेच आणि त्या अतिशयोक्तीमुळें वर्ण्यविषय विशेष ठळकपणें डोळ्यांपुढें उभा रहातो. तेव्हां अनियंत्रित राजसत्ता असणारे राजे अशा प्रकारचे असतील तर ती सुसह किंबहुना कल्याणदायक होते हें कवीनें ध्वनित केलेलें आहे. या राजेलोकांच्या चरित्रांतील जे ठळक प्रसंग कवीनें वर्णन केलेले आहेत त्यावरून त्यांच्या आंगांतील हे गुण प्रतीत होतात आणि ते प्रतीत करतांना कालिदासानें आपलें कौशल्य उत्कृष्टपणें प्रकट केलें आहे.

**३.** रघुवंश महाकाव्यांत जीं वर्णनें आपण वाचतों त्यांवरून त्या काळच्या समाजांत संयम आणि प्रगति हीं एकत्र नांदत होतीं असें दिसून येतें. आणि समाजरचनेचीं हीं दोन महत्त्वाचीं अंगें आहेत यांत शंका नाहीं. शिस्तीचा अतिरेक झाला कीं प्रगतीचे पाय मोडतात, आणि प्रगतीच्या गतींत बेफामपणा आला कीं समाजांत विस्खलितपणा उत्पन्न होऊन तो विनाशाकडे कलतो. रघुवंशाची सुरवात वैवस्वतापासून झाली खरी, पण या काव्याची सुरवात वैवस्वताच्या वंशांत

जन्माला आलेला राजा दिलीप याच्यापासून झालेली आहे. या दिलीपाचें वर्णन पुढीलप्रमाणें केलेलें आहे :—

> **व्यूढोरस्कोवृषस्कंधः शालप्रांशुर्महाभुजः ।**
> **आत्मकर्मक्षमं देहं क्षात्रो धर्म इवाश्रितः ॥**
> **सर्वातिरिक्तसारेण सर्वतेजोभिभाविना ।**
> **स्थितः सर्वोन्नतेनोर्वीं क्रांत्वा मेरुरिवात्मना ॥**

पुढारीपणाला, राजेपणाला, "सर्वेषां मूर्ध्नि वर्तते" हें वर्णन लागू पडण्याला अंगीं भव्यपणा लागतो. आणि हें तत्त्व लक्षांत ठेवून दिलीपाच्या शरीराचें बाह्य वर्णन या श्लोकांत प्रथम केलें आहे. मोठी छाती, बैलाप्रमाणें खांदे, नारळीच्या झाडाप्रमाणें उंची, हात फार मोठे असलेला (आजानबाहुत्त्व हें पराक्रमी पुरुषाचें लक्षण पूर्वी गणीत), आणि हातीं जीं मोठालीं कार्यें करण्यास घेतलेलीं तीं पेलण्यासारखा त्याचा देह होता; आणि त्या शरीराच्या रूपानें प्रत्यक्ष क्षात्रधर्मच उभा आहे कीं काय असें वाटत असे. लष्करी खात्यांत नौकरी देतांना अशा गोष्टींकडे लक्ष असतें ही गोष्ट सर्वश्रुत आहे. लार्ड रॉबर्टसूसारखा एखादा वामन सेनापति होत नाहीं असें नाहीं. परंतु सामान्य नियम भव्यपणाचा, मजबूत व दुसऱ्यावर छाप पाडील अशा शरीराचा आहे हें विसरून चालणार नाहीं. दिलीपाचें बळ सर्वांहून अधिक होतें. त्याच्या तेजस्वीपणापुढें दुसऱ्यांचें तेज फिकें पडे; आणि सर्व पृथ्वीचें आक्रमण करून मेरु पर्वत जसा सर्वांत उंच म्हणून उभा आहे तसा तो राजा सर्वोन्नत होता. या पुढील श्लोकांत बाह्यवर्णनावरून कवि मोठ्या मजेदार प्रकारें अंतरंगवर्णन करतो :—

> **आकारसदृशप्रज्ञः प्रज्ञया सदृशागमः ।**
> **आगमैः सदृशारंभ आरंभसदृशोदयः ॥**

व्यक्तित्व कसें बनवावें याचें या श्लोकांत थोडक्यांत कथन आहे. सर्व पुरुषार्थाचें साधन जो देह तो उत्तम बनवावा; त्याचा आकार फार रुबाबदार असावा. पण त्या आकाराला योग्य अशी अक्कल नसेल तर त्याची कोण पर्वा करणार? बैल होणें हा कांहीं शरीर कमाविण्याचा हेतु नसतो. माणसाची माणुसकी ही अधिक उन्नत व्हावी हा त्याचा हेतु असतो. दिलीपाचा आकार भव्य होता; त्याची प्रज्ञा म्हणजे बुद्धि त्या आकारासारखीच भव्य होती. आतां कित्येकांना ही

सर्व अनुकूलता असते; उदाहरणार्थ, उत्तम बुद्धि असते, पण त्या बुद्धीचा उपयोग करून विद्याभ्यास केला पाहिजे तो ते करीत नाहींत. दिलीप राजाची बुद्धि मोठी होती आणि त्यानें अभ्यासही पुष्कळ करून विद्या पुष्कळ संपादन केली. विद्या संपादन करून जाड पगाराची नोकरी मिळविण्यांत जन्माची इतिकर्तव्यता मानणाऱ्यांची संख्या आजकाल एवढी मोठी आहे कीं दिलीप राजाला पुढें दिलेलें विशेषण मोठें मार्मिक वाटतें. एवढी विद्या संपादन करून मग त्या विद्येला शोभण्यासारखे उद्योग हातीं घेतले पाहिजेत, तर त्या विद्यासंपादनाचा उपयोग ! दिलीपानें आपल्या "आगमाला सदृश असे आरंभ" केले म्हणजे कार्यें सुरू केलीं; आणि त्या कार्याला फळेंही त्या सुरवातीच्या भव्यपणासारखींच भव्य आलीं. क्षुद्र हेतु धरणें हा गुन्हा आहे, यश न मिळणें हा गुन्हा नाहीं या इंग्रजी म्हणीची येथें आठवण होते. क्षुद्रपणाचा दुर्गुण दिलीपांत किंवा रघुवंशांत यत्किंचितही नव्हता. आणि या दुर्गुणाचा पूर्ण अभाव हें मोठेपणाचें एक अत्यंत महत्त्वाचें लक्षण आहे. खूप मोठी तयारी करून शेवटीं "पोराबाळांना इस्टेट ठेवण्याच्या" आकांक्षेंत आयुष्याचें सार्थक करणारे बहुतेक लोक ज्या समाजांत प्रमुख आणि वरचे म्हणून वावरतात त्या समाजाची प्रगति होणें फार कठीण असतें. असो; दिलीप राजा अशा प्रकारचा होता. त्याची प्रजाही त्याला साजेल अशीच होती. कायद्याच्या बाहेर ती यत्किंचित्‌ही जात नसे. कारण उघडच आहे. त्याचे कायदे जुलूम जबरदस्तीचे नसून केवळ लोककल्याणार्थ होते. राजा कर घेत असे पण त्याच्या सहस्रपटीनें सुखाचा मोबदला देत असे.

> प्रजानामेव भूत्यर्थं स ताभ्यो बलिमग्रहीत् ।
> सहस्रगुणमुत्स्रष्टुमादत्ते हि रसं रविः ॥

केवळ प्रजेच्या कल्याणासाठीं तो त्यांच्याकडून कर घेई. सूर्य समुद्रांतील पाणी वर नेऊन जसें पर्जन्याच्या रूपानें म्हणजे सहस्रपटीनें (आणि खाऱ्या पाण्याचें गोड पाणी करून) परत देतो त्याप्रमाणें तो दिलीप राजा प्रजेला कराच्या सहस्रपटीनें सुख व सुरक्षितताही देत असे. प्रजेचें नियमन, रक्षण आणि भरण तो करीत असे आणि म्हणून तो त्यांचा खरोखर पिता होता. विषयांचा त्याच्यावर अंमल नव्हता. विद्या त्यानें आत्मसात् केल्या होत्या. त्याच्या ठिकाणीं ज्ञानाबरोबर मौन, शक्तीबरोबर क्षमा, त्यागाबरोबर प्रसिद्धीची इच्छा नसणें, अशा प्रकारचे गुण होते;

आणि अशा प्रकारें वयोवृद्ध नसतांनाही तो ज्ञानवृद्ध आणि कार्यवृद्ध अशा प्रकारचा होता. जेव्हां जेव्हां हा राजा स्वारीशिकारीला जाई तेव्हां तेव्हां तेथील लोकांना विशेषतः आश्रमवासी ऋषींना आपल्या परिवारापासून त्रास होऊं नये याची तो विशेष काळजी घेई. शाकुंतल नाटकांतही दुष्यंत कण्वाच्या आश्रमाजवळ गेला तेव्हां त्यानें अशीच काळजी घेतली असें वर्णन आहे. नाहींतर बड्या अधिकाऱ्याची भेट म्हणजे गरीबागुरिबांची कुचंबणा हा प्रकार पुष्कळ वेळां होतो व त्यामुळें अधिकारी-वर्गाबद्दल प्रजेंत असंतोष उत्पन्न होतो. तेव्हां हा राजा जरी सर्वशक्तिमान् होता तरी अत्यंत कृपाळु होता. पीडा देणें म्हणजे आपल्या सत्तेचें प्रदर्शन करणें ही क्षुद्रसुलभ समजूत या थोर राजाची नव्हती. आणि अशा प्रकारें दिलीपाच्या राज्यांत राजाचा लोकांना वचक होता व लोकांचें राजावर प्रेम होतें. उलट पक्षीं लोकांचें कल्याण व्हावें, त्यांना पीडा यत्किंचित्‌ही होऊं नये याबद्दल राजा अत्यंत दक्ष होता.

४. कालिदासानें वर्णन केलेल्या समाजांतील फार लक्षांत ठेवण्यासारखी संस्था म्हणजे वर्णाश्रमाची होय. जे प्रस्तुत काळाच्या पलीकडे विचार करीत नाहींत त्यांना असें वाटतें कीं सध्यां जें जातिभेदाचें स्वरूप हिंदु समाजांत आहे तसेंच सर्व काळीं होतें. जातिभेदाचा इतिहास, विपर्यास व प्रस्तुत स्वरूप यांची चर्चा करण्याचें हें स्थळ नव्हे. पण कालिदासानें वर्णन केलेला आणि भगवद्गी-तेंत सांगितलेला वर्णभेद हा प्रस्तुत अस्तित्वांत असलेल्या व्यवस्थेहून किंवा अव्यवस्थेहून फार निराळा होता एवढें येथें सांगण्यास हरकत नाहीं. सध्यां अस्तित्वांत असलेल्या जातिभेदाचा उल्लेख रामायणाच्या उत्तरकांडांत आहे व त्याचें चित्र रघुवंश सर्ग १५ यांत दिसतें. शूद्र मनुष्य तपश्चर्या करीत होता म्हणजे जें कर्म करण्याचा त्याला अधिकार नव्हता तें कर्म तो करीत होता; त्यामुळें एका ब्राह्मणाचा मुलगा अकालीं मृत्यु पावला; व त्या ब्राह्मणानें तक्रार केली तेव्हां रामानें त्या शूद्राचें शासन केलें अशी ही कथा आहे. दुश्चर तप-श्चर्या देखील स्वमार्गविलंघी असली तर चालत नाहीं असें या शूद्राच्या तपश्चर्ये-बद्दल कालिदासानें म्हटलेलें आहे व येथें जन्मजात जातिभेदाचें दुष्ट स्वरूप दृष्टीला पडतें. पण हा उल्लेख लक्षांत ठेवूनसुद्धां कालिदासानें वर्णन केलेली वर्णाश्रमव्यवस्था प्रस्तुत परिस्थितीहून निराळी आहे व आश्रमाच्या अंतर्भावामुळें सध्यांच्या वर्णव्यवस्थेंत पुष्कळ फरक पडतो हें लक्षांत आल्याशिवाय रहात

नाहीं. वर्ण शब्दाचा अर्थ जाति झाला व सध्यां जाति ही केवळ जन्मावरून ठरते; परंतु जाति ही पूर्वकाळीं जन्मावरून ठरत नसे, कर्मावरून ठरत असे असें मानण्याला पुष्कळ पुरावा उपलब्ध आहे. आश्रम म्हणजे आयुष्यांतील निरनिराळ्या अवस्था. यांतून प्रत्येक माणसाला जावें लागे. या अवस्था नैसर्गिक नव्हत्या तरी नैसर्गिक अवस्थांना अनुसरून त्यांची रचना करण्यांत आली होती; व धर्मशास्त्राप्रमाणें प्रत्येक माणसानें हें अवस्थांतर कर्तव्य म्हणून केलें पाहिजे अशी योजना होती. या अवस्था किंवा हे आश्रम चार आहेत. पहिला आश्रम ब्रह्मचर्याचा, म्हणजे संयमनाचा व विद्यासंपादनाचा; दुसरा आश्रम विवाह करून संसार करण्याचा; तिसरा आश्रम मुलेंबाळें मोठीं होऊन संसारांत पडण्यालायक झालीं म्हणजे सपत्नीक वनांत जाऊन विश्रांति घेण्याचा, वाचनलेखनाचा, अभ्यास व मननिदिध्यासाचा, निवृत्तीच्या तयारीचा; आणि चौथा आश्रम संन्यासाचा; जगाचा संबंध अजीबात सोडून ब्रह्मचिंतन करण्याचा; स्थितप्रज्ञ होऊन, निस्त्रैगुण्य होऊन, स्वार्थाचा यत्किंचित्‌ही लेप न ठेवतां लोककल्याण करण्याचा, किंवा आत्मचिंतनाचा. हे आश्रम क्रमानें येत व त्यांत क्रमभंग सामान्यपणें होऊं नये असा दंडक असे. वर्ण आणि आश्रम यांची जोडी अविभक्त होती आणि त्रैवर्णिकांवर आश्रमग्रहणाची सक्ति होती. आश्रमव्यवस्था न पाळणारे त्रैवर्णिक शूद्र झाले असें समजत. असें सध्यां समजण्याचा शिरस्ता पाडला तरी आपल्या समाजस्थितींत पुष्कळच इष्ट स्थित्यंतर घडून येईल. वर्णांचीं व आश्रमांचीं कर्तव्यें स्पष्टपणें घालून दिलेलीं होतीं व तीं न करणारा केवळ जन्माच्या जोरावर आपली जात मिरवूं शकत नसे. सध्यांच्या परिस्थितींत हीं कर्तव्यें साफ दृष्टीआड झालीं आहेत आणि म्हणून केवळ जन्म ही वर्णाची खूण उरली आहे व आश्रमधर्माचा मागमूसही नाहींसा झालेला आहे. वर्णाश्रमव्यवस्थेचा प्रतिपाळ करण्याचा दंड हातीं घेतलेले परिव्राजकाचार्य सरकारी कचेऱ्यांत जाऊन उत्पन्नांचीं भांडणें खेळत आहेत. असल्या धर्मच्युत धर्माचार्यांच्या आज्ञा कोणी पाळतील हें संभवनीय नाहीं. सध्यां वर्णाश्रमधर्म खरोखर अस्तित्वांत नाहीं. शास्त्रांत नौकरी हें शूद्रकर्म म्हणून सांगितलें आहे. सध्यां तर नौकरीच्या टक्केवारीपायीं ब्राम्हण—ब्राम्हणेतरांचे वाद माजून राहिले आहेत व या वादांत पडणारे सर्वच ब्राम्हण आपल्या नांवाला अपात्र आहेत हें उघड आहे. कालिदासानें वर्णन केलेली वर्णाश्रमव्यवस्था पुष्कळ चांगली दिसते. अर्थात् जातिभेदाला किंवा वर्णभेदाला जे तत्त्वतः

विरुद्ध होतात त्यांचें त्यामुळें मत पालटेल किंवा पालटलें पाहिजे असें त्यावरून सिद्ध होत नाहीं. ज्या वर्णव्यवस्थेचें रूपांतर सध्यांच्या जातिभेदांत होऊं शकतें तिच्यांत कांहींतरी अंतर्गत दोष असले पाहिजेत असें मत प्रतिपादन करणें शक्य आहे. धंद्यावर किंवा कर्मावर वसविलेली जात जन्मावर ठरूं लागणें हें साहजिक आहे आणि असें न व्हावें यासाठीं कांहीं योजना नसेल तर जातिभेदाचे दुष्परिणाम वर्णव्यवस्थेंत बीजरूपानें होते हें कबूल करणें प्राप्त होतें.

कालिदासाच्या वर्णनावरून कर्मव्यवस्था व आश्रमव्यवस्था हीं वर्णभेदाच्या दुष्परिणामाला आळा घालीत होतीं असें दिसतें. मुलगा मोठा होतांच राजत्याग करून वानप्रस्थ घेणारा राजा अत्यंत निर्लोभ व निरहंकार असला पाहिजे हें उघड आहे. असा राजा चैनीसाठीं किंवा लोभासाठीं प्रजेला पीडा देईल हें शक्य नाहीं. तो आपल्या सत्तेपेक्षां कर्तव्याबद्दल अधिक जागरूक राहील. कर्तव्यासाठीं प्राणदान करणाऱ्या राजांचीं सुंदर चित्रें कालिदासाच्या काव्यांत आपणांस पहावयास मिळतात. रघुवंशाच्या पांचव्या सर्गांत असेंच एक सुंदर चित्र आहे. एक ब्राम्हण विद्यार्थी गुरुदक्षिणेची रक्कम मिळविण्याकरितां रघुराजाकडे जातो. राजा एवढा दानशील होता कीं त्याच्याजवळ त्यावेळीं देण्याला कांहीं उरलेलें नव्हतें. पण त्यानें तें धन कुबेरावर स्वारी करून आणावयाचें ठरविलें. हें समजतांच कुबेरानें मोठा सोन्याचा पर्वतच राजाच्या रथापुढें टाकून दिला. तो ब्राम्हण विद्यार्थी लोभी नव्हता; कारण तो खरा ब्राम्हण होता. त्याला तो सुवर्ण पर्वत नको होता; फक्त गुरुदक्षिणेची रक्कम पाहिजे होती. राजाही पूर्ण निर्लोभ; त्यानें तो पर्वत घेऊन जा म्हणून त्या बटूला सांगितलें आणि त्या दोघांच्या निर्लोभीपणाची ती शर्यत पाहून लोक चकित झाले. निर्लोभाचें हें स्वरूप सध्यांच्या काळीं तर अतिशयच मनोहर वाटतें. सध्यां निरनिराळे सट्टे करून गबर होण्याच्या युगांत हें वर्णन खरेंही वाटणार नाहीं. कवीच्या वर्णनांत काल्पनिकपणा असतो हें खरें; पण कल्पनाशक्तिसुद्धां सत्याच्या भोंवतीं घिरट्या घालीत असते हें लक्षांत ठेविलें पाहिजे. ज्या समाजांत रघुराजासारखा निर्लोभ राजा आणि वरतंतु शिष्यासारखा निर्लोभ ब्राह्मण हे होते तो समाज मोठा सुव्यवस्थित व योग्य आधारावर रचलेला होता हें उघड आहे. सध्यां जगांत जी अनवस्था माजली आहे तिच्या मुळाशीं लोभ हा भयंकर दुर्गुण

आहे हें थोड्याशा विचाराअंतीं कोणासही कळण्यासारखें आहे. जगांतील सर्व सोनें आपल्या हातीं असावें म्हणून इंग्लंड, फ्रान्स व अमेरिका यांच्यांत कांहीं कालापूर्वी जी लटपट व खटपट झाली ती पाहिली व या लोकांच्या लोभात्मक व्यवस्थेला संस्कृति हें नांव दिलें म्हणजे कालिदासाचें चित्र निव्वळ कल्पनामय वाटावें यांत नवल नाहीं. सध्यांच्या लोभमूलक व माणुसकी नष्ट झालेल्या काळांत कवींना सुद्धां ही कल्पना करतां यावयाची नाहीं. पण काव्याचा एक हेतु मनुष्याला त्याच्या निकृष्ट परिस्थितींतून काढून त्याला उच्चभूमिकेवर आणणें हा आहे. केवळ भौतिक स्थितींतून त्याला वरच्या वातावरणांत कांहीं काळ नेण्याचें कार्य काव्य करीत असतें. सध्यां जे कोणी विचारी पुरुष आहेत, ज्यांच्या विशुद्ध कल्पनासृष्टींत या जगांत सुख व समाधान नांदत आहेत अशीं चित्रें खेळत आहेत, त्यांना हीं चित्रें प्रत्यक्ष सृष्टींत कशीं येतील व जगाची सध्याच्या दुःस्थितींतून कशी सुटका होईल याची चिंता लागून राहिली आहे. त्यांचा विचार आणि त्यांना पडणारीं सुखस्वप्नें व्यवहारी म्हणून मिरविणाऱ्या मुत्सद्यांना खुळ्यासारखीं वाटतात. आणि मुत्सद्दी व पैशाचे खेळ खेळून आपली तुंबडी भरणारे लफंगे यांना शहाणे समजण्याचा आचरटपणा सर्वत्र बोकाळलेला आहे. पण जगांतील सर्व उत्तम गोष्टी, सर्व आनंद, सर्व प्रगति हीं या मुत्सद्यांमुळें किंवा द्रव्यलोलुप लफंग्यांमुळें निर्माण झालेलीं नाहींत. तीं निर्माण करण्याचें श्रेय आपल्या विशुद्ध प्रतिभेच्या जोरावर जगाला आनंदाचे आणि उत्कर्षाचे विचार सांगणाऱ्या कवींना आणि तत्त्वज्ञांनाच आहे. महाकवि हा कल्पनासृष्टींत वावरतो; पण त्याची कल्पनासृष्टि म्हणजे सत्यसृष्टि कशी सुधारावी याचा नमुना म्हणून निर्मिलेली असते. तो सत्यसृष्टीचा अपलाप करीत नाहीं, तर तिच्यांतील दोष कसे नाहींसे होतील हें ध्वनित करतो. त्याच्या वर्णनानें माणसांना स्फूर्ति प्राप्त होऊन तीं महत्कार्यें करण्याला उद्युक्त होतात; हंसत खेळत भयंकर संकटाशीं टक्कर मारतात; आणि अशक्याला शक्यतेच्या कोटींत आणण्याची हांव बाळगतात. असें कार्य करण्याची स्फूर्ति देणारा तोच राष्ट्रीय कवि आणि तोच विश्वकवि. आपल्या सुंदर वर्णनांच्या साहाय्यानें इष्ट अशा समाजव्यवस्थेचें चित्र तो आपल्या दृष्टीपुढें आणतो. कालिदासानें वर्णन केलेली वर्णाश्रमव्यवस्था त्याचमुळें हृदयंगम वाटते. त्याचें ब्राह्मणाचें चित्र पहा. ब्राह्मण म्हणजे विद्येचा उपासक; कसलेंही भय न असणारा; निर्लोभ म्हणून निर्भीक; शरीरानें बळकट आणि

मनानें खंबीर; त्याचे ब्राह्मण स्वार्थसाधु आणि धर्माचें दुकान घालून पोटाची खळगी भरणारे नाहींत. त्याचे क्षत्रिय पहा; धैर्यशाली आणि सुज्ञ; उद्योगतत्पर आणि पराक्रमी; अनाथांचें रक्षण करणारे आणि दुष्टांना दंड करणारे असे दिसतात. त्याचे बालब्रह्मचारी पाहा; यमनियमांच्या प्रत्यक्ष मूर्ति; वडिलांची आणि गुरूंची आज्ञा पाळणारे पण त्यांच्या दोषांना आविष्कृत करून नाहींसे करणारे; त्यांचें शरीर जसें सुदृढ तसेंच त्यांचें मन निष्पाप; भयानें ते कधीं गांगरत नाहींत. त्यांच्या विशुद्ध अंतःकरणावर पापाचा मल बसूं शकतच नाहीं. दुष्यंत राजाच्या दरबारांत शकुंतलेला अपशब्द बोलणाऱ्या राजाला स्पष्ट शब्दानें ताडन करणारा ऋषिकुमार शार्ङ्गरव पाहिला म्हणजे वाचकाचें अंतःकरण भरून येतें. कालिदासानें काढलेलीं बालब्रम्हचाऱ्यांचीं चित्रें अत्यंत मोहक आहेत; अत्यंत स्फूर्तिदायक आहेत. कालिदासानें गृहस्थाश्रमाचें केलेलें वर्णन असेंच मोठें आकर्षक आहे. या आश्रमांतील स्त्रीपुरुषें स्वाभिमानी, उद्योगतत्पर, योग्य मार्गानें धन मिळविणारीं, यथाशक्ति दुसऱ्यांना साहाय्य करणारीं अशीं दिसतात. तसेंच कालिदासानें वडिल माणसांचीं काढलेलीं चित्रेंही मोठीं लक्षांत ठेवण्यासारखीं आहेत. त्यांना मुलाबाळांचा हेवा वाटत नाहीं; तरुण पिढीकडे ते तिरस्कारानें व मत्सरानें पहात नाहींत; तर प्रेमानें व आदरानें पहातात. ते शहाणपणा शिकवितात पण आपणच शहाणे म्हणून मिरवीत नाहींत. मुलांनीं आपल्याहून शहाणें होणें यांत ते आपल्या वडिलपणाचें सार्थक झालें असें समजतात. कालिदासाच्या काव्यांत वृद्धांचे विवाह होत नाहींत; ते मुलाबाळांच्या संसारांत अडचण करीत नाहींत. ते मुलें मोठीं झालीं कीं वानप्रस्थ होतात. तरुणांना वृद्ध होण्याबद्दल ते आग्रह धरीत नाहींत. निरनिराळ्या ठिकाणीं आलेलीं हीं चित्रें पाहून त्यांचें पूर्ण स्वरूप ध्यानांत येऊन आपलें अंतःकरण उल्हसित होतें; आणि या आश्चर्यकारक सृष्टींतून हिंदुसमाजाचें केव्हां व कसें पतन झालें हा प्रश्न विचारी माणसापुढें उभा राहतो. निदान प्रस्तुत दुःस्थितींतून निघण्याला या सृष्टींत मनमुराद फिरणें हितावह होईल यांत शंका नाहीं.

५. स्त्रियांच्यासंबधीं कालिदासीय वाङ्मयांत कसली परिस्थिति दिसून येते, पुरुषांची व स्त्रियांची वागण्याची पद्धति काय होती, स्त्रिया पुरुषांशीं कशा वागत आणि समाजांत त्यांना काय स्थान होतें या गोष्टी यानंतर पहाण्यासारख्या आहेत. सध्यां हिंदुसमाजांत स्त्रियांना दर्जा काय असावा यासंबंधीं पुष्कळ चर्चा

चालू आहे आणि प्रस्तुत परिस्थितींत पुष्कळ सुधारणा झाली पाहिजे याबद्दल शंका नाहीं. हिंदुस्थानांत किंबहुना सर्व जगांत स्त्रियांची स्थिति कित्येक शतकें फार निकृष्ट गणली होती व पाश्चिमात्य देशांतसुद्धां या स्थितींत बदल गेल्या पन्नास पाउणशें वर्षांतच होण्याला सुरवात झाली. ख्रिस्तीधर्मांत एकपत्नीव्रताची सक्ती आहे ही गोष्ट खरी, पण त्यामुळें ख्रिस्ती राष्ट्रांतील स्त्रियांची स्थिति शंभर वर्षांपूर्वीपर्यंत विशेष स्पृहणीय होती अशांतला अर्थ नाहीं. तेव्हां हिंदुसमाजांत या बाबतींत जी परिस्थिति नांदत आली आहे ती जगाहून फारशी वेगळी होती असें मानण्याचें कारण नाहीं. स्त्रियांना आपली मालमत्ता समजणें, उपभोगाची वस्तु समजणें ही गोष्ट सर्व जगभर रूढ होती. किंबहुना वैयक्तिक स्वातंत्र्य ही गोष्ट जुन्या जगांत मान्य नव्हती त्यामुळें स्त्रियांच्या परिस्थितींत सुधारणा होण्याला पाश्चिमात्य देशांतसुद्धां व्यक्तिस्वातंत्र्याचा उदय अठराव्या शतकाच्या शेवटीं झाल्यावर सुरवात झाली. तेव्हां हिंदुस्थान देशांत या बाबतींत विशेष रानटीपणा होता अशी समजूत करून घेण्याचें कारण दिसत नाहीं. अर्थात् जी गोष्ट वाईट तिला वाईटच म्हटलें पाहिजे; आणि एखादी गोष्ट अन्याय्य असेल तर तिचा प्रतिकार करणें आवश्यक आहे. आणि म्हणून स्त्रियांच्याबद्दल आपली दृष्टि जी दूषित असते ती स्वच्छ होणें अत्यंत आवश्यक आहे. हिंदुसमाजाच्या रचनेंत स्त्रियांना स्थान निकृष्ट आहे अशी आजकाल आमची समजूत आहे आणि जरी सर्व जगांत स्त्रियांची स्थिति जवळ जवळ अशीच होती हें खरें असलें आणि जरी अद्यापिही हिटलरसारखे पाश्चिमात्य स्वातंत्र्यशत्रु स्त्रियांचें काम म्हणजे चूल व मूल असेंच म्हणतात तरीही आपल्या समाजावर ही होणारी टीका अगदीं चुकीची आहे असें म्हणतां येणार नाहीं. हिंदु कायद्यांत स्त्रियांची स्थिति चांगली नाहीं आणि पत्नीची, त्यांतल्यात्यांत सुपत्नीची, स्थिति फारच वाईट आहे. कित्येक स्मृतींत व जुन्या संस्कृत वाङ्मयांत स्त्रियांच्याबद्दल जें लिहिलें आहे तें आपल्या आधुनिक दृष्टीला अत्यंत दुष्ट वाटतें यांत नवल नाहीं. महाभारतांत सभापर्वांत द्यूतांत पांडव हरले आणि स्वतः हरल्यावर धर्मराजानें आपली व पांचा भावांची पत्नी द्रौपदी हिला पणाला लावलें आणि पुनः खेळ सुरू झाला. द्रौपदी हरली आणि मग ती दासी म्हणून तिला राजसभेंत फरफटत आणली. तिनें भीष्मासारख्या वयोवृद्ध, ज्ञानवृद्ध सभासदांना मार्मिकपणानें प्रश्न विचारला—"ज्याचें स्वतःवरही स्वामित्व राहिलें नाहीं त्याला आपल्या बायकोला पणाला लावतां येईल

काय ?" या प्रश्नाला कोणीही सरळ उत्तर दिलें नाहीं. भीष्मानें तर "धर्मस्य तत्त्वं निहितं गुहायाम् " असें वकिली उत्तर दिलें. भीष्माला धर्मशास्त्र उत्तम अवगत होतें, पण तत्कालीन समाजाच्या मूळभूत तत्त्वांत नवऱ्याची कोणत्याहि परिस्थितींत बायकोवर पूर्ण सत्ता आहे हेंही तत्त्व होतें आणि त्याला धक्का लागेल असें उत्तर देण्यास भीष्मही कचरला. त्यावेळीं भीष्म कौरवांना भ्याला, तो त्यांचें अन्न खात होता म्हणून कचरला, असें कोणी म्हणतात त्यांत अर्थ नाहीं. भीष्म हा कुरुवंशाचा मुख्य होता आणि महापराक्रमी होता. त्यानें कौरवांना किंवा पांडवांना भिण्याचें कारणच नव्हतें; पण समाजस्थैर्याला धक्का लागेल म्हणून तो भ्याला. जी समाजरचना अस्तित्वांत आहे तिच्यांत कितीही अन्याय असले तरी तिचीच तरफदारी करण्याची संवय मनुष्यजातीला इतकी लागली आहे कीं धडधडीत भयंकर अन्याय डोळ्यांसमोर घडला होता तरी भीष्मासारख्यालाही त्या संवयीच्या कोंडींतून बाहेर पडतां आलें नाहीं. पुरुषाची स्त्रियांवर पूर्ण सत्ता हें मनुष्यसमाजाचें एक प्रमुख अंग होतें व जेथें तें थोडेंसें डळमळलें तेथें तें स्थिर करण्याचा अट्टाहास मुसोलिनी–हिटलरसारखे व्यक्तिस्वातंत्र्याचे शत्रु मध्यांही करीत आहेत. द्रौपदीच्या प्रश्नांत या तत्त्वावर रोख होता आणि भीष्म कांहीं झाला तरी उभ्या घराचा पाया ढांसळावा या गोष्टीला कबूल नव्हता. समाजाच्या रचनेंत फेरफार झाला कीं ज्यांची आज पोळी पिकते त्यांचें आसन डळमळेल आणि या पोळीवाल्यांची टाळी वाजविणें म्हणजेच समाजाच्या रचनेला धक्का न लावणें ही समजूत या पोळीवाल्यांनीं अत्यंत दृढ करून ठेविलेली आहे. आजकालसुद्धां ज्या विशिष्ट भांडवलशाहीमुळें युद्धानंतर सर्व जगांत आर्थिक बखेडा माजून राहिला आहे त्या भांडवलशाहीला धक्का लागूं नये म्हणून जगभर केवढी यातायात चाललेली आहे हें आपण पहात आहों. तेव्हां स्त्रियांना पुरुषाची सत्ता समजत आणि ही सत्ता म्हणजे और होती. पुरुषाचें जरी सर्वस्व गमावलें तरी त्याची बायकोवरील सत्ता कायम रहात असे. पतीची "दारेषु प्रभुता सर्वतोमुखी" हें कालिदासाचें वाक्य याच परिस्थितीचें निदर्शक आहे.

६. अशा प्रकारची स्त्रियांची परिस्थिति होती. त्यामुळें कालिदासाच्या काव्यांत कोणतीं चित्रें रेखाटलीं आहेत हें पाहण्याची आपली उत्सुकता वृद्धिंगत होते. कालिदासाची स्त्रियांसंबंधीं दृष्टि दूषित नाहीं हें लक्षांत ठेवण्या-

सारखें आहे. त्याचीं स्त्रीविषयक वर्णनें वाचलीं म्हणजे प्राचीन संस्कृत वाङ्मयांत, रखरखीत वाळवंटांत शीतल वारा लागावा त्याप्रमाणें, वाटतें. अर्थात् त्यानें त्यावेळची सामाजिक परिस्थिति लपवलेली नाहीं. बहुभार्याकत्व होतें तसें त्यानें दाखविलें आहे. "उपपन्ना हि दारेषु प्रभुता सर्वतोमुखी" अशीं वाक्यें किंवा "इंद्रियार्थ" यासारखे शब्दप्रयोग हीं त्याच्या काव्यांत आढळतात व त्यामुळें त्यावेळच्या परिस्थितीचा बोध होतो. परंतु त्याला स्त्रियांबद्दल आदर आहे, कौतुक आहे, दाक्षिण्य आहे. बारीकसारीक वर्णनांतूनसुद्धां त्याची या बाबतींतील उदार दृष्टि दिसून येते. पत्नी या शब्दाला त्यानें फार महत्त्व दिलें आहे. पत्नीचा दर्जा थोर आहे असें त्यानें महाजनमुखांतून वदविलें आहे. पत्नीबद्दल अनादर दाखविणाऱ्यांवर त्यानें कोरडे ओढलेले आहेत. दुष्यंत राजा जेव्हां शकुंतलेचा धिःक्कार करतो आणि तिजबद्दल अपमानकारक भाषा वापरूं लागतो त्यावेळीं ऋषीकुमार शार्ङ्गरव त्याची तेथल्या तेथें हजेरी घेतो. आणि ही हजेरी घेतांना तो वाल्मुनि भीडभाड कांहीं ठेवित नाहीं. शाकुंतलाच्या सातव्या अंकांत सर्व संशयनिरसन झाल्यावर आणि शकुंतला आपली पत्नी आहे हें पटल्यावर राजा तिच्या पायांवर डोकें ठेवून केलेल्या अपराधाची भरपाई करतो. गांवांतील कंडी ऐकून राम जेव्हां सीतेचा त्याग करतो तेव्हां आद्यकवि आणि महर्षि वाल्मीकि अगदीं स्पष्ट शब्दांत रामाच्या त्या कृत्याबद्दल नापसंती दर्शवितो (रघुवंश १४). शंकरानें स्मरण केल्यावरून जेव्हां सप्तर्षि त्याच्या दर्शनाला जातात तेव्हां ते वसिष्ठपत्नी अरुंधती इला बरोबर नेतात (कुमारसंभव ७) आणि अरुंधतीला ते ऋषी किती आदरानें वागवितात हें पाहून शंकराला गृहस्थाश्रम स्पृहणीय वाटतो. दिलीप राजा आपल्या सुदक्षिणा राणीला अतिशय प्रेमानें व आदरानें वागवितो. तो तिला रथांतून खालीं उतरवतो व मग आपण उतरतो. घोर तपश्चर्या करतांना तिला त्रास होऊं नये म्हणून तो जपतो व गुरूचीही आज्ञा त्याला तशीच असते. पुत्रप्राप्त्यर्थ तपश्चर्या दोहोंबद्दल राजाच करतो. (रघु २.) अज राजाची पत्नी मृत्यु पावते तेव्हां तो अतिशय शोक करतो व केवळ मुलाच्या पालनासाठीं म्हणून जगतो; पण मुलगा मोठा होतांच तो अग्निप्रवेश करतो. (रघु ८.) अजविलाप हें करुणरसाचें अतिशय मनोरम उदाहरण आहे हें सुप्रसिद्ध आहे.

आपल्या पत्नीचें वर्णन अज पुढील विख्यात श्लोकांत करतोः—

**गृहिणी सचिवः सखी मिथः**
**प्रियशिष्या ललिते कलाविधौ ।**
**करुणाविमुखेन मृत्युना**
**हरता त्वां वद किं न मे हृतम् ॥**

[ गृहिणी, सल्लामसलत देणारी, एकांतातील प्रिया, ललितकलांत शिष्या, अशा तुला निष्करुण मृत्यूनें ओढून नेल्यावर माझा आणखी घात होण्याचा तो काय राहिला ? ]

पत्नीबद्दल हे उद्गार आणि ही भक्ति हीं हिंदुसमाजाच्या परंपरेकडे पाहिलें म्हणजे आश्चर्यकारक वाटतात. राम राजकारणासाठीं पत्नीचा त्याग करतो ( रघु. १४. ) पण पुनः लग्न करीत नाहीं आणि राजसूय यज्ञाच्या वेळीं सीतेची सुवर्णमय प्रतिमा करून काम चालवितो व आपलें एकपत्नीव्रत अखंड प्रकट करतो. बारीकसारीक गोष्टींतसुद्धां स्त्रियांना आदरानें व कारुण्यानें वागवावें असा दंडक कालिदासाच्या काव्यांत दिसून येतो. अद्यापिसुद्धां हिंदुसमाजांत कुटुंबास घेऊन फिरावयास जाणाऱ्या पतीला लोक हंसतात. पण दिलीप वसिष्ठाकडे जातांना पत्नीला बरोबर नेतो व वाटेंत तिला मजेदार गोष्टी सांगून तिचें रंजन करतो. राम व सीता लंकेहून असेच परत येतात ( रघु. १३ ) आणि पुष्पक विमानांतून येतांना राम तिला वाटेवरचीं ठिकाणें मोठ्या कौतुकानें दाखवितो. हें दंपतीचें चित्र आणि मुलाच्या मुखानें पतीबरोबर बोलणाऱ्या पुढच्या काळांतील हिंदपत्नीचें चित्र यांत मोठी तफावत आढळून येते. सैन्याच्या छावणींत एक हत्ती उधळतो व सर्वत्र धांदल होते तेव्हां सैनिकांनीं प्रथम स्त्रियांचें रक्षण केलें असें वर्णन आहे. ( रघु. ५ ). हीं बारीकसारीक वर्णनें वाचलीं म्हणजे Ladies first "स्त्रियांची सोय प्रथम केली पाहिजे" हें तत्त्व कालिदासाच्या कथनांत किती उत्तम प्रमाणांत आढळतें हें कळून आपणांस विस्मय वाटतो व आनंद होतो.

स्त्रियांबद्दल कवीनें काढलेला असा अपशब्द कालिदासांत मिळणार नाहीं. कितीतरी संस्कृत कवींनीं स्त्रिया म्हणजे या जगांतील सर्व अनर्थांचें मूळ, पुरुषाला मूढ बनवून नरकमार्गाला लावणाऱ्या पापिणी, सर्व मोहाचें आदिकारण, असें वर्णन केलेलें आहे. मनुष्य जें जें अकार्य करतो तें तें स्त्रियांच्या चिथावणीमुळें आणि स्त्री म्हणजे मोक्षाच्या मार्गांतील मोठें विघ्न असें वर्णन करणारे तत्त्वज्ञ आणि कवि शेंकड्यांनीं मोजतां येतील. या मंडळीचें स्तोम हिंदुसमाजांत फार

माजलेलें आहे. या मंडळीकडे पाहून कालिदासाचें काव्य वाचलें म्हणजे मोठेंच अंतर दृष्टीस पडून आल्हाद वाटतो. स्त्रियांबद्दल कालिदासाचा आदर अगदीं अंतःकरणपूर्वक आहे. उत्तम पत्नी असणें म्हणजे स्वर्गसुखाची प्राप्ति होणें असें तो म्हणतो. इहलोकांना स्वर्गाची पात्रता स्त्रीमुळें येते असें त्याचें मत आहे. अर्थात् स्त्रियांचा अपमान जेव्हां जेव्हां होतो तेव्हां अपमान करणारांचा धिक्कार तो स्पष्ट शब्दांनीं करतो. स्त्रियांचीं जीं आश्चर्यकारक चित्रें त्यानें रंगविलीं आहेत तीं यथास्थळ आपण पाहूंच; पण या ठिकाणीं एवढें म्हणण्यास हरकत नाहीं कीं स्त्रियांबद्दल कालिदासाची दृष्टि अगदीं आधुनिक आहे. व कालिदासाची दृष्टि जरी सध्यांच्या पुरुषवर्गांत आली तरी हिंदु स्त्रियांची दुःस्थिति पुष्कळशी सुधारेल. कालिदासाच्या काव्यसृष्टींत स्त्री ही माता, पत्नी, कन्या या सर्व नात्यांत आदरणीय मानलेली दिसून येते. पार्वती योजलेला वर मिळविण्यासाठीं तपश्चर्या करिते त्याचा राग तिचा पिता हिमालय याला येत नाहीं. शकुंतलेशीं दुष्यंतानें केलेला गांधर्वविवाह कळल्यावर कण्व डोक्यांत राख घालून घेत नाहीं तर उलट शकुंतलेशीं अत्यंत प्रेमळपणानें वागतो. कण्वाचें शकुंतलेशीं वागणें हें हिंदुसमाजाच्या सध्याच्या दृष्टीनें अत्यंत आश्चर्यकारक आहे यांत शंका नाहीं. संस्कृत वाङ्मयांत असा दुसरा प्रसंग क्वचित्च आढळतो. संस्कृतीचें खरें स्वरूप महाकवींनाच कळणें शक्य असतें हें जर खरें असेल–आणि हें खरें आहे हें निर्विवाद आहे—तर आर्यसंस्कृतींत स्त्रियांबद्दल आदरभाव होता असें आपण मान्य केलें पाहिजे. कालिदासाची साक्ष या बाबतींत आपण निर्णायक समजली पाहिजे. आतां आपल्या समाजाची ही दृष्टि पार बदलून दूषित कसकशी होत गेली व तिचें पर्यवसान स्त्रियांबद्दल अत्यंत द्वेषबुद्धींत व मत्सरबुद्धींत कसें झालें याचा शोध इतिहासाच्या पंडितांनीं लावला पाहिजे. कालिदासाच्या कल्पना आणि ध्येयें यांच्या रमणीय सृष्टींत स्त्रीचें स्थान फार उन्नत आहे असें आपणाला दिसतें. आणि म्हणून कालिदासाला आम्ही हिंदूंचा राष्ट्रीय कवि म्हणतों. आर्यसंस्कृतीचें व ध्येयबुद्धीचें खरें स्वरूप त्याच्या काव्यांतच आपणास पहावयास मिळतें.

७. अर्थात् कालिदास स्त्रियांचे दोष दाखवीतच नाहीं असा या विवेचनाचा अर्थ नव्हे. जेथें जेथें प्रमाद म्हणून होतो तेथें तेथें आपला कवि तो स्पष्ट शब्दांनीं दाखवितो व त्याला दूषण देतो. बहुतेक वेळीं हें कार्य कवि व्यंजनेनें

साधतो हें स्वाभाविकच आहे. शकुंतलेनें कोणालाही न कळवितां राजाशीं गांधर्व-विवाह केला व या अज्ञात विवाहामुळें ती भाबडी पोर गोत्यांत आली तेव्हां तिचा धर्मबंधु शार्ङ्गरव

**अतः परीक्ष्यं कर्तव्यं विशेषात्संगतं रहः ।**

असें तिला राजसभेंत खडखडीतपणानें सांगतों; पण ज्यावेळीं दुष्यंत शकुंतलेबद्दल भलभलतें बोलूं लागतो व स्त्रीजात तेवढी लबाड म्हणून व्याख्यान देऊं लागतो त्या वेळीं तोच शार्ङ्गरव आपल्या बहिणीची कड घेतो व दुष्यंताला त्याच्या भर दरबारांत

**आजन्मनः शाठ्यमशिक्षितो य–**
**स्तस्याप्रमाणं वचनं जनस्य ।**
**परातिसंधानमधीयते यै—**
**र्विद्येति ते संतु किलाप्तवाचः ॥**

[ जिला जन्मापासून लबाडी माहीत नाहीं तिचें म्हणणें खोटें आणि लोकांना फसविण्याचा ज्यांनीं विद्या म्हणून अभ्यास केलेला आहे त्यांचें म्हणणें खरें मानावयाचें काय ? ]

असें स्पष्टपणें सांगतो. याप्रमाणें व्यवहारांतील खांचखळगे कालिदासानें योग्यपणें निर्दिष्ट केलेले आहेत. पण या महाकवीचा विशेष म्हणजे, त्यानें जीं सुंदर आणि सुदृढ अशीं ध्येयनिदर्शक चित्रें वाचकांपुढें ठेविलीं आहेत तीं, हा होय. हें त्यानें काव्यमय प्रकारानें केलेलें आहे हें सांगावयास नकोच. म्हणजे त्याचें सर्व मर्म किंबहुना खरें वर्म त्याच्या व्यंजनेंत, ध्वनींत आहे. आणि याच प्रकारच्या काव्याला उत्कृष्ट काव्य असें साहित्यशास्त्रांत म्हटलेलें आहे. त्याचे तरुण विद्यार्थी किंवा राजपुत्र-सुद्धां मोठे सुदृढ, सुविद्य, सदाचारसंपन्न, निर्भय आणि धैर्यशाली असे दिसतात. आणि त्यानें काढलेलीं दुसरीं चित्रेंही अशींच ध्येयात्मक दृष्टीनें असावीं तशीं आहेत. अर्थात् त्या दृष्टीमुळें वस्तुविपर्यास होण्याचें कारण नाहीं. कारण वस्तुनिदर्शन करून ध्येयदर्शन करविणें यांत तर कवीच्या कलेचें मर्म आहे. रघूची आणि इंद्राची गांठ पडते ( रघु. ३ ) तेव्हां बालवयाचा रघु घाबरत नाहीं; आपलें कर्तव्य निर्भयपणानें करतो. परशुरामाचें दर्शन होतें तेव्हां दशरथाची

पांचावर धारण बसते पण रामचंद्राला कसलीही भीति वाटत नाहीं. ( रघु. ११ ) एकवीस वेळां निःक्षत्रिय पृथ्वी करणाऱ्या परशुरामाच्या गर्जनेला

**तद्धनुर्ग्रहणमेव राघवः**
**प्रत्यपद्यत समर्थमुत्तरम् ।**

हातांत धनुष्य घेऊनच रामानें जबरदस्त उत्तर दिलें हें वर्णन वाचून "तरुण असा असावा" हा विचार आपल्या मनांत ताबडतोब येतो. अशा तऱ्हेची शिस्त आणि पराक्रम कालिदासाच्या सृष्टींत आपणांस वरचेवर पहावयास मिळतात. त्याच्या काव्यांत काय किंवा नाटकांत काय, बुद्धीचा प्रकर्ष व संकटाशीं बेधडकपणें टक्कर देण्याची तयारी हे गुण दृष्टोत्पत्तीस. येतात. कालिदासानें काढलेलीं चित्रें केवळ सुंदर आहेत असें नाहीं. तीं तर सुंदर आहेतच; पण स्फूर्ति देण्याचा, मार्ग दाखविण्याचा, हुरूप उत्पन्न करण्याचा उत्कृष्ट गुण त्यांच्यांत आहे आणि म्हणून हीं चित्रें काढणाऱ्याची लेखणी जादूनें भारलेली असली पाहिजे असें वाटतें. स्फूर्ति देणें हें उत्कृष्ट काव्याचं एक प्रमुख कार्य आहे. अर्थात् उत्कृष्ट काव्यांत सौंदर्याचें आविष्करण होऊन आनंदाची प्राप्ति तर झाली पाहिजेच; पण त्याबरोबरच त्यांत स्फूर्तिदायकत्वही पाहिजे.

८. कालिदासाच्या काव्यांत सुभाषितांची अगदीं रेलचेल आहे. त्यांवरून त्या काळच्या लोकांतील कल्पना जशा लक्षांत येतात त्याचप्रमाणें सदसद्विचारही कळतो. कालिदासाचे दृष्टांत आणि अर्थांतरन्यास हे खरोखर सोन्याच्या मोलाचे आहेत. मराठी कवींत ज्ञानेश्वर व बऱ्याच प्रमाणांत मोरोपंत यांच्यांत ही सुभाषितांची संपत्ति विपुल आहे. कालिदासाचीं कांहीं कांहीं वाक्यें मोठीं मजेदार आहेत :—

**संततिः शुद्धवंश्या हि परत्रेह च शर्मणे ॥** ( रघु. १-६९ )

शुद्ध वंशांत झालेली संतति इहलोकीं आणि परलोकीं कल्याणाला कारणीभूत होते.

**स्थातुं नियोक्तुर्नहि शक्यमग्रे**
**विनाश्य रक्ष्यं स्वयमक्षतेन ॥** रघु २—५६

ज्याचें रक्षण करण्याची जबाबदारी घेतली होती त्याचा विनाश व्हावयाचा आणि आपली कातडी बचवावयाची अशा माणसाला मालकापुढें दाखविण्यास तोंड नाहीं.

**न रत्नमन्विष्यति मृग्यते हि तत्।** ( कुमार. ५ )

रत्नाला लोक हुडकीत येतात; रत्न कोणाला हुडकण्याला जात नाहीं.

**लिपेर्यथावद्ग्रहणेन वाङ्मयं**
**नदीमुखेनेव समुद्रमाविशत्॥** ( रघु. ३-२८ )

नदीमुखानें समुद्रांत प्रवेश करतात त्याप्रमाणें त्यानें अक्षर ओळख करून घेऊन वाङ्मयांत प्रवेश केला.

अशीं अनेक वाक्यें देतां येतील व कालिदासाच्या तत्त्वज्ञानाचा विचार करतांना आपण त्यांचा आणखी उल्लेख करूं. वेदांततत्त्व ज्ञानाचा त्या काळच्या विचारसरणीवर पगडा होता व ही गोष्ट कालिदासाच्या कित्येक सुभाषितांवरून लक्ष्यांत येते. दैववाद समाजांत बराच शिरला होता व त्याची छायाही आपणांस पहावयास मिळते. परंतु या छायेला दूर सारून कालिदास उद्योगाचा, सत्कर्माचा, पराक्रमाचा धडा शिकवितो. तो दैवावर अवलंबून राहण्यास एकादे वेळीं शिकवितो, पण केव्हां ? फक्त मृत्यूच्या सान्निध्यांत तो दैवाकडे बोट दाखवितो. पण मृत्यु ही मनुष्याच्या आक्रमणाची मर्यादा आहे हें कोण नाकबूल करूं शकणार आहे ?

येथपर्यंतच्या विवेचनावरून कालिदासाच्या सृष्टींत काय काय पहावयास मिळेल याची सामान्य कल्पना येण्यास हरकत नाहीं. कोणत्या गुणांना तो महत्त्व देतो, कोणतीं ध्येयें तो माणसांपुढें ठेवतो याचें ज्ञान त्याच्या काव्याच्या अंतरंगांत शिरल्यावर मिळतें. तेव्हां त्या सृष्टींत आपण आतां प्रत्यक्ष प्रवेश करूं व क्रमाक्रमानें बाल्य, तारुण्य, वार्धक्य, ब्रम्हचर्य, गार्हस्थ्य, वानप्रस्थ, इत्यादि अवस्था आणि राजे व वीर, ब्राम्हण व विद्योपासक, निरनिराळ्या स्त्रिया, समाजांतील निरनिराळे संबंध हे सर्व त्या सृष्टींत कसे आहेत याची ओळख करून घेऊं. स्त्रिया आणि पुरुष यांना संसाराच्या व व्यवहाराच्या ज्या निरनिराळ्या अवस्थांतून जावें लागतें त्यांचीं वर्णनें त्यानें कशीं केलीं आहेत हें आपण पाहूं. कालिदासाची काव्यसृष्टि आपण काव्यदृष्टीनें पाहूं. ती पाहण्याला दुसरी दृष्टि चालणार नाहीं. पण ती पाहून आमच्या प्रत्यक्ष सृष्टींत स्थित्यंतर करण्याची सूचना आपणांस मिळाली तर त्याबद्दल भिण्याचें कारण नाहीं. तें स्थित्यंतर करण्याची बुद्धि, शक्ति व स्फूर्ति देण्याला आमच्या या सर्व जगताला वंदनीय झालेल्या महाकवीचें काव्य समर्थ आहे.

# भाग तिसरा

## बालसृष्टि

त्रातुं लोकानिव परिणतः कायवानस्त्रवेदः
क्षात्रो धर्मः श्रित इव तनुं ब्रह्मकोषस्य गुप्त्यै ।
सामर्थ्यानामिव समुदयः संचयो वा गुणाना-
माविर्भूय स्थित इव जगत्पुण्यनिर्माणराशिः ॥

कालिदासाच्या बालसृष्टीचा विचार करूं लागलें म्हणजे शाकुंतलाच्या सातव्या अंकांतील अत्यंत मनोहर प्रसंगाची आठवण झाल्याशिवाय रहात नाहीं. शृंगार-रस आणि करुणरस या दोहोंनाही वीररसाच्या साहाय्यानें पाठीमागें खेचून सातव्या अंकांत कालिदासानें मोठें अद्भुत असें वातावरण निर्माण केलेलें आहे. दुष्यंत इंद्ररथांत बसून आकाशांतून पृथ्वीतलावर येत आहे हा प्रसंग योजून जेथें शकुंतला रहात होती त्या तपोवनांत कवीनें दुष्यंताबरोबर वाचकासही आणून सोड-लेलें आहे. त्या तपोवनांत आल्यानंतर दुष्यंताला आपला पुत्र भरत याची भेट होते. भरताचें जें चित्र येथें पहावियास मिळतें तें पाहून दुष्यंताला तर साल्हाद आश्चर्य वाटलेंच, पण वाचकाचीही तीच स्थिति होते. शकुंतलेच्या दोन सख्या त्याला घेऊन येतात. अद्यापि निरनिराळे खेळ देतांच जो रमतो आणि आईचें नांव निघतांच ती पाहिजेशी ज्याला वाटते असा बाळ भरत सिंहाला पकडून त्याचे दात मोजण्याची गंमत करीत आहे व "काय हा दांडगोबा झाला आहे" म्हणून त्या सख्या त्याचें कौतुकानें वर्णन करीत आहेत हा देखावा विस्मयकारक व आनंददायक आहे याबद्दल मुळींच शंका नाहीं.

या आश्चर्यकारक देखाव्याचें आपण थोडेंसें निरीक्षण करूं. इंद्र-शत्रूंचा पराभव करून दुष्यंत मारीचाश्रमाजवळच्या वनांत उतरला आणि त्याचा बाहु स्फुरण पावूं लागला. शकुंतलेच्या प्राप्तीची त्याला तीव्र इच्छा होती, पण ती आपणांला आतां परत मिळणें दुर्लभ असेंही त्याला वाटूं लागलें होतें. अशा स्थितींत बाहुस्फुरणाच्या शुभ शकुनानें तो गोंधळून गेला. इतक्यांत पडद्यांतून शब्द

आले—" अरे, दांडगाई करूं नकोस ! कसा अगदीं आपल्या वळणावर गेला !" आणि त्यानंतर दोन तापसी स्त्रिया ज्याच्या मागून येताहेत असा बालक पण अबालसत्व, म्हणजे मोठ्या पुरुषाची धमक असलेला, येतांना त्याला दिसला. तो कसा होता तर—

अर्धपीतस्तनं मातुरामर्दक्लिष्टकेसरम् ।
प्रक्रीडीतुं सिंहशिशुं बलात्कारेण कर्षति ॥

( अ. शा. १—१४ )

आईला पीत असतांना तें अर्धेमुधें पुरें होण्यापूर्वी खेळण्यासाठीं म्हणून सिंहाच्या बच्चाला जोरजोरानें तो मुलगा फरफटत आणीत होता आणि त्याच्या त्या हिसका-हिसकीमुळें त्या सिंहाचें आयाळ अस्ताव्यस्त झालें होतें. त्या सिंहाला पकडून ओढत ओढत तो बाळ म्हणतो, " ए सिंहा, जरा स्वस्थ रहा, तुझे मी दात मोजतों." लहानशा वर्णनांत उदात्त आणि स्वभावोक्ति हे अलंकार उत्कृष्ट साधले आहेत. आणि क्षत्रियाचा बच्चा कसा निर्भय असतो याचें मोठें मधुर चित्र कवीनें या ठिकाणीं काढलेलें आहे. त्या तपोवनांत अशी सिंहाबरोबर दंगामस्ती करणारा हा मुलगा कोण म्हणून दुष्यंताला चमत्कार वाटला. इतक्यांत एक तापसी म्हणते—

" अरे दांडग्या, आम्ही मुलांसारखीं वाढविलेलीं हीं जनावरें यांना तूं त्रास देतोस ? अरे, तुझी मस्ती तर वाढत चालली ! तुला सर्व ऋषींनीं सर्वदमन हें नांव दिलें आहे तें कांहीं उगीच नाहीं !" त्या मुलाला पाहून पुत्रसुखासाठीं तळमळणाऱ्या दुष्यंताच्या पोटांत स्नेहाचा उमाळा आला. पोटच्या मुलाबद्दल जसें प्रेम वाटावें तसें त्याला वाटूं लागलें. तेव्हां तो म्हणतो, " मला मूल नाहीं म्हणून मला असें वाटतें." तो मुलगा जेव्हां त्या सिंहबालकाला सोडीना तेव्हां एक तापसी म्हणते, " त्याची आई तुझी खोड मोडील हां !" तेव्हां तो बालक हंसून म्हणतो, " मी फारच घाबरलों बरें !" आणि पुढें हा आपलाच मुलगा आहे असें दुष्यंताला कळतें. हा एवढा लहान बालक म्हणजे पांचएक वर्षांचा किंवा त्याहून कमी त्याला भय तें कसलें माहीत नाहीं असे त्याचें उत्तम " वळण " आणि बेलाशक मजेंत सिंहाचे दात मोजतो आहे हें चित्र अत्यंत मनोहर तसेंच स्फूर्तिदायक आहे. मुलें लहानपणीं अशींच असावीत तरच पुढें नांव काढतील असें वाटल्याशिवाय रहात नाहीं. आणि अशा मुलाला पाहून

अपत्यवंतही रोमांचित होतील, मग बिचारा दुष्यंत तर अनपत्य होता; त्याला या जन्मांतील सुखाचें सारसर्वस्व म्हणजे अशीं मुलें अंगाखांद्यावर खेळविणें हें वाटलें तर त्यांत नवल काय! अशीं मुलें अंगाखांद्यावर खेळवितांना त्यांच्या अंगाची धूळ आपल्या अंगाला लागावी यापरतें भाग्य कोणतें! त्या मुलाचें चित्र काढतांना कालिदास अगदीं तदाकार झाला होता. "कारणाशिवाय तो हंसला म्हणजे त्याच्या दातांच्या कळ्या बाहेर दिसतात आणि स्पष्ट नीटपणें उच्चारतां येत नसल्यामुळें जो बोबडेपणा दिसतो तोच मनाला मोहक वाटतो!" अशीं मुलें असण्याचें भाग्य हें संसारांतलें महद्भाग्य आहे हें कालिदासानें सूचित करून दुष्यंतावर झालेला परिणाम स्पष्ट केलेला आहे.

लहान मुलांच्या यथातथ्य वर्णनाला जें वात्सल्य लागतें तें कालिदासांत पूर्णपणें होतें, आणि पुत्रप्राप्ति ही हिंदुसमाजांत किती आनंददायक समजतात हें त्याच्या काव्यांत स्पष्टपणें प्रतिबिंबित झालें आहे. दिलीपाला मुलगा झाला हें कळतांच

**जनाय शुद्धांतचराय शंसते**
**कुमारजन्मामृतसंमिताक्षरम् ।**
**अदेयमासीत्त्रयमेव भूपतेः**
**शशिप्रभं छत्रमुभे च चामरे ॥ रघु. ३–१६ ॥**

म्हणजे "कुमारजन्म" हीं अमृतासारखीं अक्षरें सांगणाऱ्या सेवकाला फक्त राजचिह्नें त्यानें दिलीं नाहींत बाकी सर्व कांहीं दिलें. आर्यसंस्कृतींत सपुत्रकत्वाचें भाग्य फार मोठें समजत. दिलीप राजा मुलाकडे पाहतां पाहतां तल्लीन होऊन गेला; त्याचा आनंद पोटांत मावेना. आतां त्या मुलाचें, बाळरघूचें, मोठें गोड वर्णन कसें केलें आहे पहा :—

**उवाच धात्र्या प्रथमोदितं वचो**
**ययौ तदीयामवलंब्य चांगुलिम् ।**
**अभूच्च नम्रः प्रणिपातशिक्षया**
**पितुर्मुदं तेन ततान सोऽर्भकः ॥ रघु. ३–२५ ॥**

प्रथम दाईनें शब्द बोलावा, मग त्यानें तो म्हणावा; तिच्या बोटाला धरून चालावें; नमस्कार कर म्हणून शिकविलें कीं, नमस्कार करावा; अशा प्रकारें त्या

बाळानें पित्याच्या आनंदाला भर आणला. हें वर्णन सार्वकालिक आहे असें म्हणणें या काळींही धाडसाचें होणार नाहीं. कालिदासानें वर्णिलेले पिते मुलांचें कौतुक करतात, पण त्यांना अभ्यास व शिक्षा लावण्याची ते हयगय करीत नसत. रघूची शेंडी राखल्याबरोबर बरोबरच्या मुलांसमवेत त्याला मूळाक्षरें शिकविण्याची सुरवात झाली असें सांगून त्याला पित्यानें उत्तम शिक्षण दिलें व चालचलणूक लाविली हें ध्वनित केलें आहे.

२. अगदीं लहान मुलांचीं हीं दोन वर्णनें मोठीं स्वभावसुंदर अशीं आहेत व त्यांत जसें लालित्य आहे त्याचप्रमाणें पुढें येणाऱ्या जीवितांतील प्रसंगांना टक्कर देण्याचें धैर्य व प्रभाव हींही त्यांत सूचित केलेलीं आहेत. यानंतरची जी कौमारावस्था तिचींही वर्णनें मोठीं रमणीय आहेत. ब्राह्मणकुमारांचीं दोन ठिकाणचीं वर्णनें व क्षत्रियकुमारांचीं दोन ठिकाणचीं वर्णनें हीं त्यांतल्यात्यांत विशेषच आकर्षक झालेलीं आहेत. विद्यार्थीदशेंत मुलगा कसा असावा याचें चित्र शाकुंतलाच्या पांचव्या अंकांत शार्ङ्गरव या मुनिकुमारांत पहावयास मिळतें. शकुंतलेला दुष्यंताकडे घेऊन गौतमी नांवाची तापसी व शार्ङ्गरव आणि शारद्वत असे दोन ऋषिकुमार म्हणजे कण्वाच्या आश्रमांतील दोन विद्यार्थी गेले. तेथें गेल्यावर राजानें शकुंतलेला ओळखिलें नाहीं व तिचा अवमानही केला. या प्रसंगीं शार्ङ्गरव कसा वागला हें मोठें पाहण्यासारखें आहे. कण्वाकडून मंडळी आली आहेत हें कळतांच तपाला कांहीं विघ्न झालें कीं काय किंवा तपोवनांतील जनावरांना कोणीं त्रास दिला कीं काय अशा शंका राजाच्या मनांत यावयास लागतात. इतक्यांत ती मंडळी येतात आणि शकुंतलेला येतांयेतां अपशकुन झाला असें वाटतें, कारण तिचा उजवा डोळा लवतो. स्त्रियांचा उजवा व पुरुषांचा डावा डोळा लवणें हें शकुनांवर विश्वास ठेवणारांच्या समजुतीप्रमाणें अनिष्ट मानलेलें आहे. दुष्यंताची चालचलणूक पाहून, त्याचा नम्र स्वभाव पाहून, शार्ङ्गरव प्रथम अगदीं खूष होतो; व चांगलीं माणसे भरभराटीच्या काळांत नम्र असतात आणि परोपकारी लोकांचा नम्रता हा स्वभावच आहे असाही सामान्य सिद्धांत तो बोलून दाखवितो. शकुंतलेला पाहून जरी तिनें बुरखा घेतला होता तरी राजाच्या लक्षांत तिचें लावण्य येतें व ही मुलगी कोण असावी हा विचार त्याच्या मनांत येतो; पण तेवढ्यांत सभ्याचाराचें

तंत्र त्याला आठवतें व तो म्हणतो कीं परस्त्रीची पंचाईत करणें बरोबर नाहीं. पुढें औपचारिक कुशल प्रश्न झाल्यावर शार्ङ्गरव आपण कां आलों आहे हें स्पष्ट शब्दांत, आढेवेढे न घेतां सांगून टाकतो. चट्दिशीं स्पष्टपणें बोलणें हा बालस्वभाव आहे. रागरंग पाहून वळणावळणानें बोलणें हा व्यवहारांत मुरलेल्या वृद्धांचा किंवा प्रौढांचा स्वभाव आहे. आपल्याकडे कामाला कोणी माणूस आला कीं तो आपलें काम ताबडतोब कधीं सांगणार नाहीं. "नाहीं, एरव्हींच आलों होतों" असें म्हणून बराच वेळ काढील आणि जाण्यासाठीं उठतां उठतां अगदीं त्यावेळीं आठवलेंसें करून ज्यासाठीं खरोखर तो आला होता त्या कामाची गोष्ट काढील; म्हणजे ऐकणाराला वाटावें कीं जसें कांहीं त्या कामाला हा गृहस्थ महत्त्वच देत नाहीं. पण ऐकणाराही तसाच व्यवहारांत मुरलेला मुरब्बी असतो. तोही समजून असतो कीं कधीं न येणारा हा गृहस्थ कांहीं एरव्हींच आलेला नाहीं; याचा कांहींतरी मतलब असलाच पाहिजे. असो.

शार्ङ्गरव विद्यार्थी होता. स्पष्टपणेंच बोलणेंच त्याला माहीत होतें. व्यवहाराची आंच लागून त्याचें डोकें आणि अंतःकरण करपून गेलीं नव्हतीं. त्यावेळीं कुलपतींच्या आश्रमांत मिळणारें शिक्षण विद्यार्थ्याला स्वावलंबी, निर्भय व सत्यप्रिय करीत असे. त्यानें राजाला सांगितलें— थोर लोकांत तुला अग्रपूजेचा मान आहे असें आम्हीं ऐकलें आहे. आणि शकुंतला तर मूर्तिमती सत्क्रियाच आहे. (तिच्या हातून अकार्य असें होणें शक्यच नाहीं.) तेव्हां अशीं एकमेकांना अगदीं अनुरूप वधूवरें एकत्र आणून प्रजापति त्याच्या नेहमीं होत असलेल्या निंदेला यावेळीं तरी पात्र झालेला नाहीं; शकुंतला जशी दुष्यंताला पाहून खुष झाली होती व तिच्या सखीनें "नैतादृशा आकृतिविशेषा गुणविरोधिनो भवंति" असें सांगून आपलीही खुषी व्यक्त केली होती तोच प्रकार प्रथम शार्ङ्गरवाचा झाला. दुष्यंताला पाहून आपल्या बहिणीला योग्य पति मिळाला असेंच त्याला वाटलें व तें त्यानें ताबडतोब बोलूनही दाखविलें. शिवाय अनेक ग्रंथ वाचणारा तो विद्यार्थी; लग्नें बहुधा अनुरूप वधूवरांचीं जमत नाहींत हा तेव्हांच्या समाजाचाहि दंडक त्यानें पट्दिशीं बोलून दाखविला व दुष्यंत-शकुंतला-विवाहाचें याप्रमाणें त्यानें अभिनंदन केलें व या आपल्या आपन्नसत्त्व ( गरोदर ) पत्नीचा स्वीकार कर हेंही राजाला सांगून टाकलें. "ही बुरख्यांतील स्त्री कोण" म्हणून निरखून पहाणारा, "अनिर्वर्णनीयं परकलत्रम्" म्हणून शिष्टाचार व्यक्त करणारा, राजा जेव्हां पाहूं लागला कीं ही गरोदर असून

आपली पत्नी म्हणून गळ्यांत पडणार तेव्हां तो गडबडला व म्हणतो— "किमिदमुपन्यस्तम्"? "ही काय भानगड आहे ?" आणि अशा प्रकारें ज्याच्यावर मुग्ध होऊन आपल्या कौमार्याचा बळी शकुंतलेनें दिला होता त्याचें तें भाषण— चार शब्द — ऐकतांच शकुंतला मनांत म्हणते —"हे शब्द म्हणजे नुसता अग्निवर्षाव आहे!" या परिस्थितींत शारङ्गंव म्हणतो –"राजा, तुला लोकरीति माहीत आहे. ही मुलगी आतां आमच्या घरीं ठेवून घेणें बरोबर नाहीं. भर्तृमती आणि पतिव्रता स्त्रीसुद्धां जर माहेरीं फार दिवस राहिली तर ती लोकांच्या चर्चेला पात्र होते. (तेव्हांपासून आमच्या समाजांत या बाबतींत तरी "सनातन" त्वाला धक्का लागलेला दिसत नाहीं.) तेव्हां मुलगी ही नवऱ्याला आवडो न आवडो तिला तिच्या माहेरच्या मंडळींनीं सासरीं पाठविणें हेंच रास्त आहे." हें ऐकून राजा चकित होतो. दुर्वासाच्या शापामुळें त्याची स्मृति नष्ट झालेली असते. शकुंतलेशीं लग्न केल्याचें त्याला कांहीं आठवत नाहीं; आणि तो विचारतो— "या बाईशीं माझें पूर्वी लग्न झालेलें आहे?" या प्रश्नानें शकुंतलेच्या अंतःकरणाचें तर पाणी पाणीच होतें; पण शार्ङ्गरवाला राजाची ती सारी लबाडी दिसते--आणि कोणाला दिसणार नाहीं? आणि त्या राजाच्या दरबारांत, तो असहाय्य ब्रह्मचारी निक्षून विचारतो:—

**किं कृतकार्यद्वेषो धर्मंप्रति विमुखता कृतावज्ञा ।**

"राजा, तुला काय झालें आहे? केलेल्या गोष्टीचा द्वेष वाटतो कां? धर्माला सोडण्याची तुझी इच्छा आहे, कां ज्याचा अनुभव घेतलास त्याचीही अवज्ञा करतोस!" हा प्रश्नांचा भडिमार ऐकून एवढा राजा पण चरकला आणि म्हणतो—"असल्या भलभलत्या कल्पना मजबद्दल कां घेतोस?" शार्ङ्गरव ताबड-तोब उत्तर देतो—

**"मूर्च्छन्त्यमी विकाराः प्रायेणैश्वर्यमत्तेषु" ।**

"ऐश्वर्यामुळें ज्यांना मस्ती आली आहे अशांच्या ठिकाणीं हे सर्व चाळे संभवतात." याप्रमाणें राजाचें तें वर्तन पाहून हा क्रुद्ध झालेला ब्राह्मणकुमार, ब्रह्मचारी, विद्यार्थी त्याच्या भर दरबारांत त्याला ऐश्वर्यमत्त म्हणण्यास चुकत नाहीं.

त्यानंतर शकुंतलेनें बुरखा काढला व राजानें तिला पाहिलें, परंतु ओळखिलें नाहीं. त्या सुंदर रूपाचा त्याला लोभ सुटला, पण आपण प्रथम या रूपाचा उपभोग घेतला हें त्याला आठवेना. असा तो विचारांत असतांना शार्ङ्गरव पुनः विचारतो—"राजा, स्वस्थ कां बसलास?" तेव्हां राजा म्हणतो—"हिचा स्वीकार केल्याचें मला मुळींच आठवत नाहीं. तर या गरोदर स्त्रीचा ही माझी म्हणून मी कसा स्वीकार करूं?" यानंतर शार्ङ्गरव कठोर शब्द बोलूं लागला. बहिणीची अप्रतिष्ठा त्याला सहन होईना. पण त्याचा गुरुबंधु, दुसरा ऋषिकुमार, शारद्वत यानें त्याचें निवारण केलें व तो शकुंतलेला म्हणाला—"आमचें बोलून झालें. आतां राजाला खात्री पटेल असें तूंच त्याला सांग." शकुंतला म्हणाली—"मी भाबडी पोर; आश्रमांत मला वचन देऊन आतां माझा धिःकार करणें रास्त नाहीं." पुढें कांहीं तरी खूण दाखवावी म्हणून राजानें दिलेली अंगठी दाखविण्यासाठीं शकुंतला पाहूं लागली तो अंगठी आपल्या ठिकाणीं नव्हती. झालें! शकुंतलेजवळ ओळखीची खूणही द्यावयास नव्हती; अशा स्थितींत राजाचा नूर बदलला आणि शकुंतला जेव्हां एकांतांत घडलेल्या गोष्टी सांगूं लागली तेव्हां राजा उसळून म्हणाला—"असल्या गोड गोड थापांनीं विषयांध लोक फसतील. मी त्यांतला नाहीं!' 'आणि मग त्यानें कोकिलांचा दृष्टांत देऊन स्त्रिया लबाड असतात असें चक्क सांगितलें. मग शकुंतलेचा संताप अनावर झाला व तिनें राजाला "अनार्य" म्हणून संबोधून कडक शब्दांनीं त्याची पूजा बांधली व मग ती रडूं लागली. तिचें रडणें ऐकून शार्ङ्गरव उसळला. तो निष्पाप, सत्यप्रिय आणि पापभीरु होता. तो रागानें शकुंतलेला म्हणाला—"तुझा मूर्खपणा तुझ्या गळ्यांत आला!

**अतः परीक्ष्य कर्तव्यं विशेषात्संगतं रहः ।**
**अज्ञातहृदयेष्वेवं वैरीभवति सौहृदम् ॥ ५–२४ ॥**

विशेषेंकरून एकांतांत समागम करावयाचा तो सर्व गोष्टींचा विचार करून केला पाहिजे. जेथें परस्परांच्या अंतःकरणाची ओळख नाहीं तेथें मैत्रीला याप्रमाणें (शकुंतलेच्या बाबतींत झालें त्याप्रमाणें) वैराचें स्वरूप येतें. शार्ङ्गरवाचें हें बोलणें खोंचदार होतें. त्यांतील खोंच राजाला समजली. आपल्या अंतःकरणांत काळेंबेरें होतें असा आरोप शार्ङ्गरव आपल्यावर करीत आहे हें पाहून राजा म्हणतो, "अहो राजश्री, या बाईच्या बोलण्यावर विश्वास ठेवून आमच्यावर दोष घालतां काय?" म्हणजे

राजाच्या म्हणण्याप्रमाणें शकुंतला विश्वास ठेवण्यासहि लायक नव्हती; राजाच्या शब्दापुढें तिच्या शब्दाला किंमत नव्हती. आपल्या बहिणीच्या हातून अविचारानें गोष्ट झाली म्हणून शार्ङ्गरव जरी तिच्यावर रागावला तरी एका चुकीमुळें ती पापमय होत नाहीं, अविश्वास्य होत नाहीं, खोटें बोलणारी होत नाहीं, हें तो जाणून होता. आणि राजानें जेव्हां स्वतःस सभ्य म्हणून तिच्यावर अविश्वास्यतेचा आरोप केला तेव्हां हा कुमार शार्ङ्गरव अगदीं निर्भयपणानें बोलला; त्या बोलण्यांत राजाबद्दल पूर्ण तुच्छता होती. जमलेल्या मंडळींना उद्देशून तो म्हणालाः—“ हा ऐकलात उलटा न्याय ! उभ्या जन्मांत जिला लबाडीचें ज्ञान नाहीं तिचें बोलणें अप्रमाण आणि ज्यांनीं लोकांना फसविण्याच्या विद्येचें सशास्त्र अध्ययन केलें आहे ते म्हणे खरें बोलणारे ” ! हे उद्गार राजाच्या दरबारांत राजाच्या तोंडावर एका असहाय, अल्पवयी बालकानें बोलावेत याचें कोणालाहि कौतुक वाटेल. राजा लागलीच म्हणाला, “ अहो, खरें बोलणारे, तुमचें म्हणणें क्षणभर खरें धरलें तरी या बाईला फसवून आम्हांला काय मिळणार ? “ शार्ङ्गरवानें तडकाफडकीं उत्तर दिलें– “ विनाश ! ” आणि मग त्याचा मित्र शारद्वत, जो आतांपयत बोलला नव्हता, तो म्हणतोः–“ शार्ङ्गरवा, बोलून कांहीं फायदा नाहीं. गुरूचा निरोप आपण सांगितला. आतां परत फिरूं या. ” राजाला तो म्हणालाः-- “ही तुझी बायको आहे. हिचा स्वीकार कर नाहींतर तिला टाकून दे. बायकोचें वाटेल तें करण्याला नवऱ्याला पूर्ण मुखत्यारी आहे. ” असें म्हणून तो गौतमीला पुढें हो म्हणून सांगूं लागला. बिचारी गौतमी शकुंतलेची स्थिति पाहून कळवळली आणि रागारागानें जावयास निघालेल्या ऋषिकुमारांना ती म्हणालीः—“ ही शकुंतला पण आपल्या पाठींमागून येत आहे. नवरा जर तिचा स्वीकार करीत नाहीं, तर अशा स्थितींत या बिचाऱ्या पोरीनें काय करावें ? ” शकुंतला आपल्याबरोबर येते असें पाहून संतापलेला शार्ङ्गरव तिच्या अंगावर ओरडला आणि म्हणालाः—“ तुला वाटेल तें करतां येणार नाही. मागें फीर. राजा म्हणतो तसें असेल तर बापाच्या घरीं तूं कशाला येतेस ! बापाच्या नांवाला तूं कालिमा आणलास. आणि जर आपलें व्रत शुद्ध आहे असें तूं जाणत असशील तर नवऱ्याच्या घरीं तुला दासी म्हणून सुद्धां राहिलें पाहिजे. ” आणि राजाला तो म्हणालाः—“ दुसरीकडे मन गुंतल्यामुळें पूर्वी झालेल्या गोष्टींचा विसर तुला पडतो ! तुला अधर्मभीरु कोण म्हणेल ! ” आणि याप्रमाणें तो, शारद्वत व गौतमी यांसह, शकुंतलेला तेथेंच सोडून निघून गेला.

३. हे दोघे ब्राह्मणकुमार, गुरूच्या आश्रमांत अध्ययन करणारे, किती निर्भय होते, खरें बोलण्याची त्यांना कशी डर नव्हती हें आपण पाहिलें; व त्यावरून त्या वेळच्या ब्रह्मचाऱ्यांची कल्पना आपणांस आली. निष्कपटता आणि निर्भयता हीं उत्पन्न होण्याला निर्लोभता आणि निर्दोषता असावी लागते. हा तर त्यावेळच्या गुरुकुलांचा प्रधान गुण होता. तेथें संयमाचें सामर्थ्य सर्व विद्यार्थ्यांच्या आंगीं येत असे. निर्लोभता या गुणाचें वर्णनही रघुवंशाच्या पांचव्या सर्गाच्या सुरवातीला काढलेल्या चित्रांत आपणांस उत्कृष्टपणें पहावयास मिळतें. रघुवंश हा ग्रंथ आर्य संस्कृतीच्या ध्येयात्मक विवेचनाचा शिरोमणि होय असें म्हटलें तर त्यांत अत्युक्ति होण्याचा संभव नाहीं. क्षत्रियकुमारांचीं जीं दोन चित्रें पुढें द्यावयाचीं आहेत तीं याच महाकाव्यांत चितारलेलीं आहेत. रघुवंशाच्या पांचव्या सर्गांत अत्यंत उदार अशा रघुराजाचें वर्णन आहे. त्यानें विश्वजित् नांवाचा मोठा यज्ञ केला आणि त्या यज्ञांत दानधर्माप्रीत्यर्थ आपले सगळे प्रचंड द्रव्याचे प्रचंड खजिने रिकामे केले. त्यामुळें राजा अगदीं निष्कांचन झाला आणि अशा स्थितींत वरतंतु कुलपतीचा शिष्य कौत्स हा त्याला भेटण्यास आला. कौत्स हा गरीब विद्यार्थी होता; आणि गुरूजवळ चौदाही विद्यांचें त्यानें अध्ययन केलें. शिष्याची गरीबी जाणून गुरूनें त्याकडून दक्षिणा घेतली नाहीं. पण कांहींतरी दक्षिणा घ्याच अशी कौत्सानें विनंति केली. दक्षिणा देण्याचें सामर्थ्य शिष्याला नाहीं हें गुरूला माहीत होतें. पण " कांहींतरी दक्षिणा मागाच " असा शिष्यानें हेका धरला. कारण अगदीं फुकट विद्या घेऊं नये असा त्याचा स्वाभिमानपूर्ण हेतु होता. त्यानें अतिशय आग्रह धरला तेव्हां गुरुजी रागावले आणि म्हणालेः—" देणार ना दक्षिणा ? मी तुला चौदा विद्या शिकविल्या आहेत. तर प्रत्येक विद्येचे एक कोटी याप्रमाणें चौदा कोटी रुपये आणून दे. " तेव्हां एवढें द्रव्य गोळा करण्यासाठीं कौत्स बाहेर पडला व रघूची दानशीलतेबद्दल कीर्ति ऐकून त्याच्याजवळ गेला. त्यानें त्याला मातीच्या भांड्यांतून अर्घ्य दिलें, तेव्हां कौत्स समजला कीं राजा निष्कांचन झाला आहे; त्याचें अर्घ्यपात्रसुद्धां मातीचें आहे. राजाबरोबर औपचारिक चार गोष्टी बोलून तो जावयास निघाला. पण राजा कांहीं झालें तरी व्यवहारज्ञ होता. हा ब्राम्हण कांहीं केवळ कुशल प्रश्न विचारण्यासाठीं आला नव्हता हें त्यानें ताडलें. कौत्साला राजा म्हणतोः—" तुझ्यासारखा योग्य पुरुष भेटला एवढ्यानें माझें समाधान होत नाहीं. तुझें कांहीं तरी कार्य माझ्या

हातून व्हावें अशी माझी इच्छा आहे. तूं आलास तो गुरूच्या आज्ञेवरून आलास कां स्वतः होऊन आलास तें मला सांग. ” तेव्हां कौत्साला स्पष्ट बोलणें भाग पडलें. “आपण मृत्तिकापात्रानें अर्घ्यप्रदान केलें त्यावरून आपली निष्कांचनता दिसून आली. मी तर द्रव्यार्थी आहें. तेव्हां मी दुसरीकडे जातों. अर्थात् आपली दानशीलतेमुळें उत्पन्न झालेली निष्कांचनता ही आपल्याला कमी-पणा आणीत नसून आपला मोठेपणाच दर्शविते. चंद्राचें अमृत देव क्रमाक्रमानें पितात; आणि म्हणून त्याचा कलाक्षय हा कलावृद्धीपेक्षांही अधिक श्रेष्ठ आहे.” पण राजानें त्याला सांगितलें–“बाबा, इतक्यांत जाऊं नकोस. तूं द्रव्यार्थी नाहींस; गुरुदक्षिणेसाठीं तुला द्रव्य पाहिजे. तुझ्यासारखा वेद जाणणारा विद्वान् ब्राह्मण रघू-कडे आला आणि रघूच्या हातून त्याचें कार्य न झाल्यामुळें तो दुसऱ्या एखाद्या उदार दात्याकडे गेला अशी माझी अपकीर्ति जगांत व्हावयास नको. तर दोन तीन दिवस येथें रहा आणि तेवढ्या वेळांत तुला पाहिजे तेवढें द्रव्य देण्याची मी खट-पट करतों.”

राजाच्या सांगण्यावरून कौत्स राजाच्या अभ्यागारांत राहिला. राजानें विचार केला कीं आपल्या प्रजेकडून आतां पैसा मिळणें शक्य नाहीं; जमिनींतूनही विपुल धन आपण काढलें आहे तेव्हां तिकडूनही कांहीं मिळणार नाहीं; तेव्हां जेथें धन विपुल असेल तिकडूनच तें आपण आणलें पाहिजे; आणि म्हणून त्यानें कुबेराकडून द्रव्य आणावयाचें असें ठरविलें. गरीबांवर भार न टाकतां कुबेरा-सारख्या धनिकाकडून जरूर ते पैसे मिळवावयाचे हा रघूचा निश्चय पाहून राज्याच्या जमाखर्चाचें शास्त्र त्याला पूर्ण योग्य प्रकारें अवगत होतें असें स्पष्ट दिसतें. “ ज्याच्याजवळ आहे त्याकडून घ्यावें ” हा सिद्धांत मोठा महत्त्वाचा आहे व त्याचें अनुसरण करण्याचें रघूनें ठरविलें आणि पहांटे उठून कुबेरावर स्वारी करावयाची असा त्यानें निश्चय केला. रथांत शस्त्रास्त्रांचा भरपूर भरणा करून रघु रथांतच झोंपला; त्यामुळें उशीर होण्याची भीति उरली नाहीं. आलेल्या अतिथीचे हेतु पुरविण्यासाठीं एवढी उत्सुकता दाखविणारा राजा दानशूरत्वाच्या धांदलींत पराक्रम विसरला नव्हता, ही लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. कुबेर बोलूनचालून जसा पैसेवाला तसा पराक्रमशून्य. त्यानें विचार केला कीं रघूसारख्या पराक्रमी राजापुढें आपला निभाव लागणार नाहीं. तेव्हां त्यानें येऊन जबरदस्तीनें धन नेण्यापेक्षां आपणच त्याला विपुल धन द्यावें म्हणजे आपली अप्रतिष्ठा होणार

नाहीं आणि चांगुलपणाही पदरांत येईल. आणि अशा हेतूनें त्यानें पहांट होण्याच्या पूर्वीच सोन्याची एक मोठी रासच्या रास रघूच्या खजिन्यापुढें टाकून दिली. रघूच्या प्रयाणाची वेळ आली तेव्हां खजिन्यांतल्या नोकरांनीं ती सोन्याची प्रचंड रास—टेकडीसारखी दिसणारी—पाहिली व त्यांना मोठें आश्चर्य वाटलें. खजिना कोरडा ठणठणीतच झाला होता; पण पुढें सुवर्णपर्वत येऊन पडला आहे ही गोष्ट रघूला अर्थात् त्या नोकरांनीं सांगितली व धन आणण्यासाठीं त्याला मग जाण्याचें कारणच पडलें नाहीं. त्यानें लागलीच कौत्साला बोलाविलें आणि सांगितलं–" बाबा, हें सर्व द्रव्य तुझें आहे; घेऊन जा." कौत्सासाठीं राजाला द्रव्य पाहिजे होतें, स्वतःसाठीं नको होतें, म्हणून त्यानें आलेलं द्रव्य किती आहे, याचा हिशोबसुद्धां न करतां तें त्या ब्राह्मणकुमाराला घेऊन जाण्यास सांगितलें. ही राजाची निर्लोभता केवळ अवर्णनीय होय. जेथें राजा असा निर्लोभ तेथें तरणा बांड ब्राह्मण विद्यार्थी कसा असणार ? त्यानं सांगितलं–" मला गुरुदक्षिणेसाठीं चौदा कोटी रुपये किंमतीचें सोनें पाहिजे. तेवढेंच मी घेणार. हा एवढा ढीग मला काय करावयाचा ? " तो जर आधुनिक काळच्या द्रव्ययुगांतला सुधारलेला माणूस असता तर त्यानें ही निर्लोभता दाखविली नसती आणि अगोदर राजानं त्याच्यावर तो प्रसंगच आणला नसता. पण हा राजाही निर्लोभ. तो म्हणाला—" मला धन नको होतें; सर्व तुझ्यासाठीं आहे आणि तुलाच नेलं पाहिजे." आणि अशा प्रकारें गुरुदक्षणेहून अधिक एक कपर्दिकाही नको म्हणणारा याचक आणि याचकाला कल्पनेपलीकडे देणारा राजा या दोघांचं मोठं कौतुक वाटून अयोध्याच्या लोकांनीं त्या दोघांचेंही अभिनंदन केलं. ही राजाब्राह्मणांची जोडी सध्यांच्या लोभातिरेकाच्या युगांत कल्पनेलाही अगम्य वाटते. सांगावयाची गोष्ट ही कीं कौत्सासारख्या विद्यार्थिदशेंतून नुत्तयाच बाहेर पडलेल्या तरुणाची ही वृत्ति होती. हुंडा मिळावा म्हणून हपापलेल्या आणि विद्येचा खर्च बायकोच्या जीवावर भागवूं पाहणाऱ्या कित्येक आधुनिक तरुणांचं चित्र आणि हें कौत्साचें चित्र यांची तुलना केली म्हणजे काय विचार मनांत येतात बरें ? त्यांची परिस्फुटता न करितां तें मनांत ठेवण्याचें तूर्त ठरवावें हें ठीक दिसतें. असो. राजानें तो सुवर्णाचा ढीग पुष्कळशा उंटांच्या पाठीवर घालून कौत्साबरोबर पाठविला. ज्याच्या ठिकाणीं यत्किंचितूही लोभ नाहीं त्यालाच आकाशांतूनसुद्धां सुवर्णाची वृष्टि मिळविण्याचें सामर्थ्य असतें ही गोष्ट कौत्साला पटली व त्यानं गोड शब्दानें राजाला "तुला तुझ्यासारखाच पुत्र होवो" म्हणून

आशीर्वाद दिला. या ठिकाणीं राजाचें चित्र मोठें खुलवून काढलें आहे. पण त्याच ठिकाणीं असलेलें निर्लोभ ब्राह्मणकुमाराचें चित्र वाचकांनीं ठळकपणें लक्षांत ठेवावें. कालिदासानें वर्णिलेले बालक जसे विस्मयकारक तसेच त्याचे तरुणही आहेत आणि त्यांचा कित्ता सध्यांच्या तरुणांनीं पुढें ठेवण्यासारखा आहे.

४. क्षत्रिय कुमारांच्या ज्या दोन उदाहरणांचा वर उल्लेख आला तीं अनुक्रमें रघुवंश सर्ग ३ व सर्ग ११ यांत आलेलीं आहेत. तिकडे आतां आपण वळूं. रघुवंशाच्या पहिल्या सर्गात दिलीप राजा पुत्रप्राप्तीविषयीं उत्सुक आहे असें सांगून त्यानें सपत्नीक गुरु वशिष्ठाकडे जाऊन त्यासंबंधीं उपाय विचारला व वशिष्ठानें कामधेनूची कन्या नंदिनी ही त्याच्या हवालीं करून तिची सेवा करून तिला प्रसन्न करून घे म्हणजे तुझी इच्छा पूर्ण होईल असें सांगितलें आणि त्याप्रमाणें राजानें केलेल्या गोसेवेचें मोठें उदात्त वर्णन दुसऱ्या सर्गात आलें आहे. या सेवेचें फल म्हणजे पुत्रप्राप्ति ही झाल्याचें वर्णन तिसऱ्या सर्गाच्या सुरवातीला आहे व याच सर्गात हा मुलगा म्हणजे रघु क्रमाक्रमानें मोठा झाला, त्याचे सर्व संस्कारही यथाक्रम झाले वगैरे वर्णन आलें आहे. त्याच्या पित्यानें म्हणजे दिलीप राजानें त्याच्या शिक्षणाची उत्तम व्यवस्था केली होती आणि मुलगा शहाणा होऊन पित्याचीं कामें आंगावर घेण्यासारखा तयारही झाला. राजपुत्राचें नांव रघु कां ठेविलें हें सांगतांना कालिदासानें थोडीशी कोटि केलेली आहे. रघु या नांवांत जो धातु आहे तो गमनार्थक आहे; आणि आपल्या मुलानें विद्येच्या अगदीं शेवटापर्यंत जावें, तसेंच युद्धामध्यें शत्रूची फळी फोडून त्यानें आंत घुसावें अशी दिलीपाची आकांक्षा होती आणि म्हणून त्यानें मुलाचें नांव रघु ठेविलें. रघूची बौद्धिक व शारीरिक वाढ फार उत्तम प्रकारें झाली, असें कवीनें वर्णन केलें आहे; म्हणजे आईबापांनीं मुलांच्या शारीरिक व मानसिक वाढीकडे यथाकाल यथायोग्य लक्ष्य पुरविलें पाहिजे असा त्याचा कटाक्ष स्पष्ट ध्वनित होतो. मुलाचें वर्णन करितांना उमा व शंकर यांना जसा कुमारामुळें किंवा इंद्र आणि शची यांना जसा जयंतामुळें तसाच आनंद दिलीप आणि सुदक्षिणा यांना झाला असें वर्णन कवीनें केलें आहे. हळूहळू सर्व विद्या त्यानें हस्तगत केल्या व त्याच्या ठिकाणीं सर्व गुणांचा उत्तम विकास झाला. मौंजीबंधनानंतर गुरूकडे त्याचें यथासांग व यथाविधि अध्ययन झालें, आणि मनानें जसा तो उन्नत तसा शरीरानेंही डोळ्यांत भरण्यासारखा असा झाला. त्याचें शरीर गंभीर व मनोहर असें दिसूं लागलें. सौंदर्य असलें किंवा

यौवन असलें कीं गांभीर्याचा अभाव असावा हा प्रकार आपल्या कवीला संमत नाहीं. पुढें रघूचा विवाह झाला. त्यावेळच्या पद्धतीप्रमाणें त्यानें अनेक भार्या केल्या. शरीराची आकृति व मुसमुसणारें तारुण्य यांच्या योगानें रघु पित्यापेक्षांही मोठा दिसूं लागला; तथापि आपल्या आंगच्या विनयामुळें तो लहानच वाटे असें खुबी-दार वर्णन करून रघूच्या मानसिक विकासाचें खरें गमक कवीनें वाचकांपुढें ठेविलें आहे. तरुणांच्या मनाचा विकास होण्याला कोणत्याही प्रकारचा प्रतिबंध वडिलांनीं करूं नये किंवा त्यांच्या आकांक्षांना आड येऊं नये हें जितकें खरें तितकेंच तरुणांनीं वडिलांशीं अदबीनें वागावें हेंही खरें आहे. मुलें मोठीं झालीं, शहाणीं झालीं म्हणजे वडिलांना आनंद व्हावा हें स्वाभाविक आणि आवश्यक आहे; त्याचप्रमाणें ज्यांनीं आपल्याला जन्म दिला, आपल्या पोषणाची व शिक्षणाची तरतूद केली, आपले सर्व लाड पुरविले, आपल्या आनंदानें जे आनंदित व दुःखानें दुःखी झाले त्या आपल्या मातापितरांबद्दल, वडिलांबद्दल, तरुणांनाही सदोदित आदर वाटावा हें आवश्यक आहे. पुढें योग्य काळीं रघूला पित्यानें युवराजपदावर बसविलें आणि मुलगा कर्तासवरता झालेला पाहून दिलीपानें शंभर अश्वमेध करण्याचें उदक सोडलें. या यज्ञांत संपूर्ण जग जिंकण्यासाठीं जो घोडा सोडावा लागतो त्याच्या रक्षणाचें काम दिलीपानें रघूकडे— आपल्या एकुलत्या एक पुत्राकडे—सोंपविलें. तें काम रघूनें फार उत्कृष्ट प्रकारें केलें आणि ९९ वेळां दिग्विजय करून पित्याचे ९९ अश्वमेध यज्ञ यथासांग पार पाडले. शंभराव्या अश्वमेधाच्या वेळीं स्वर्गाचा इंद्र नेहमींप्रमाणें गडबडला. शंभर अश्वमेध करणारा इंद्रपदवी मिळवितो अशी त्या यज्ञाची फलश्रुति आहे आणि म्हणून पुराणांतला इंद्र शंभराव्या यज्ञाला नेहमीं विघ्न करतो अशी कथा आहे. या कथेवरून पुराणांतील इंद्र चैनी, आळशी, भित्रा, कर्तृत्वशून्य असा वाटतो आणि जगांत जे कित्येक नामधारी राजे आहेत त्यांची आठवण आपल्याला होते. या विचित्र इंद्राजवळ युद्धाचीं शस्त्रास्त्रें नसून तो आपला कार्यभाग अप्सरा, सुधा आणि कपट यांच्या साहाय्यानें साधतो. वृत्राचा वज्रानें वध करणारा ऋग्वेदांतील इंद्र आणि पुराणांत भेटणारा नृत्यलोलुप आणि कर्तृत्वशून्य इंद्र यांचें केवल नामसादृश्य, याशिवाय कसलेंच नातें दिसत नाहीं.

शंभराव्या यज्ञाच्या वेळीं रघूच्या अश्वाला अडविण्यासाठीं प्रत्यक्ष इंद्र आला. गुप्त रूप धारण करून त्यानें घोडा पळविला. अर्थात् घोडा पळविला हें रघूला कळलें पण तो कोणी पळविला हें कळण्यास मार्ग नव्हता. तेव्हां त्या प्रसंगीं जिच्या कृपेनें रघूचा

जन्म झाला होता ती वशिष्ठ ऋषींनीं दिलेली नंदिनी तेथें आली. तिनें आपल्या अंगाचें पाणी रघूच्या नेत्रांना लावल्याबरोबर त्याला दिव्य दृष्टि प्राप्त होऊन, सामान्य माणसांना जें दिसणार नाहीं तें दिसणें शक्य झालें. आपल्या घोड्याला घेऊन रथांत बसून इंद्र झपाट्यानें पळत सुटला आहे आणि त्याचा सारथी रथाच्या घोड्यांना सारखी तांतडी करतो आहे असा देखावा त्या दिव्य दृष्टीमुळें त्याला दिसला. इंद्रासारख्या कामरूपधारी देवाचेंसुद्धां भय रघूला वाटलें नाहीं. इतकेंच नव्हे तर त्यानें लागलीच खूप मोठ्यानें ओरडून इंद्राला हांक मारिली आणि मागे फिरण्यास सांगितलें. इंद्रासारख्या प्रचंड धेंडाला हा बालवयस्क क्षत्रिय म्हणतोः—"हे देवेंद्रा, यज्ञांतील आहुति घेणारांमध्यें तुझा मान पहिला आहे असें शहाणे सांगत आले आहेत; तेव्हां ज्यानें यज्ञदीक्षा घेतली आहे अशा माझ्या पित्याच्या यज्ञकार्याला जर तूंच विघ्न करण्याला तयार झाला आहेस तर विधिच मुळांत च्युत झाला असें म्हटलें पाहिजे. तूं दिव्यचक्षु आहेस, त्रिलोकनाथ आहेस, यज्ञाच्या शत्रूंचा तूं वास्तविक बंदोबस्त करावास, पण येथें तर धर्मकार्यांत तूं विघ्न उत्पन्न करतो आहेस, तेव्हां आतां धर्मकार्यें होणार तरी कशीं ? तर तूं माझा घोडा मला परत दे. कारण त्याच्याशिवाय यज्ञ होणार नाहीं. श्रुतीचा मार्ग म्हणजे सन्मार्ग तो दाखविणें हें तुझ्यासारख्या मोठ्यांचें काम, आणि मोठे लोक मलिन अशा मार्गाचा अवलंब करीत नसतात." हें स्पष्ट आणि निर्भय भाषण ऐकून इंद्र चकित झाला आणि त्यानें आपला रथ परतवून उत्तर देण्याला सुरवात केली. तो म्हणालाः—"हे राजकुमारा, यश हें माझें धन आहे, आणि त्या यशाचें रक्षण मला केलें पाहिजे. तुझा पिता तर शंभर यज्ञ करून माझ्या यशावर मात करण्यासाठीं उभा राहिलेला आहे. विष्णु म्हणजे एकच पुरुषोत्तम, महेश्वर म्हणजे एकच त्र्यंबक, त्याचप्रमाणें शतक्रतु हा शब्द फक्त मलाच लागू पडतो. तो दुसऱ्याला लागू पडणारा शब्द नाहीं. तेव्हां हा घोडा मी नेणार. माझ्यापुढें तुझें कांहीं चालणार नाहीं. हा परत नेण्याचा यत्नसुद्धां करण्यांत अर्थ नाहीं. कपिलाच्या पाठीमागें लागणाऱ्या सगर राजाच्या संततीची जी अवस्था झाली तीच अवस्था, माझ्याशीं गडबड करशील, तर तुझी होईल." आपलें दैवी सामर्थ्य व शरीरसामर्थ्य या दोहोंचेंही भय या मुलाला दाखवून आपला कार्यभाग होईल असें इंद्राला वाटलें होतें. परंतु रघु अल्पवयी असला तरी अस्सल क्षत्रियाचा बच्चा होता; त्याला इंद्राच्या या गुरगुरण्याची बिलकुल भीति

वाटली नाहीं. कालिदासानें एकाच शब्दांत रघूनें काय केलें याचें वर्णन दिलें आहे. इंद्राचें व्याख्यान ऐकून तो बालवीर हंसला. इंद्रासारख्या प्रचंड व्यक्तीनें एवढें आवेशपूर्ण भाषण करून भय दाखविण्याचा प्रयत्न करावा आणि रघूसारख्या बालकानें तें ऐकून फक्त हंसावें यासारखी त्या इंद्राची दुसरी फटफजिती नाहीं. या एका शाब्दिक वर्णनांत रघूच्या निर्भय मनःस्थितीचें व पराक्रमी वृत्तीचें जें चित्र आमच्या कविराजेश्वरानें काढलें आहे तें शेंकडों शब्द खर्चूनही दुसऱ्या कोणास काढतां यावयाचें नाहीं. रघु हंसला म्हणजे इंद्राची त्याला बिलकुल पर्वा वाटली नाहीं हें उघड आहे, आणि हंसून तो एवढेंच म्हणालाः—" घोडा न सोडण्याचा जर तुझा निश्चय असेल तर हातांत शस्त्र घे आणि युद्धाला उभा रहा. रघूला जिंकल्याशिवाय तुला यश मिळणें शक्य नाहीं." याप्रमाणें अत्यंत वीरोचित असें आव्हान करून कमजास्त कांहीं न बोलतां रघूनें मोठें तुमुल युद्ध करून इंद्राला अगदीं जर्जर केलें. तें त्याचें सामर्थ्य पाहून व त्याचें वीर्यातिशयत्व पटून इंद्र खूष झाला. (या ठिकाणीं कवीनें इंद्राचें वर्णन वृत्रहा असें केलें आहे. लढाई करणारा इंद्र तो वृत्रहा आणि यज्ञांत विघ्न उपस्थित करून सुधा व अप्सरा यांत कालक्रमणा करणारा तो स्वर्गपति हा भेद अर्थात् कालिदासाच्या मनांत होताच ) आणि खूष झालेला इंद्र रघूला म्हणालाः—" माझ्या शस्त्रांचा मार सहन करण्याचें सामर्थ्य पर्वतांत सुद्धां नाहीं.पण तें तुझ्या ठिकाणीं आहे. तुझ्यावर मी खूष झालों आहें. हा घोडा कांहीं मी तुला परत देणार नाहीं. तेवढें सोडून तूं पाहिजे तें माग." रघूनें उत्तर दिलें:—" घोडा पाहिजे तर तूं ने. कारण इंद्रपदाची पर्वा माझ्या पित्याला नाहीं. मात्र शंभर यज्ञ केल्याचें यश त्याला पाहिजे व यज्ञसिद्धीचें फळ मिळालें पाहिजे. तसेंच कोणत्या परिस्थितींत मी तुला हा घोडा नेऊं देण्यास तयार झालों आहें ही हकीकतही माझ्या वडिलांना तत्काळ कळविण्याची व्यवस्था तूं कर." इंद्रानें तथास्तु म्हणून या लढ्याचा शेवट लावला. रघु घरीं परत गेला आणि प्रत्यक्ष इंद्राशीं निर्भयपणें दोन हात करून यशस्वी होऊन आलेल्या सुपुत्राचें अभिनंदन दिलीपानें केलें. आपल्या पुत्राच्या ठिकाणीं इंद्राला पराभूत करण्याचेंच सामर्थ्य आहे एवढें नव्हे तर यज्ञांचें फळ जो स्वर्ग त्याची पित्याला पर्वा नाहीं, शंभर यज्ञ केल्याचें फक्त यश त्याला हवें आहे हें सांगण्याचें, वंशाच्या ब्रीदाचें, ज्ञानही त्याच्याजवळ आहे हें पाहून त्याच्या पित्याला धन्यता वाटली. क्षात्रवृत्तीचें हें रमणीय चित्र पाहून आपणांलाही आज कौतुक वाटल्याशिवाय रहात नाहीं.

५. दुसरें वर्णन प्रत्यक्ष रामचंद्राच्या बालपणाचें आहे व तें रघुवंशाच्या अकराव्या सर्गांत आलेलें आहे. हा अकरावा सर्ग खरोखर बालकांची तेजस्विता, निर्मलता, आज्ञाधारकत्व व निर्भयता यांचें अत्यंत मनोहर चित्र दाखवितो. विश्वामित्र ऋषि दशरथ राजाकडे आला आणि "माझ्या यज्ञाला विघ्न होत आहे तेव्हां त्याचें निवारण करण्याकरितां रामाला मजबरोबर पाठवून दे" अशी त्यानें त्याला विनंति केली. यावेळीं राम वयानें लहान होता. त्याचीं झुलपें त्याच्या बाळपणाची साक्ष देत होतीं. दशरथाला मुलें झालीं तीं मोठ्या नवसा—आयासानें झालेलीं. यज्ञरक्षणासाठीं राजाचें साहाय्य न मागतां एवढ्या लहान मुलाची योजना विश्वामित्रानें कां केली अशी कोणासही शंका येईल. तिचें समाधान कालिदासानें सुरवातीच्या श्लोकांतील सुंदर सुभाषितानें केलेलें आहे. ( तेजसां हि न वयः समीक्ष्यते ) जे तेजस्वी आहेत त्यांच्या वयाचा विचार करण्याची जरूरी नाहीं, असा त्या सुभाषिताचा अर्थ आहे. विश्वामित्रानें योजना केल्याप्रमाणें, आपल्या अतिशय लाडक्या मुलाला त्या कार्यासाठीं पाठवून देण्याचें दशरथानें कबूल केलें व लक्ष्मणास त्याजबरोबर देतों म्हणून सांगितलें. विश्वामित्राची असली कठीण इच्छा राजानें ताबडतोब पूर्ण केली याचें कोणास आश्चर्य वाटेल; पण रघुवंशाची परंपराच अशी होती कीं जरी कोणी प्राणाची याचना केली तरी ती निष्फळ होत नसे. तेव्हां मुलांना धाडण्याला दशरथानें तत्काळ तयार व्हावें हें त्या परंपरेला धरूनच होतें. पण त्याहीपेक्षां मौजेची गोष्ट ही कीं त्या मुलांनींही जाण्याबद्दल उत्सुकता दर्शविली. एवढीं लहान मुलें पण राक्षसांना घाबरलीं नाहींत व जाण्याला आनंदानें तयार झालीं. कारण ते खरे क्षत्रियाचे छावे होते. भय ही कल्पनाच त्यांच्या अंतःकरणांत नव्हती. निर्भयता हें क्षात्रवृत्तीचें किंबहुना निर्व्याज बालवृत्तीचें प्रतीक आहे ही गोष्ट कवीनें या वर्णनांत उत्कृष्टपणें ध्वनित केली आहे. एवढ्या राजाचीं मुलें चाललीं तेव्हां बरोबर शिपाईप्यादे पुष्कळ सरंजाम गेला असेल अशी आपली समजूत होईल. तिचेंही कवीनें निराकरण केलें आहे. राजा दशरथानें मुलांच्याबरोबर शिपाईप्यादे कोणीही दिले नाहींत. त्यांना फक्त आशीर्वाद दिला. कवि म्हणतो कीं तो आशीर्वादच त्यांच्या रक्षणाला समर्थ होता. दशरथाचें बळ परायत्त नव्हतें तर स्वायत्त होतें त्यामुळें त्याचा आशीर्वाद हा मोठ्या सैन्यांपेक्षांही बलिष्ठ होता. ज्याच्या केवळ आशीर्वादानें साऱ्या दुनियेंत निर्भय होण्याचें भाग्य लाभतें असा पिता रामलक्ष्मणांला मिळालेला होता.

आणि ते जात्याही निर्भय व विक्रमशाली होते. असो. आपल्या मातांना नमस्कार करून तीं मुलें हंसत खेळत विश्वामित्राबरोबर निघालीं; या वर्णनांतही त्यांची निर्मळता, निर्भयता व प्रभावशालीनता हीं व्यक्त होतात. दुसरी गोष्ट अशी कीं विश्वामित्र हा कांहीं सामान्य ऋषि नव्हता. प्रतिसृष्टि निर्माण करण्याचें त्याचें सामर्थ्य; त्याला यज्ञाला विघ्नें करणाऱ्या राक्षसांचें निवारण करणें कांहीं अशक्य नव्हतें; पण या राजपुत्रांना पराक्रमाची संधि द्यावी आणि त्यांना नवीन अस्त्रविद्या शिकवून त्यांच्यावर अनुग्रह करावा अशा सदिच्छेनें त्यानें दशरथाकडे जाऊन ती याचना केली होती, आणि असल्या प्रभावसंपन्न सद्गुरूजवळ असणाऱ्या मुलांना कसलेंही भय नाहीं हेंही दशरथाला कळणें साहजिक होतें. असें हें सत्पिता, सद्गुरु व सत्पुत्र यांचें काढलेलें चित्र पाहून आपली दृष्टि क्षणभर तन्मय झाल्याशिवाय रहात नाहीं. केवळ आशीर्वादाच्या बळावर मुलांबाळांना सर्व दुनियेंत निर्भयता प्राप्त करून देणारा पिता, प्रतिसृष्टि उत्पन्न करण्याचें सामर्थ्य असल्यामुळें प्रत्यक्ष विधात्याशीं स्पर्धा करणारा गुरु, आणि पित्यानें जा म्हटल्याबरोबर आनंदानें हंसत खेळत गुरूची कार्यसिद्धि करण्याला जावयास निघालेलें बालक--हा आर्यसंस्कृतीच्या परिस्थितींतला देखावा फारच मनोहर आहे. मुलांच्यावद्दल शंकाकुशंका यांनीं व्याकुळ झालेले आईबाप, आपलें कसें होईल या भयानें गांगरलेलीं मुलें आणि शिकवतां शिकवतां आपली विद्या संपेल कीं काय या भयानें गडवडलेले संकुचित ज्ञानाचे आणि अल्पप्रभावाचे गुरु हें प्रत्यक्ष सृष्टींत दिसणारें दृश्य आणि कालिदासाच्या सृष्टींतील उपरोक्त चित्र यांतील अंतर पाहून क्षणभर चमत्कार वाटल्यावांचून रहात नाहीं.

रामलक्ष्मण विश्वामित्राबरोबर गेले आणि त्यानें त्या बालवीरांना बल आणि अतिबल या अस्त्रविद्या शिकविल्या. रस्त्यानें जातां जातां पुष्कळ मजेदार अशा गोष्टी पण त्यांना त्यानें सांगितल्या. म्हणजे विश्वामित्रासारखा थोर ऋषि त्या मुलांबरोबर कसा वागत होता हेंही आपणांस कळतें. गुरु म्हणजे विद्यार्थी गांगरला पाहिजे अशी परिस्थिति उत्पन्न करणारा प्राणी: ही गुरुविषयीं उग्र कल्पना कित्येकांनीं करून घेतली आहे ती कालिदासानें ध्येयभूत धरलेल्या आर्यसंस्कृतींत नसावी असें या वर्णनावरून दिसतें. असो. रामलक्ष्मणांनीं यज्ञविघ्नकर्त्या राक्षसांना शासन करण्याचें कार्य उत्कृष्टपणें पार पाडलें हें सांगावयास नकोच. पुढें जनक राजानें सीतेचें स्वयंवर मांडलें होतें तिकडे म्हणजे मिथिला नगरीला विश्वामित्र रामलक्ष्मणांना घेऊन गेला.

तेथें परशुरामाचें प्रचंड धनुष्य रामानें सहज मोडून टाकलें—हें धनुष्य वाकविण्याच्या प्रयत्नांत रावणासारखा दशमुख व द्विदशहस्त राक्षसही उताणा पडला होता—आणि अशा प्रकारें जानकीचा लाभ रामचंद्राला झाला. जनकानें लग्नासाठीं दशरथाला मिथिला नगरीस बोलाविलें व राम आणि त्याचे तिघेही भाऊ या सर्वांचे विवाह होऊन वऱ्हाडी अयोध्येकडे परतले. आपलें धनुष्य रामचंद्रानें मोडलें हें वृत्त ऐकून क्रुद्ध झालेला परशुराम त्यांना वाटेंत भेटला. परशुरामाचा पराक्रम दशरथाला चांगला भोंवलेला होता त्यामुळें तो आल्याबरोबर राजाची गाळण उडाली. एकवीस वेळ निःक्षत्रिय पृथ्वी करणाऱ्या वीराच्या आगमनवार्तेनें दशरथ गडबडला हें स्वाभाविक होतें; पण तारुण्य आणि उत्साह यांची मूर्ति असा जो रामचंद्र तो बिलकूल भ्याला नाहीं. "माझें धनुष्य तूं मोडलेंस !" असें म्हणून परशुरामानें मोठा आरडाओरडा केला. त्याला रामानें उत्तर दिलें त्याचें वर्णन खरोखर आश्चर्यकारक आहे. एक शब्दही न बोलतां रामानें आपलें धनुष्य हातांत घेतलें आणि अशा प्रकारें परशुरामाच्या बडबडीला त्यानें क्रियेचें सणसणीत उत्तर दिलें, आणि परशुरामाच्या अवताराची याप्रमाणें उत्तरक्रिया केली. या वर्णनांतही तारुण्यांत बडबडीपेक्षां कृतीची हौस, आणि कृतीचा जोर हीं असलीं पाहिजे हें कवीनें उत्कृष्टपणें ध्वनित केलें आहे. अशा प्रकारें दोन ब्राह्मण-कुमारांचीं व दोन क्षत्रिय कुमारांचीं ही चित्रें काढून विद्यार्थिदशेंत आदर्श कुमार कसे असावेत याची कल्पना कवीनें आणून दिलेली आहे ही कल्पना जशी आश्चर्यकारक तशीच चित्तवेधकही आहे यांत शंका नाहीं. या चित्रांकडे पाहून प्रस्तुत काळच्या तरुणांनीं, त्यांच्या मातापित्यांनीं, त्यांच्या गुरुंनीं, सर्व कांहीं शिकण्यासारखे आहे. हीं चित्रें अंतःकरणास पटून जर कृतींत उतरलीं तर आपल्या देशाचें दुर्भाग्य संपण्याला फारसा वेळ लागणार नाहीं.

६. वर जीं चारपांच वर्णनें दिलीं त्यांवरून ध्येयरूप कुमारांचीं चित्रें कालिदासानें कशी काढिलीं आहेत हें दिसून येतें. काव्य हें वस्तु व ध्येय यांच्या मिलाफानें बनत असतें. ध्येयदर्शी काव्य हें वस्तुस्थितीला विसरत नाहीं. तसेंच वस्तुदर्शी काव्यही ध्येयाला नेहमीं अंतःकरणांत पारखत असतें. कालिदासानें हीं जीं ध्येयरूप चित्रें काढलीं आहेत, त्यांखेरीज बालस्वभावाविषयीं आणि विद्यार्थिदशेंतील चालचलणुकीसंबंधीं त्यानें ठिकठिकाणीं लहानलहान सफाईदार वर्णनें केलेलीं आहेत. त्यांवरून बालस्वभावासंबंधीं त्याचें सूक्ष्म व मार्मिक

अवलोकन सिद्ध होतें. राजपुत्र अज हा स्वयंवराला गेला त्यावेळीं त्याच्या स्वारीचें वर्णन करतांना, पहांट झाल्यावर बंदीजनांनीं गुणगायन करून त्याला जागें केलें असें वर्णन आलें आहे. जागा झाल्याबरोबर तो ताबडतोब उठून बसला, त्यानें आळोखेपिळोखे देण्यांत तासभर वेळ घालविला नाहीं, किंवा तो बिछान्यावर आणखी कांहीं वेळ लोळत राहिला नाहीं असें चित्र कवीनें दाखविलें आहे. उत्तम प्रकृतीचें लक्षण चांगली झोंप येणें; चांगल्या निद्रेचें लक्षण, पूर्णपणें विश्रांति मिळाल्यामुळें जागें झाल्यावर चट्‌दिशीं उठून बसणें आणि पुढच्या कार्यक्रमाला लागणें; यावरून त्या राजपुत्राच्या शारीरिक व मानसिक सुदृढतेची आपल्याला कल्पना येते. विश्वामित्राबरोबर रामलक्ष्मण गेले त्याचें वर्णन करतांना, निरनिराळे देखावे पहाण्याची व निरनिराळ्या मौजेच्या गोष्टी ऐकण्याची मुलांना कशी उत्सुकता असते हेंही आपणांस कळतें. कुमारसंभवांत शिव बटूचें रूप घेऊन पार्वतीची परीक्षा घेण्यास आला त्यावेळीं तिची सगळी हकीगत त्यानें विचारली, तेव्हां मुलें अशा तऱ्हेची चौकशी करतात असें या वर्णनावरून सूचित होतें.

बालसृष्टीचें वर्णन करतांना वास्तविक कौमारावस्थेंतील स्त्रियांचींही वर्णनें आलीं पाहिजेत. परंतु स्त्रियांचीं निरनिराळ्या परिस्थितींतील वर्णनें या ग्रंथांत पुढें स्वतंत्र भागांत दिलेलीं आहेत म्हणून त्यांचा उल्लेख येथें केलेला नाहीं. कुमारसंभवांत पार्वतीचें जें चित्र आहे तें विद्यार्थिदशेंतील कुमारिकेचें आहे आणि त्यांत तिचा दिसणारा तेजस्वीपणा, दृढनिश्चय, तपश्चर्येची तयारी आणि जो पति आपणाला पसंत पडला त्याला वरण्याबद्दल आटोकाट प्रयत्न करण्याचें सामर्थ्य इत्यादि गुण आपणांस तल्लीन करतात. तिच्या अंतःकरणांत प्रणयाचा प्रादुर्भाव झाला होता आणि केवळ रूपसंपदेच्या जोरावर इच्छित वरप्राप्ति शक्य नाहीं असें ज्यावेळीं तिला पटलें तेव्हां तपश्चर्येनें आध्यात्मिक योग्यता प्राप्त करून घेण्याचा निश्चय तिनें केला आणि तो उत्तम प्रकारें पार पाडला. कालिदासानें ज्याप्रमाणें तेजस्वी व मनस्वी बाळकांचीं चित्रें काढलेलीं आहेत, त्याचप्रमाणें पार्वतीचें हें चित्र आहे, एवढें या ठिकाणीं म्हटल्यावांचून राहवत नाहीं.

हिंदुस्थानांतील तरुण पिढीपुढें कर्तृत्वशालीनतेसाठीं, पराक्रमासाठीं आणि अंतःकरणाच्या भावनाशीलतेसाठीं काय आदर्श असावेत याचा विचार करतांना कालिदासानें

आपल्या काव्यांत चित्रित केलेले आदर्श हे खरोखर स्पृहणीय आहेत, अत्यंत चिंतनीय आहेत, आणि अनुकरणीय आहेत असें वाटल्यावांचून रहावत नाहीं. बुद्धिमत्ता, ज्ञानलालसा, सदाचरण, सत्यनिष्ठा आणि शारीरिक कष्ट करण्याची संपूर्ण तयारी अशा गुणांतून कर्तृत्व आणि पराक्रम हीं निर्माण होतात आणि त्या गुणांचीं भव्य चित्रें कधीं वाच्यार्थानें आणि बहुधा ध्वन्यर्थानें कालिदासानें काढून ठेविलीं आहेत. त्यांचें स्पष्टीकरण, संस्कृतमधून इंग्रजींत भाषांतर करण्याच्या गडबडींत आणि व्याकरणाच्या रूपांचीं कोडीं उलगडण्याच्या धांदलींत आजपर्यंत आपण करण्याला विसरलों असें म्हणण्यास हरकत नाहीं. भाषेचें स्वरूप उत्तम समजणें हा जसा महाविद्यालयीन काव्याभ्यासाचा एक हेतु आहे, त्याप्रमाणें हें ज्ञान झाल्यानंतर त्यापेक्षां महत्त्वाचा हेतु म्हणजे काव्याचें अंतरंग आपणांला कळणें आणि कवीनें ध्वनित केलेलीं, ध्वनिरूपानें वर्णिलेलीं तत्त्वें व ध्येयें, ज्ञान आणि आनंद आणि सौंदर्य, यांची अंतःकरणाला बरोबर ओळख करून देणें हा होय आणि याच दृष्टीनें येथें उल्लेखिलेल्या बालगोपालांच्या चित्रांकडे पाहण्याचा आपण प्रयत्न केलेला आहे.

पुढच्या भागांत कालिदासानें निर्माण केलेली स्त्रीसृष्टि आपण अवलोकन करूं व वरील दृष्टीचा त्याही ठिकाणीं अवलंब करूं.

# भाग चौथा

## स्त्रीसृष्टि

श्रुतं दृष्टं स्पृष्टं स्मृतमपि नृणां ल्हादजननं
न रत्नं स्त्रीभ्योऽन्यत् क्वचिदपि कृतं लोकपतिना ।
तदर्थं धर्मार्थौ विभववरसौख्यानि च ततो
गृहे लक्ष्म्यो मान्याः सततमबला मानविभवैः ॥

१. कालिदासानें स्त्रियांचीं जीं चित्रें आपल्या काव्यनाटकांतून काढलेलीं आहेत तीं जगांतील कोणत्याही महाकवीच्या स्त्रीचित्रांप्रमाणें मनोहर आणि आकर्षक अशीं झालेलीं आहेत हें नव्यानें सांगण्याची आवश्यकता नाहीं. परंतु आर्यसंस्कृतीच्या दृष्टीनें या चित्रांत कांहीं विशेष आकर्षकता आहे ही गोष्ट त्यांचा निरनिराळ्या प्रकारांनीं अभ्यास केल्यानंतर लक्षांत आल्यावांचून रहात नाहीं. स्त्रियांबद्दलची कालिदासाची दृष्टि एकप्रकारें आश्चर्यकारक आहे. त्याच्या ठिकाणीं स्त्रियांबद्दल अतिशय दाक्षिण्य आहे. साध्या वर्णनांतसुद्धां स्त्रियांशीं वागण्याचे जे परिपाठ त्यानें दर्शविलेले आहेत ते या काळीं हिंदुसमाजांत विशेष लक्षांत ठेवण्यासारखें आहेत. राजानें रथांतून खालीं उतरून नंतर पत्नीला उतरून घेणें, छावणींत हत्ती बेफाम सुटला असतांना सैनिकांनीं प्रथम स्त्रियांच्या रक्षणाची व्यवस्था करणें, रामचंद्रानें सीतेचा त्याग केल्यानंतर वाल्मीकीसारख्या परमपूज्य महर्षीच्या मुखानें रामचंद्राच्या वागण्याचा स्पष्ट निषेध प्रदर्शित करणें, शकुंतलेसारख्या बालिकेवर आग पाखडण्याचा पौरुषेय पराक्रम दुष्यंतानें केल्यावर कण्वशिष्याच्या मुखानें त्याची फटफजीती उडविणें, पार्वतीसारख्या कन्येला योग्य वरप्राप्ति व्हावी म्हणून तिच्या मातापितरांनीं तदर्थ घोर तपश्चर्येला अनुमोदन देणें, शकुंतलेबद्दल दृष्टि साफ झाल्यानंतर दुष्यंताला तिच्या पायांवर डोकें ठेवून क्षमा मागण्यास लावणें, आणि अरुंधतीचें वर्णन करतांना धर्मपत्नीचें अलोट कौतुक करणें व यक्षाच्या मुखांत आपल्या पत्नीबद्दल उदार आणि हृदयंगम असे उद्गार घालणें आणि ते घालतांना स्त्रीविशिष्ट नाजुकपणाचें चित्र मोठ्या कुशलतेनें रंगविणें — हें सर्व लक्षांत घेतलें म्हणजे स्त्रियांच्या वर्णनांत अशी दृष्टि ठेवणारा, त्यांचीं अशीं चित्रें रंगविणारा कालिदास हा प्राचीनकालीन "सनातनी" विचारांचा "हिंदु" नसून अगदीं आधुनिक विचाराचा आहे असें वाटावयास लागतें.

कालिदासानें स्त्रियांचीं वर्णनें निरनिराळ्या परिस्थितींतील केलेलीं आहेत. शकुंतलेच्या चित्रांत ( अभिज्ञानशाकुंतल नाटक ) कुमारिका, पत्नी आणि माता या स्त्री-जीवनाच्या तीनही अवस्था एका विशिष्ट पार्श्वभूमीवर कवीनें चित्रित केल्या आहेत. कुमारसंभवांतील पार्वती ही कुमारिका आणि विवाहोत्सुक तरुणी अशी दाखविलेली आहे. तिच्या वर्णनाची पार्श्वभूमि ही शकुंतलेहून निराळी आहे आणि तिचा स्वभावही अगदीं भिन्न दाखविला आहे. रघुवंशांत वर्णन केलेली सीता ही पत्नी आहे. शकुंतला, पार्वती, सीता हीं कालिदासाच्या स्त्रीसृष्टींतील प्रमुख चित्रें आहेत. त्याचप्रमाणें प्रसंगानुरोधानें एवढीं मोठीं नव्हेत पण लहान अशीं स्त्रियांचीं वर्णनें पुष्कळ ठिकाणीं आलेलीं आहेत; आणि अशा प्रकारें निरनिराळें वय, स्थिति आणि प्रसंग यांचीं वर्णनें आपणांस पहावयास मिळतात. रघुवंशाच्या पहिल्या सर्गात पुत्रोत्सुक स्त्री वर्णिलेली आहे. सहाव्या सर्गात स्वयंवराला उभ्या राहिलेल्या मुलीचें वर्णन आहे. मेघदूतांत विरहदुःखित असलेल्या पत्नीचें वर्णन आहे. कुमारसंभवाच्या चौथ्या सर्गात वैधव्याचा भयंकर प्रसंग जिच्यावर ओढवला आहे अशा रतीचा विलाप आहे. मालविकाग्निमित्रांत बहुपत्नीकत्वामुळें निर्माण होणाऱ्या गृहस्थितीचें चित्र आहे. कुमारसंभवांत अरुंधतीचें वर्णन थोडक्यांत पण अतिशय हृदयंगम आहे. पण सर्वापेक्षां शकुंतला, पार्वती आणि सीता यांची चित्रें डोळ्यांत विशेष भरतात यांत शंका नाहीं. प्राचीन काळच्या आर्यसंस्कृतींतील स्त्रियांचीं भरतखंडाच्या कविराजराजेश्वरानें काढलेलीं हीं चित्रें असल्यामुळें त्यांच्या गुणावगुणांचा सूक्ष्म अभ्यास करून, स्त्रियांच्याबद्दल म्हणून हिंदुसमाजांत ज्या रूढ कल्पना आहेत आणि ज्या आपण "सनातनी" म्हणून समजतों त्यांचा कालिदास पुरस्कार करतो कां त्यांहून दुसऱ्या कांहीं कल्पनांचा तो पुरस्कार करतो हें आपण निश्चित करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. शिवाय बालिका, पत्नी, माता या निरनिराळ्या अवस्थांत जे प्रसंग उत्पन्न होतात, आणि जीं कर्तव्यें करावीं लागतात, त्यांविषयीं कालिदास काय सूचित करतो, कोणतें ध्येय पुढें ठेवतो हेंही पाहण्यासारखें आहे. कविता लिहिण्याचें ठिकाण म्हणजे व्यासपीठ नव्हे हें जितकें खरें, तितकेंच ध्वनिमत्व हा काव्याचा फार मोठा भाग आहे हेंही खरें आणि म्हणूनच कवि हा ध्वनिबलानें तत्त्वज्ञानी, अंतर्ज्ञानी, त्रिकालज्ञानी यांच्याही वरच्या पायरीला पोहोंचतो. कालिदासाची व्यंजना फार अभ्यसनीय आहे आणि अर्थात् फार रम-

णीय आहे. उदाहरणार्थ, ब्राह्मविवाह कालिदासाला अभिनंदनीय वाटत होता असें कुमारसंभवांतील वर्णनावरून दिसतें. शिव–पार्वतींचा परस्पर प्रेम प्रकट करण्याचा प्रसंग झाल्यावर (कालिदास प्रेम व अनुरूपता यांचा मोठा पुरस्कर्ता होता) "आतां आपण परस्परांचे झालों" असें महादेवानें सुचविलें; तेव्हां ती मुलगी त्याला म्हणाली—"कन्यादान करण्याचा माझ्या पित्याचा अधिकार आहे. तेव्हां आपण त्याची अनुमति घ्यावी." ही अनुमति शिवानें सप्तर्षी पाठवून मिळविली व ती पार्वतीच्या मातापितरांनीं मोठ्या आनदानें दिली. सप्तर्षींबरोबर अरुंधतीही आली होती. वशिष्ठ–अरुंधतीचें दांपत्य पाहून आणि तिला सर्व ऋषि किती आदरानें वागवीत हें पाहून "गृहस्थाश्रम" हा फार उत्कृष्ट आश्रम आहे अशी महादेवाची खात्री झाल्याचें वर्णन कवीनें केलें आहे. तसेंच लग्नकार्यांच्या कामांत स्त्रियांचें साहाय्य पाहिजेच हाही सिद्धांत कवीनें जातां जातां सांगून टाकला आहे, व लग्नें जमविण्याच्या बाबतींत हौस हा स्त्रीस्वभावाचा विशेष ध्वनित केला आहे. शकुंतलेवर जो भयंकर प्रसंग आला त्यामुळें तिला राजपुरोहिताच्या घरीं राहावें लागणार असें दिसत होतें, त्या प्रसंगीं तिला आपल्या आईकडे अद्भुत रीतीनें पाठविणाऱ्या कवीचें कौतुक वाटल्यावांचून रहात नाहीं. अशा निरनिराळ्या परिस्थितींतील स्त्रियांच्या अंतःकरणाचीं कालिदासानें केलेलीं वर्णनें त्याच्या महाकवित्वाची साक्ष पटविण्यास पुरेशीं आहेत. त्यानें शेक्सपीअरप्रमाणें पुष्कळ नाटकें लिहिलीं नाहींत, पण त्याचीं काव्यें हीं खरोखर त्याच्या नाटकांपेक्षांही फार महत्त्वाचीं आहेत व त्यांमध्यें मनुष्यस्वभावाची विविधता उत्कृष्टपणें चित्रित केली आहे. स्त्रियांच्याबद्दल वस्तु व ध्येय या दोहों दृष्टीनें कालिदासाचीं वर्णनें विशेषेंकरून शकुंतला, पार्वती, सीता यांच्याबद्दल फार आल्हादनीय आहेत. तिकडे आपण आतां क्रमाक्रमानें वळूं.

२. प्रथम आपण शकुंतला घेऊं. युरोपीय पंडितांत कालिदासाची विशेष कीर्ति त्याच्या अभिज्ञानशाकुंतल या नाटकामुळेंच झाली आहे. या नाटकामुळेंच आणि मेघदूतामुळें त्या पंडितांनीं कालिदासाला जगांतील महाकवींत स्थान दिलेलें आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. रघुवंश आणि कुमारसंभव हीं महाकाव्यें युरोपीय पंडिताच्या नजरेला विशेष आलीं आहेत असें म्हणतां येणार नाहीं. गटेसारखा रसज्ञ ग्रंथकार शाकुंतल नाटक वाचूनच आनंदातिशयानें नाचला. असो. शाकुंतल नाटकांत जी कथा आहे ती खरोखर दुष्यंताची नसून शकुंतलेची

आहे. शकुंतलेच्या आयुष्यांत दुष्यंत केवळ विधिवशात् येतो असें म्हणणें सयुक्तिक होईल. रानावनांत, ऋषिमुनींच्या आश्रमांत वाढलेली, कुलपति कण्वाच्या शिष्यवृंदांनीं बहिणीसारखी वागविलेली, पक्षी आणि जनावरें यांच्या सहवासांत आनंद मानणारी, निसर्गसौंदर्य, फुलें व फळें आणि लतावृक्ष यांच्या सान्निध्यांत निमग्न असलेली अशी शकुंतला नाटकाच्या सुरवातीला आपल्या दृष्टीस पडते. तिनें कौमारावस्थेंत प्रवेश केलेला आहे. शृंगाराचें बाळसें अगोदरच अकृत्रिम सौंदर्यानें मुसमुसलेल्या तिच्या शरीरावर चढलेलें आहे. तिच्या अंतःकरणांत नवीन नवीन इच्छा, वासना व भावना उत्पन्न होण्याचा काळ आलेला आहे. तिचें अंतःकरण निर्मळ व भावनासुलभ आहे. जगांतील, व्यवहारांतील शहाणपण व छक्केपंजे तिला बिलकुल माहीत नाहींत. मुत्सद्देगिरी म्हणजे सभ्यपणाचा पोशाख घातलेली लबाडी ही काय असते हें तिला माहीत नाहीं. अशा परिस्थितींत दुष्यंतासारख्या शहराच्या वातावरणांत वाढलेल्या, राजनीतींत मुरलेल्या आणि व्यवहाराच्या तत्त्वज्ञानांत कसलेल्या अशा पुरुषाशीं तिची गांठ पडते आणि सहजच त्यानें तिच्याविषयीं आदर व प्रेम दर्शविल्यानंतर तिच्याही अंतःकरणाचा ओढा त्याच्याकडे धावतो. हा जो नवा अनुभव तिला येतो त्यासंबंधीं ती विचारणार तरी कोणाला? आणि सल्लामसलत घेणार तरी कोणाची? तिच्याबरोबर असणाऱ्या तिच्या दोघी मैत्रिणी तिच्यासारख्याच निष्पाप व अननुभवी बालिका. त्यांना ती त्या राजाविषयीं विचारते; आणि त्याही, अशा तऱ्हेचे चांगले दिसणारे पुरुष भलत्यासलत्या प्रकारें वागणार नाहींत, अशी तिला ग्वाही देतात. बाह्य देखाव्यावर भुलून जाण्याचा हा प्रसंग यौवनकालांत प्रत्येकावर येतो आणि तोच शकुंतलेवर आला. आणि जो प्रकार पुष्कळांचा होतो तोच तिचा झाला. भावनेच्या तडाख्यांत सांपडून विचाराचें किंवा परीक्षणाचें स्मरणही न होतां ती दुष्यंतावर भाळली. अशी ही एका निष्पाप परंतु जगाची माहिती नसलेल्या कुमारिकेची कथा आहे. जें जें चकाकतें तें सोनें नव्हे याच न्यायानें जें जें आकृतिविशेष असतें तें तें गुणविशेष असतेंच असें नाहीं असा या चमत्कारिक जगांत विचारी जनांना अनुभव आलेला आहे. आणि म्हणूनच आकृतीकडे पाहून अंतःकरणांत लोभ उत्पन्न झाला तरी आकृतीच्या मागें प्रकृति काय आहे किंवा असावी याचा विचार करून त्या लोभाला क्रियात्मक स्वरूप द्यावें किंवा नाहीं याचा निर्णय करावा लागतो. हा निर्णय करण्याची शक्यता तारुण्याच्या

उषःकालांत भावनेनें अंतःकरण भरून गेलें असतांना फारशी नसते. म्हणून अशा प्रसंगीं जें वर्तन घडतें त्याबद्दल तरुणांस गुन्हेगार समजण्याचें कारण नाहीं. पण त्यांच्या हातून प्रमाद होऊं नयेत यासाठीं त्यांच्या आप्तेष्टांना अतिशय काळजी घ्यावी लागते. दुर्दैवानें शकुंतला अशा परिस्थितींत सांपडली होती कीं तिचा धर्मपिता जवळ नव्हता आणि अनुरागाचा झपाटा इतका जोराचा होता कीं तिनें स्वतः विवेक करणें ही गोष्ट शक्य नव्हती. तथापि तिच्या अंतःकरणांत जी प्रणयभावना उत्पन्न झाली होती तिला सदोष प्रणयभावना असें म्हणणें अनुचित होईल. प्रणयभावनेंत उपभोगेच्छा असतेच, पण केवळ उपभोगेच्छा म्हणजे मात्र प्रणयभावना नव्हे. उपभोगेच्छेबरोबर नवीन निर्मितीची आकांक्षा इत्यादि अनेक सुंदर व जगदुपयोगी गोष्टी येतात व त्या सर्वांच्या समवायाला प्रणयभावना म्हणतात. तथापि, उपभोगेच्छा ही प्रणयांत असतेच आणि म्हणून तिला सर्वथैव दूषणीय समजणें हें दूषणीय समजलें पाहिजे. शंकरानें पार्वतीचा स्वीकार करून तिला आपल्या प्रणयाची स्वामिनी केली म्हणजे त्यानें आणि पार्वतीनें आपल्या अत्यंत उज्ज्वल अशा प्रेमाला अनुसरून परस्परांचा आनंद उपभोगिला. ते कांहीं केवळ तपश्चर्येची चर्चा करीत बसले नाहींत (परंतु त्या आनंदाच्यापूर्वी दोघांनींही खडतर तपश्चर्या केली होती) ही गोष्ट लक्षांत ठेविली म्हणजे शकुंतलेनें जें केलें त्यांत जरी ती फसली तरी त्या फसण्याचा दोष तिच्याकडे न जातां ज्यानें तिला फसविली किंवा ती फसण्याला जो कारणीभूत झाला त्याच्याकडे जातो. कुमारसंभवांत वर्णन केलेलें शिवपार्वतीचें प्रेम तपश्चर्येच्या पायावर दृढ झालेलें आहे तर शाकुंतलांतील प्रेम केवळ आकर्षण व भावना यांच्या कक्षेंतून बाहेर पडलेलें आहे. त्यामुळें तें दूषित ठरत नाहीं तर अपक्व ठरतें. शाकुंतलांतील पहिल्या तीन अंकांतील प्रेम सदोष व शेवटच्या अंकांतील प्रेम निर्दोष असें ज्या टीकाकारांचें म्हणणें आहे त्यांना सातव्या अंकांतील शकुंतलेचें स्वरूप कळलेलें नाहीं असें म्हणणें प्राप्त आहे. पहिल्या तीन अंकांतील शकुंतला ही प्रणयमुग्ध कुमारिका आहे. सातव्या अंकांतील शकुंतला ही माता आहे. पहिल्या तीन अंकांत शृंगाररस मुसमुसतो आहे. सातव्या अंकांत त्याचा वारासुद्धां नाहीं. पहिल्या तीन अंकांत परस्पराकृष्ट प्रणयीजनांच्या लोलुप अंतःकरणाची परिस्फुटता आहे तर सातव्या अंकांत व्यवहाराचा अनुभव आलेली व अंतःकरणांतून उपभोगेच्छा किंवा

विषयवासना नाहींशी झालेली अशी माता आपल्याला दर्शन देते. पहिल्या तीन अंकांत प्रणय आहे. सातव्या अंकांत दुष्यंताचा शकुंतलेबद्दल पूज्यभाव आहे. प्रणय-मुग्ध बालिका आणि निर्मितिकार्यांतून पार पडलेली म्हणून माता यांच्या भावनांना एकच म्हणणें किंवा पहिल्या भावना अशुद्ध होत्या त्या दुसरीच्या ठिकाणीं शुद्ध झाल्या असें म्हणणें प्रमादयुक्त आहे. पहिल्या तीन अंकांतील प्रणयमुग्ध शकुंतला ही चवथ्या व पांचव्या अंकांत पत्नीच्या रूपानें आपल्याला दृष्टीस पडते व पत्नीवर येणाऱ्या संकटांतून ती जात असतांना आपण पहातों. त्या संकटांचा तडाखाही एवढा जबरदस्त आहे कीं त्यामुळें यौवनसुलभ भावना तिच्या अंतः-करणांतून नाहींशा झाल्या आणि ती तपस्विनी बनली. कुमारिका, पत्नी, माता या तीन अवस्था स्त्रियांना प्राप्त होतात आणि या तिन्ही अवस्थांचें वर्णन एका विशिष्ट पार्श्वभूमीवर कालिदासानें शकुंतलेच्या रूपानें केलेलें आहे.

३. शकुंतलेशीं दुष्यंत ज्या प्रकारें वागला त्याचा त्याच्याकडे दोष येऊं नये म्हणून कालिदासानें शकुंतलेला शाप झाल्याची आणि त्यामुळें दुष्यंताला विस्मृतीची बाधा झाल्याची कथा नवीन रचून नाटकांत घातली आहे. कालि-दासाला आपला नायक नाट्य-शास्त्राच्या नियमानुसार धीरोदात्त दाखवावयाचा होता म्हणून त्यानें ही अशी योजना केली. त्यांत त्याचें संविधानकचातुर्य उत्कृष्टपणें प्रत्ययाला येतें. मूळ महाभारतांत जी कथा आहे तिच्यांत दुष्यंत हा व्यवहार-चतुर म्हणजे ढोंगी दाखविला आहे; आणि लोकापवादाच्या भयानें तो शकुंतलेचा स्वीकार करीत नाहीं असें वर्णन आहे. महाभारतांतील शकुंतला ही पुत्रजन्मा-नंतर पांचसहा वर्षांनीं पतीकडे जाते आणि तो आपला स्वीकार करीत नाहीं असें पाहतांच ती त्याच्यावर शिव्याशापांचा इतका बेदम भडिमार करते कीं अशा तऱ्हेचें बोलणें आर्यस्त्रियांना उचित नाहीं असें म्हणण्याचा मोह मोरोपंताचे रसिक पुरस्कर्ते टीकाकार कै. श्री. बा. म. हंस यांनाही झाला. महाभारतांत किंवा रामायणांत काय तीं आद्य काव्यें असल्यामुळें त्यांत कांहीं झालें तरी कृत्रिम असणाऱ्या कलेचा आविष्कार नसून सहजवर्णनांवर अधिक भर आहे. त्यांतील सौंदर्य निराळें आणि कालिदासासारख्या कलावंतानें निर्मिलेलें सौंदर्य निराळें. शिवाय व्यासवाल्मिकीच्या कालापेक्षां कालिदासकालीन समाजही अधिक गुंतागुंतीचा म्हणजे अधिक कृत्रिम होता. त्यावेळीं समाजांत स्त्रियांनीं वागण्याबद्दल कांहीं निर्बंध होते ते प्राथमिक काळांत असण्याचें कारण नाहीं. कालिदासाची शकुंतला ही अर्थात्

कांहीं प्रमाणांत त्याच्या काळची कल्पना देणारी असावी यांत नवल नाहीं. पण कालिदासाचें विशेष कौशल्य हें कीं अतिविनयवती म्हणून कल्पिलेली शकुंतला-सुद्धां दुष्यंत जेव्हां तिच्या शीलावर हल्ला करतो तेव्हां नागिणीसारखी चवताळते आणि त्याला "कितव" म्हणून अपशब्द बोलण्याला मागेंपुढें पहात नाहीं. कालिदासानें वर्णन केलेली कोणतीही स्त्री पतीकडूनसुद्धां आपल्या शीलावर शिंतोडा उडवून घेण्यास तयार नसते हा त्याच्या आर्यस्त्रीवर्णनाचा विशेष आहे यांत शंका नाहीं.

दुष्यंताची गांठ पडल्यापासून तों त्याच्याशीं समागम होईपर्यंत शकुंतलेचें जें चित्र कालिदासानें रेखाटलें आहे त्यांत अर्थात् शृंगार हा प्रधान रस आहे; त्याचप्रमाणें निष्पाप बालिका आणि व्यवहारज्ञ पुरुष यांची गांठ पडल्यावर तीं दोघें कशीं वागतात याचें काढलेलें चित्र वस्तुस्थितीला धरून आहे. वास्त-विक दुष्यंताच्या आकृतिविशेषावर भाळणारी, त्याच्या गोडगोड थापांना भुलणारी आणि आपल्या पित्याला न विचारतां गांधर्व-विवाहविधीवर भिस्त ठेवून दुष्यंताला शरीरदान करणारी शकुंतला ही थोडीशी जरी व्यवहारज्ञ असती तर हा केवळ मृगयेसाठीं बाहेर पडलेला राजा आपल्याला पाहिल्याबरोबर उल्लू बनतो काय आणि आपल्याशीं प्रणयचेष्टा करतो काय याबद्दल ती थोडी तरी साशंक झाली असती. परंतु ती या सर्व बाबतींत अज्ञान होती. आणि राजा तर मोठ्या अदबीनें आणि गोड गोड बोलत होता. पोटांत कांहींही असो बाहेर गोड बोलणें ही तर राजकारणांतील ग्यानबाची मेख आहे. पण तें बिचाऱ्या शकुंतलेला काय माहीत ! आपलें अंत:-करण जसें स्वच्छ तसेंच त्या आकर्षक दिसणाऱ्या राजाचेंही असावें असें तिला वाटलें. केवळ स्वत:वरून तिनें जगाची परीक्षा केली; कण्वाच्या आश्रमां-तील पवित्र आणि सुंदर वातावरण जगभर पसरलेलें असलें पाहिजे अशी तिची समजूत होती. दुष्यंताला पुढें जें विस्मरण झालें तें दुर्वासानें शकुंतलेला दिलेल्या शापामुळें झालें असलें तरी पहिल्या तीन अंकांत दुष्यंत ज्या प्रकारें वागतो तो प्रकार त्याच्याबद्दल वाचकाचा किंवा प्रेक्षकाचा ग्रह अनुकूल करण्यासारखा नाहीं. घरीं कण्व नसतांना शकुंतलेच्या रूपावर मोहित होऊन तिच्यावर झडप घालण्याचा विचार मनांत आणणें, व कण्व येण्यापूर्वी आपला इच्छित हेतु तडीला नेणें ही गोष्ट सभ्यपणाची किंवा धीरोदात्तपणाची द्योतक आहे असें म्हणतां येणार नाहीं. परंतु राजेलोकांचा किंवा सत्ताधारी अगर ऐपत-

वानांचा धीरोदात्तपणा हा त्या त्या काळीं निश्चित झालेला असतो आणि राजे किंवा सत्ताधारी किंवा ऐपतवान नसलेले लोक ज्या वागणुकीनें गुन्हेगार ठरतील, तशाच प्रकारच्या वागण्यानें ही दुसरी मंडळी गुन्हेगार मुळींच ठरत नाहींत आणि आलेल्या आरोपांतून सहीसलामत सुटतात असें आपण इतिहासांत वरचेवर पहातों. सध्यांच्या काळीं मोटरगाडी हांकतांना होणारे गुन्हे हे त्या गाड्या हांकणारे किंवा बाळगणारे बहुतेक लोक गुन्हेच समजत नाहींत आणि त्यांना जी शिक्षा होते ती त्या अपराधानें माणूस मरण पावलें तरी दंडाच्या पलीकडे बहुतकरून जात नाहीं; आणि म्हणून हे अपराध ज्यांच्या हातून होतात त्यांना आपण भयंकर गुन्हा केला आहे याची जाणीव होत नाहीं; व त्यांच्या स्नेहपाशांत, द्रव्यपाशांत किंवा सत्तापाशांत असणाऱ्या लोकांनाही तो गुन्हाच वाटेनासा होतो. तेव्हां दुष्यंताच्या काळचे राजे लोक जसे वागत तसाच तो वागला व त्याचें यथातथ्य चित्र कवीनें काढलेलें आहे हें उघड आहे. अशा तऱ्हेची वागणूक ही त्या वेळच्या राजेलोकांच्या धीरोदात्तत्वाला बाध आणीत नसे. तेव्हां दुष्यंताच्या या वर्तनाचा पुरस्कार कालिदासानें केलेला आहे असें म्हणणें किंवा कालिदास हा राजवटींत वाढलेला माणूस म्हणून त्यानें राजे लोकांच्या दोषांना दोष म्हणणें शक्य नव्हतें असें गृहीत धरणें या गोष्टी भ्रममूलक आहेत. झालेल्या प्रकाराचें यथातथ्य चित्र काढून त्यांतून निष्पन्न होणारा दोष कवीनें ध्वनित केलेला आहे व कवीनें यापेक्षां अधिक करावेंच असें नाहीं; यापेक्षां अधिक कांहींही करण्याच्या भानगडींत त्यानें पडूंच नये असेंही म्हणणाऱ्यांचा पंथ आहेच. असो. सातव्या अंकांत तर कवीनें दुष्यंताला आपल्या वागणुकीबद्दल शकुंतलेच्या पायीं पडण्यास लावून प्रायश्चित्त दिलेलें आहे असें आपल्याला दिसून येतें. दुष्यंत आपल्या नगरीला परत गेल्यानंतर तो आपल्या व्यवसायांत निमग्न झाला आणि मृगयेसाठीं भटकतांना एखादी पोर आपल्या सुखासाठीं नाडणें म्हणजे कांहीं लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे असेंही कदाचित् तो समजत नसेल. शकुंतलेच्या हातून काय झालें हें तिच्या पित्याला अंतर्ज्ञानानें समजलेलें होतें असें कवि म्हणतो. त्यानें आश्रमांत परत आल्यावर शकुंतलेला दोष न देतां अनुरूप पति शोधून काढल्याबद्दल समाधानच व्यक्त केलें. आपल्या अपत्यांना वागविण्याची ही पद्धति आधुनिक कालांतील आईबापांनीं लक्षांत ठेवण्यासारखी आहे. अर्थात् दुष्यंत आपल्या धर्मकन्येला

का. ५

फसवणार नाहीं अशी कण्वाची श्रद्धा होती हें त्याच्या चौथ्या अंकांतील वागण्यावरून स्पष्ट होतें.

४. चवथ्या अंकांत गरोदर असलेल्या शकुंतलेला पतीकडे पाठविण्याचें कण्वानें ठरविलें व तिच्याबरोबर गौतमी व दोन शिष्य देऊन तिची रवानगी केली असा वृत्तांत आला आहे. या प्रसंगीं माहेर सोडून जावयास निघालेल्या शकुंतलेचें कालिदासानें जें चित्र रंगविलें आहे तें हृदयंगम आहे; आणि तिचा वियोग होतांना कण्वासारख्या थोर महर्षीच्या अंतःकरणांत जी कालवाकालव झाली तिचें वर्णन वाचून हिंदुस्थानांतील पंडित तर शतकानुशतकें कालिदासाची तारीफ करीत आले आहेतच; पण याच वर्णनामुळें प्रतीच्य पंडितांनाही त्याच्या आश्चर्यकारक कवित्वशक्तीबद्दल आणि मनुष्याच्या अंतःकरणांतील गूढ भावनांना परिस्फुटता देण्याच्या सामर्थ्याबद्दल मोठें कौतुक वाटलें हें सुप्रसिद्ध आहे. शकुंतला निघतांना लतावृक्षांचा निरोप घेते आणि मृगबालक तिची वाट अडवितो हें वर्णन वाचून कोणाही सहृदय वाचकाचे डोळे ओलावल्यावांचून रहात नाहींत. आश्रमवासिनी शकुंतलेचें कण्वानें ऊर्फ कश्यपानें केलेलें वर्णन खरोखर मोठें कुतूहलकारक आहे. तपोवनांतील वृक्षांना उद्देशून कण्व म्हणतोः—"आज ही शकुंतला सासरीं चालली; सर्वांनीं तिला जाण्याची अनुज्ञा द्यावी. तुम्हांला पाणी घातल्याशिवाय ती स्वतः कधीं पाणी प्याली नाहीं. फुलें घालून अंग सुशोभित करण्याची जरी तिला फार हौस आहे तरी तुमच्यावर असलेल्या प्रेमामुळें ती तुमचें पानसुद्धां तोडीत नसे. तुम्हांला फुलें येण्याचा मोसम आला कीं प्रथम आनंद तिला होत असे." या वर्णनांत शकुंतलेच्या अंतःकरणाचें जें दर्शन आपणांस घडतें त्यावरून दुष्यंतासारख्या व्यवहारांत मुरलेल्या आणि परातिसंधानाचें अध्ययन केलेल्या पुरुषाशीं तिची गांठ पडावी हा एक दैवाचा दुर्विलास आहे असें वाटल्यावांचून रहात नाहीं. शकुंतला मधून मधून एकादेंच वाक्य बोलते. त्यावरूनही तिच्या अंतःकरणाची स्थिति आपल्या लक्षांत येते. सर्वांनीं अनुज्ञा दिल्यावर ती म्हणतेः—"गडे प्रियंवदे, पतीच्या दर्शनासाठीं मी उत्सुक झालें आहे हें खरें, परंतु हा आश्रम सोडून जातांना जो दुःखाचा आवेग आलेला आहे त्यामुळें माझीं पावलें नीटपणें पुढें पडत नाहींत." आणि जावयाला निघालेली ती पुनः परतते आणि म्हणते :—"बाबा, माझी लता भगिनी जी वनज्योत्स्ना तिला मी विचारून येतें." आणि वनज्योत्स्नेजवळ जाऊन शकुंतला तिला म्हणतेः—"वनज्योत्स्ने, जरी

प्रियकर आम्रतरूच्या सहवासांत तूं आहेस तरी या तुझ्या शाखारूप बाहूंनीं मला भेट ग. आजपासून मी येथून फार दूर जाणार आहें." पुढें जाण्यापूर्वी ती आपल्या पित्याला आणखी सांगते:—"बाबा, ही हरिणी गाभण आहे. ती सुखरूपपणें व्याली म्हणजे मला कळवा." तसेंच हरिणबालक ती जातां-जातां जेव्हां आडवा येतो तेव्हां ती म्हणते:— "बाळा, तुम्हांला सर्वांना मी सोडून चाललें, तूं माझ्या पाठीमागें कशाला येतोस ? तूं उपजलास तेव्हां तुझी आई गेली. तेव्हांपासून तुला मी वाढविला. आतां मी जरी येथें नसलें तरी माझे बाबा आहेतना ? ते तुझी काळजी घेतील. तर आतां तूं परत जा. मला जाऊं दे." आणि मग ती घळघळा रडूं लागली. तिच्या सख्याही अश्रु ढाळीत होत्या. करुण-रसाच्या या वर्णनांत कालिदासानें जें आश्चर्यकारक वातावरण निर्माण केलें आहे तें पाहून आपलें अंतःकरण अगदीं हेलावून जातें आणि त्याच्या या आनंदमय, प्रेममय, सौंदर्यमय, कल्याणमय तपोवनांतून बाहेर पडतांना आपलींसुद्धां पावलें जड होतात. त्या तपोवनांतील तो आनंद, ती निष्पापता, ती निर्भयता, तें प्रेम, हीं या प्रत्यक्ष सृष्टींत, या कटु व्यवहारानें भरलेल्या संसारांत, आपणांस कधीं पहा-यला मिळतील का अशी उत्सुकता आपल्या मनांत उत्पन्न होते. शकुंतलेनें लतेची आणि हरिणबालकाची निरवानिरव केलेली पाहून तिच्या सख्या विचारतात, "गडे, तूं तर चाललीस पण आम्हांला तूं कोणाच्या पदरांत टाकलेंस ?" आणि त्या रडूं लागतात व कण्व त्यांना समजावितो. तेव्हां आपलेंही अंतःकरण उचंबळून येतें आणि शकुंतलेवरचें आपलें वात्सल्य वृद्धिंगत होतें. असो. व्यवहाराचें चक्र चाललेलें आहे. त्यांतून कोणालाही सुटका नाहीं शकुंतलेला पुढें पाऊल टाकणें प्राप्तच होतें. जाण्यापूर्वी कण्वानें आपल्या शिष्याबरोबर राजाला संदेश पाठविला व शकुंतलेलाही उपदेशाच्या चार गोष्टी सांगितल्या आणि शेवटीं कन्यावियोगामुळें अंतःकरणांत जी खळबळ उडाली होती—जिचें नियमन त्या तपोनिधीलासुद्धां करतां आलें नाहीं—ती त्यानें व्यक्त केली. या प्रसंगींचे सर्वच श्लोक उत्तमोत्तम काव्य म्हणून अखिल जगतीतलावरील पंडितांना शिरोधार्य झालेले आहेत. किंबहुना या श्लोकांमुळें शाकुंतलाचा चौथा अंक म्हणजे कालिदासीय काव्यरूप स्वर्गातील नंदनवन होऊन राहिलेलें आहे. शकुंतला आणि कण्व, तिच्या सख्या, हरिणबालकें फार तर काय लता आणि वृक्ष यांच्या अंतःकरणांचे गूढ निनाद या महाकवीनें व्यक्त करून सचेतन व अचेतन सृष्टीचे

व्यापार जाणण्याचें व शब्दांत प्रकट करण्याचें आपलें कलात्मक सामर्थ्य केवढें अलौकिक आहे हें सर्वांना पटवून दिलें आहे असें म्हणण्यांत अतिशयोक्ति होण्याचें भय नाहीं.

५. कण्वानें हा दुष्यंताला पाठविलेला निरोप लक्षांत ठेवण्यासारखा आहे. त्या काळच्या चालीप्रमाणें दुष्यंताकडे अगोदरच मोठा जनाना होता. " आपल्या सर्व पत्नींना तूं जसा सन्मानपूर्वक वागवितोस तसाच शकुंतलेला वागव " अशी इच्छा या श्लोकाच्या तिसऱ्या चरणांत कण्वमुनीनें व्यक्त केली आहे. आपली धर्मकन्या दुष्यंताची पट्टराणी व्हावी ही जरी इच्छा असली तरी त्याच्या इतर दारजनांविषयीं कण्वासारख्या शमदमयुक्त महर्षीनें अनसूयाच दाखविली पाहिजे हें उघड आहे; आणि म्हणून ही अशी विनंति त्यानें राजाला केलेली आहे. श्लोकाच्या पहिल्या दोन ओळींत मुख्य गोष्ट आलेली आहे. " आम्ही ऋषि संयमधन आहोंत आणि तूं थोर कुलांतील आहेस. त्याचप्रमाणें शकुंतलेची जी स्नेहप्रवृत्ति तुझ्या ठिकाणीं झाली ती तुम्हीं दोघेंही परस्परानुरक्त झालांत म्हणून झाली, आम्ही किंवा दुसऱ्या कोणी ती घडवून आणिली नाहीं: या सर्व गोष्टी तूं लक्षांत ठेव. याउप्पर होणें जाणें नशीबाच्या स्वाधीन. तें मुलीच्या आप्तांनीं बोलून दाखविणें बरोबर नाहीं. " हा कण्वसंदेशांतील अर्थ आहे. आई-बापांना मुलीबद्दल मोठमोठ्या आकांक्षा असतात, ही गोष्ट वाचकांना कळण्या-सारखी आहे म्हणून कवीनें ती व्यक्त केली नाहीं आणि कण्वानें शब्दांत बोलून दाखविली नाहीं. पण " नशिबीं असेल तें होईल " असें म्हणून या श्लोकांत पुढें येणारा अनिष्ट प्रसंग ध्वनिरूपानें सूचित केलेला आहे. त्याचप्रमाणें आपलें संयमधनत्व व राजाचें थोर कुळ आणि शकुंतलेचें अकृत्रिम प्रेम यांचा उल्लेख करून कवीनें अनेक विचार ध्वनित केलेले आहेत. विवाह जमला होता तो परस्परांच्या अनुरागामुळें; कोणाच्या जुलूमजबरदस्तीनें किंबहुना मध्यस्थीनेंही तो जमलेला नव्हता म्हणून त्याबद्दल दुष्यंत पूर्ण जबाबदार होता आणि ही जबाबदारी त्यानें विसरतां कामा नये असें कण्वानें सुचविलें आहे म्हणजे तो ती विसरण्याचें भय आहे हा ध्वनि कवीनें गर्भित केलेला आहे. थोर कुळांतील माणसें अयोग्य रीतीनें वागणार नाहींत आणि दुष्यंताचें कुळ थोर असल्यामुळें शकुंतलेला विसरण्यासारखें वर्तन त्याच्याकडून होणार नाहीं, अशी श्रद्धा कण्वानें व्यक्त केली आहे; आणि हें सर्व सांगतांना आम्ही ऋषि संयमधन आहोंत, म्हणजे आमच्या संयमाचें सामर्थ्य अलोट आहे

आणि आम्ही व्यवहारदृष्टीनें दरिद्री असलों तरी खरे धनिक आहोंत; म्हणून ही आमची मुलगी कोणातरी दरिद्र्याची, निराधार अशी आहे, तिची हेळसांड झाली तरी हरकत नाहीं, तिची अवहेलना केली तर विचारणारा कोणी नाहीं, अशा तऱ्हेची समजून दुष्यंतानें करून घेऊं नये यासाठीं संयमधन हें विशेषण योजिलेलें आहे. वेळ प्रसंग आला तर हे संयमी ऋषी क्रुद्ध होऊन ब्रह्मांडाचीही होळी करूं शकतात, आपल्या सामर्थ्यानें प्रत्यक्ष विधात्याशीं स्पर्धा करून प्रतिसृष्टि उभी करूं शकतात, आणि शकुंतलेच्या पाठीमागें अशी जबरदस्त आप्त मंडळी आहेत हें सुचवून तिची अवहेलना करून चालणार नाहीं ही स्पष्ट इशारतही राजाला या श्लोकांत दिलेली आहे. आपलें संयमधनत्व, राजाचें उच्च कुल, आणि शकुंतलेचें प्रेम यांची आठवण करून देऊन सुद्धां "पुढचें नशीबावर" हे शब्द कण्वाच्या तोंडीं येतात. ही पुढें येणाऱ्या संकटाची फार अल्प अशी सूचना आहे हें वर सांगितलेंच आहे. पण त्या संकटांत शकुंतला केवळ अनाथ नाहीं, बंधुबंधु आहेत, हेंही पर्यायानें सूचित झालेलें आहे हें चतुर वाचकांच्या लक्षांत येईलच.

राजाला याप्रमाणें संदेश देऊन कण्वानें आपल्या धर्मकन्येलाही मासरीं जातांना बहुमोल उपदेश केला. कण्व म्हणाला:—"आम्ही तर वनांत राहणारे आहोंत; तथापि आम्ही लोकव्यवहारही जाणतों. आणि म्हणून व्यवहारांत कसें वागावें हेंही आम्हांला सांगतां येतें. शकुंतले, पतिगृहीं गेल्यावर तेथें जी वडील मंडळी असतील त्यांची शुश्रूषा करीत जा. आपल्या सवतीच्या बरोबर मैत्रिणीप्रमाणें वाग. जरी पतीनें तुझ्या मर्जाविरुद्ध वर्तन केलें तरी संतापून त्याच्या उलट जाऊं नकोस. नोकरांचाकरांबरोबर फार सरळपणानें वाग. आणि भरभराटीच्या काळांत गर्विष्ठ होऊं नकोस. ज्या तरुण स्त्रिया याप्रमाणें वागतात त्यांना गृहिणी ही पदवी सार्थ प्राप्त होते. याहून अन्य तऱ्हेनें वागणाऱ्या स्त्रिया कुलावर अरिष्ट आणणाऱ्या ठरतात." ज्या गृहस्थितींत शकुंतलेला जाऊन रहावयाचें होतें व वागावयाचें होतें तिला अनुसरून हा उपदेश केलेला आहे हें लक्षांत ठेविलें नाहीं तर वाटेल तितके कुतर्क काढतां येतील. ज्या घरांत बहुपत्नीकत्व नांदत आहे, तेथें कसें वागावें यासंबंधीं हा उपदेश आहे. आणखी शिवाय अविभक्त कुटुंबपद्धति तेव्हां देशांत चालत होती तीही कवीच्या मनांत होती असें स्पष्ट दिसतें. अविभक्त कुटुंबांत घरीं दोन चार वडीलधारी माणसें असावयाचीं. त्यांच्या शुश्रू-

षेची जबाबदारी सुगृहिणीवर येणें क्रमप्राप्त आहे. ही जबाबदारी तिनें आनंदानें व हौसेनें पार पाडावी असा उपदेश मुलीच्या आईबापांनीं व आप्तेष्टांनीं तिला करणें आवश्यक असतें. जर मुलीचे आईबापच तिला सासरीं मगरूरपणानें वाग असें सांगतील तर सासरच्या ( अविभक्त ) कुटुंबांत बखेडा होऊन घरांत सून आली नसून रोग आला आहे असें वाटण्याची स्थिति येईल. कण्व हा शकुंतलेचा धर्मपिता होता आणि ज्या घरांत आपली मुलगी जाणार तें घर ती तेथें असल्यामुळें आनंदांत असावें अशी त्याची इच्छा होती. त्यावेळीं राजालाच काय पण साधारणपणें खाऊनपिऊन सुखी असलेल्या घरवाल्या पुरुषाला अनेक पत्नी असत. संस्कृतांतील दारा हा शब्द बहुवचनी आहे यांतीलही मर्म हेंच असलें पाहिजे. जेथें बहुपत्नीकत्व आहे अशा घरांत तंटेबखेडे नसणें शक्य आहे किंवा अशक्य आहे हा तात्त्विक व्यवहाराचा प्रश्न एका बाजूला ठेविला तरी अशा अनेक पत्नी जेथें आहेत तेथें त्यांचें सख्य असेल तरच घरचा गाडा सुरळीत चालेल ही गोष्ट अगदीं उघड आहे. आणि म्हणूनच कण्वानें शकुंतलेला सपत्नीजनाबरोबर प्रियसखीवृत्ति ठेवण्याचा उपदेश केलेला आहे. यावरून मला व्यवहार कळतो हें त्याचें म्हणणें यथार्थ होतें असें आपल्याला दिसून येतें. ज्यावेळीं जें सामाजिक जीवन असतें, त्यांत बखेडा होऊं नये असें सुज्ञांना वाटत असतें. याच दृष्टीनें “ पति मर्जीविरुद्ध वागला तरी त्याच्या उलट जाऊं नकोस ” या उपदेशाकडे पाहिलें पाहिजे. प्रस्तुतच्या स्त्रीस्वातंत्र्याच्या कालांत हा उपदेश कोणास चमत्कारिक वाटेल. ( स्त्रियांच्या म्हणण्याला कधीं विरोध करूं नये ही इंग्रजी म्हण या ठिकाणीं पुष्कळांना आठवेल. ) परंतु कालिदास दोन हजार वर्षांपूर्वी लिहीत आहे हेंही विसरून चालणार नाहीं. घरचें जो पोषण करणारा, घरचा जो आधारस्तंभ, त्याचें प्राबल्य घरांत असणार ही गोष्ट जितकी तेव्हां खरी होती तितकी आजही आहे. आजच्या एखाद्या घरांत हा मान स्त्रीकडेही असूं शकतो. कुटुंबसंस्था संपूर्ण नष्ट होऊन समागमेच्छा याव्यतिरिक्त स्त्रीपुरुषांत परस्पर संबंध कसलाही राहणार नाहीं, त्या कालांत काय होईल याची भली बुरी कल्पना करून कालिदासाचें वर्णन चूक आहे असें म्हणणें धैर्याचें नसून धाष्टर्याचें आहे हें उघड आहे. सध्यांच्या काळीं जेथें स्त्री घर चालविते तेथें पुरुष तिच्यापुढें नमतात व ती प्रबळ होते. ( पुरुषांनीं मिळवावें व स्त्रियांनीं त्यांची मिळकत खिशांत घालून त्यांजवर अंमल चालवावा ही गोष्ट जुन्या जमा-

न्यांत नाहीं असें नाहीं. ) मिळवत्या नवऱ्याच्या स्वाधीन पूर्वकाळची स्त्री असे हें जसें खरें तसें पैसेवाल्या पत्नीच्या ताब्यांत सद्य:कालीं पुरुष असतो हेंही खरें आहे. तेव्हां कांहीं नवीन आर्थिक शोध आपण सांगत आहोंत अशी पोपटपंची करून समाजजीवनावर व्याख्यानें झोडणाऱ्यांनीं सुद्धां या बाबतींत "कोणास कोणी हंसूं नये" याच तत्त्वाचा आश्रय धरावा हें युक्त दिसतें. असो.

नोकरांचाकरांबरोबर सरळपणानें वागावें, त्यांचा पदोपदीं अपमान करूं नये, आपण मालक व तुम्ही नोकर या जाणीवेची टोंचणी त्यांना सारखी लावूं नये, हें सांगावयास पाहिजे असें नाहीं. पुष्कळ वेळेला नवीन श्रीमंतींत पडलेलीं माणसें नोकरांचाकरांना फार मगरूरीनें वागवितात. तसें वागविणें चांगलें नाहीं हें कण्वासारख्या समदर्शी पंडिताला वाटावें हें साहजिक आहे. नोकराचाकरांना कसें वागवावें याची आठवण कालिदासाला होण्याइतकें सामान्य जनतेच्या जीवनाकडे त्याचें लक्ष होतें ही गोष्टही प्रस्तुत कालीं आपण ध्यानांत ठेवण्यास हरकत नाहीं. कण्वानें शकुंतलेला याप्रमाणें उपदेश केला आणि तिला जाण्याची अनुज्ञा दिली. पण शकुंतलेचीं पावलें जड झालीं होतीं. ती पुढें चालली पण तिचें अंत:करण तिला मागें ओढी. हा उपदेश आपण अंत:करणांत सांठविला व तदनुसार आपण वागूं हें कळविण्याकरितांच कीं काय शकुंतला पित्याला भेटली आणि लडिवाळपणानें म्हणाली—"बाबा, तुमच्यापासून दूर परदेशीं माझा वेळ कसा हो जाईल ?" कण्वानें दिलेलें उत्तर मोठें मजेचें आहे. तो म्हणाला:—"बाळ, ती भीति तुला कशाला ? तुझा पति थोर आणि कुलीन आहे. त्याची पत्नी झाल्यावर त्याच्या वैभवाला अनुरूप अशा मोठमोठ्या कार्यांत तूं अगदीं गढून जाशील, आणि प्राची दिशेला जसा सूर्य होतो त्याप्रमाणें लौकरच तुला छानदार मुलगा होईल आणि त्याच्या गडबडींत आमची तुला आठवणही राहणार नाहीं. आमचा वियोग तूं सहज विसरशील." या वर्णनांत स्वाभाविकता किती पुरेपूर आहे हें कोणास सांगितलें पाहिजे असें नाहीं. नंतर शकुंतलेनें कण्वाच्या पायांवर डोकें ठेवून नमस्कार केला व "यदिच्छामि ते तदस्तु" (माझ्या मनांत तुझ्याबद्दल ज्या ज्या इच्छा आहेत त्या त्या पूर्ण होवोत ), हा गोड आणि अर्थपूर्ण आशीर्वाद कण्वानें तिला दिला. त्या आशीर्वादावरूनच त्याच्या अंत:करणांत आपल्या कन्येबद्दल केवढी कळकळ होती, केवढें प्रेम होतें, केवढा अभिमान होता हें स्पष्टपणें दिसतें. त्यानंतर शकुंतला आपल्या दोघी मैत्रिणींना आपणांस एकदम कडकडून

भेटा म्हणून सांगितलें. मैत्रिणी म्हणाल्याः—“कदाचित् राजानें तुला ओळखलें नाहीं तर त्याचें नांव असलेली ही आंगठी त्याला दाखव.–” आपणांला राजा ओळखणार नाहीं ही शंका मैत्रिणींना आलेली पाहून शकुंतला जरा चरकली. तेव्हां त्या सख्या म्हणाल्याः—“खरोखर भिण्याचें कारण नाहीं. आम्हांला असें वाटतें कारण “अतिस्नेहः पापशंकी.” निघण्याच्या पूर्वी शकुंतलेनें आपलें आजपर्यंतचें आयुष्य जेथें एवढ्या आनंदांत गेलें त्या तपोवनाकडे पाहिलें. तेथें अनुभविलेल्या समाधानाची व प्रेमाची आठवण तिला झाली आणि हीं प्रेमळ माणसें पुनः कधीं भेटतील हा विचार मनांत येऊन तिनें पित्याला विचारलें:—“बाबा, हें तपोवन मला पुनः केव्हां दिसेल?” या प्रश्नाचें कण्वानें दिलेलें उत्तर फार सूचक आहे. “सम्राट् राजाची पत्नी होऊन विलक्षण पराक्रमी असा पुत्र तुला होईल आणि तो राज्यधुरा वाहण्याला समर्थ झाला म्हणजे त्याचा पिता सर्व कारभार त्याच्याकडे सोंपवील आणि मग तुम्ही दोघें वानप्रस्थाश्रम घेऊन या आश्रमांत पुनः याल.” त्या वेळीं अस्तित्वांत असलेली आणि सध्यांही अस्तित्वांत येण्याला अत्यंत उचित अशी आश्रमव्यवस्था या श्लोकांत कवीनें सूचित केलेली आहे. वर्णव्यवस्थेला जातिभेदाचें भीषण स्वरूप आलें असतांहि तें आपण हृदयाला कवटाळतों आणि समाजस्वास्थ्याला अत्यंत उपकारक अशा आश्रमव्यवस्थेचा आजकाल आपण त्याग केलेला आहे. कालिदासानें आश्रमव्यवस्थेचें वर्णन वरचेवर प्रेमानें केलें आहे. “वार्धक्ये मुनिवृत्तीनाम्” असें तेव्हांच्या सज्जनांचें तो थाटानें गुणगायन करतो. शकुंतलेनें जाण्यापूर्वी पित्याला म्हटलें:—“बाबा, तुमचा देह तपश्चर्येनें अगोदरच फार कष्टलेला आहे. त्यांत माझी काळजी करून आणखी त्रास करून घेऊं नका.” या वाक्यांत तिचा गोड स्वभाव भरलेला आहे; आणि कण्व म्हणालाः—“बाळे, तुझ्या बाळलीलांच्या सूचक गोष्टी डोळ्यांपुढें प्रत्यहीं दिसत असतांना तुझा विसर मला कसा पडेल?” आणि या हृदयद्रावक वातावरणांत शकुंतला माहेराहून जाते आणि तिच्या आयुष्याचा पहिला भाग संपतो.

६. पांचव्या अंकांत गौतमी आणि दोन ऋषिकुमार शकुंतलेला घेऊन दुष्यंताकडे जातात आणि तेथें दुष्यंत तिचा स्वीकार करीत नाहीं हा भाग कवीनें सांगितलेला आहे. त्या प्रसंगाचें बरेंचसें वर्णन मागील भागांत येऊन गेलेलें आहे. या ठिकाणीं फक्त शकुंतलेपुरतें आपण या अंकाकडे लक्ष द्यावयाचें आहे. राज-

दरबारीं गेल्यावर आणि औपचारिक प्रश्नोत्तरें झाल्यावर शार्ङ्गरवानें राजाला कळविलें कीं कण्वगुरूंचा निरोप आपणांस घेऊन आलों आहें; तेव्हां राजानें विचारलें कीं कण्वमुनीची आज्ञा काय आहे? तेव्हां ऋषिकुमारानें कण्वाच्या शब्दांतच निरोप सांगितला. "एकांतांत या माझ्या कन्येशीं तूं गांधर्व विधीनें विवाह केलास ही गोष्ट तुम्हां दोघांवरही माझें प्रेम असल्यामुळें मला मान्य झालेली आहे. तूं श्रेष्ठांचा अग्रणी आहेस आणि शकुंतला मूर्तिमती सत्क्रिया आहे. एकमेकांना अनुरूप अशीं वधूवरें एकत्र आणल्यामुळें ब्रह्मदेवावर जो नेहमींचा आरोप आहे (कीं तो असे विवाह जुळवून आणीत नाहीं) तो तुमच्या बाबतींत राहिलेला नाहीं. ही मुलगी आतां गरोदर आहे. तर सहधर्माचरणासाठीं हिचा तूं स्वीकार कर." हा निरोप ऐकल्यानंतर राजा काय म्हणतो इकडे शकुंतलेचें लक्ष लागून राहिलें होतें. राजा म्हणालाः--"ही काय भानगड उपस्थित झाली आहे?" तेव्हां शकुंतला मनांत म्हणाली कीं हे शब्द म्हणजे रखरखीत निखारे आहेत. शार्ङ्गरव पुनः म्हणालाः—"राजा, तुला व्यवहार माहीत आहे. चांगली मुलगीसुद्धां जर माहेरीं राहिली तर लोक तिच्या शीलाबद्दल शंका घेतात. म्हणून मुलीनें नेहमी पतीजवळ असावें अशी तिच्या आईबापांची इच्छा असते." राजा म्हणालाः--"काय, हिच्याशीं माझें लग्न झालेलें आहे?" राजाचे हे शब्द ऐकून डोक्यावर आकाश कोसळावें तशी शकुंतलेची स्थिति झाली, आणि मैत्रिणींनीं जें सांगितलें होतें त्याची तिला आठवण झाली. राजानें तर स्पष्ट सांगितलें कीं हिच्याशीं लग्न केल्याचें आपणांला मुळींच आठवत नाहीं; मी आठवण्याचा पुष्कळ प्रयत्न केला पण व्यर्थ. त्यांतून ही गरोदर बाई. हिचा स्वीकार मी कसा करावा? शकुंतला मनांत म्हणालीः—"माझ्याशीं विवाह केल्याचेंही राजाला स्मरत नाहीं. आतां मनांत केलेले संकल्प सफल होणें तर दूरच राहिले." शार्ङ्गरवानें बहिणीला सांगितलें कीं "आतां तुला काय सांगावयाचें तें राजाला सांग. आम्ही सांगावयाचें तें सांगितलें. आतां ओळख पटवून देणें तुझें काम आहे." तेव्हां बिचारी शकुंतला स्वतःशीं म्हणतेः—"एवढें मोठें प्रेम त्याचें स्मरण राहिलें नाहीं. आतां मी कसलें स्मरण देऊं? माझेंच नशीब खोटें." मग ती राजाला म्हणाली:-"लग्नाबद्दल देखील संशय घेणें तुला शोभत नाहीं. त्यावेळीं आश्रमांत माझ्यासारख्या भाबड्या पोरीला हवीं तीं वचनें देऊन आतां असें उत्तर देणें योग्य नाहीं." कालिदासाची शकुंतला फार बोलणारी नव्हती.

पण जेव्हां तिच्यावर हा विलक्षण प्रसंग आला तेव्हां तिला बोलल्यावांचून गत्यंतर नव्हतें. कालिदासाच्या आर्यकन्या प्रसंग आला कीं कठोर बोलतात, अन्याय सहन करीत नाहींत. शकुंतलेचें भाषण ऐकून राजानें कानावर हात ठेविले आणि आपल्याबरोबर मलाही पापांत कां ओढतेस म्हणून सात्विक संतापानें प्रश्न विचारला. येथपर्यंत गोष्ट आली तेव्हां अर्थात् शकुंतलेला कळलें कीं आपलें प्रेमाचें नातें संपलें. शकुंतलेचीं सुखस्वप्नें एकदम विलयाला गेलीं. परस्परानुरक्तीची जी दिव्य भावना अंतःकरणांत तळपत होती तिचा विध्वंस झाला. शकुंतलेचें कौमार्य, तिचा शृंगार येथें संपला आणि पोटांत असलेल्या गोळ्यावर भलता प्रसंग येऊं नये म्हणून स्वसंरक्षण करणें ही गोष्ट तिला आवश्यक झाली आणि ती राजाला म्हणाली:--"ठीक आहे. तूं मला अंगठी दिली होतीस ती तुला दाखवितें." असें म्हणून जेव्हां बोटांतून अंगठी काढावी म्हणून तिनें बोटाकडे पाहिलें तेव्हां तेथें अंगठी नाहीं असें तिला दिसून आलें. त्या प्रसंगाचा फायदा घेऊन आपलें पौरुष स्वरूप दुष्यंतानें दाखविलें आणि तो हंसला. मग तिनें अगदीं एकांतांत घडलेल्या गोष्टी त्याला सांगण्यास सुरवात केली. अर्थात् राजानें "पहाण्यावरून ऐकण्यावर आलें" असा टोमणा मारून त्या गोष्टींची आपणांस कांहीं माहिती नाहीं म्हणून सांगितलें आणि मोठ्या दिमाखानें तो म्हणाला:-- "जे विषयी पुरुष असतात ते कार्यसाधू स्त्रियांच्या असल्या गोडगोड थापांना भुलतात; मी तसा नाहीं. मी धर्मभीरु आहें आणि ही स्त्री लबाड आहे." हे वाक्प्रकार ऐकून गौतमी म्हणाली:--"ही मुलगी आमच्या आश्रमांत वाढलेली आहे. तिला कपट कसलें तें माहीत नाहीं. तेव्हां तिच्याबद्दल असें भलभलतें बोलूं नकोस." पण राजाचा नूर आतां बदलला होता. सुरवातीला नम्रपणें प्रश्न विचारणारा राजा आतां गौतमीला तापसवृद्धे म्हणजे थेरडे म्हणून संबोधून म्हणाला:-- "स्त्रियांची जात म्हणजे लबाडींत तरबेज." आईप्रमाणें असलेल्या गौतमीचा अपमान झालेला पाहून आणि सबंध स्त्रीजातीवर लबाडीचा आरोप राजानें केलेला ऐकून कालिदासाची फार न बोलणारी शकुंतलासुद्धां खवळली आणि म्हणाली:—"राजा, आपल्या स्वतःच्या अंतःकरणावरून सगळ्या जगाची पारख करतोस काय? ज्याप्रमाणें विहिरीवर हिरवळ माजलेली असते तसें सात्विकपणाचें तूं हें ढोंग आणलें आहेस. तूं लबाड आहेस. बाहेरून दाखवतोस तसा आंत नाहींस." हे निकराचे शब्द ऐकून राजासुद्धां गडबडला आणि म्हणाला:—" दुष्यंताचें उत्कृष्ट चारित्र्य जगांत

महशूर आहे." तेव्हां शकुंतलेनें सांगितलें:—"पुरुवंशाच्या कीर्तीवरच विश्वास ठेवून मी तुझ्या जाळ्यांत सांपडलें आणि हा स्वच्छंदचारित्वाचा आळ मजवर आला. राजा, तूं गोड गोड बोलतोस पण तुझ्या अंतःकरणांत विष आहे." आणि एवढें बोलून ती रडूं लागली. तेव्हां तिचा भाऊ शार्ङ्गरव संतापाच्या भरांत म्हणाला:—"कोणाला न विचारतां, न पुसतां वाटेल तें केल्याचा परिणाम हा असा होतो. विशेषतः एकांतांत समागम करणें ही गोष्ट फार विचारपूर्वक केली पाहिजे. ज्याचें हृदय आपल्याला कळलेलें नाहीं त्याच्यावर प्रेम करण्याचा शेवट त्याच्याशीं वैर उत्पन्न होण्यांत होतो." आपल्याला शार्ङ्गरवानें हलकट ठरविलेलें पाहून राजानें तरतरून विचारलें:—"या पोरीच्या थापांवर विश्वास ठेवून मलाच दोषी ठरवितोस काय?" तेव्हां जरी शार्ङ्गरव तिच्यावर रागवला होता तरी त्याला आपली बहीण माहीत होती म्हणून तो राजाला म्हणाला:—"हिला जन्मापासून लबाडीची ओळख नाहीं आणि तूं लबाडीचें यथाशास्त्र अध्ययन केलेलें आहेस. आम्ही तिच्यावर विश्वास ठेवणार आणि तुझें बोलणें खोटें समजणार. तूं काय वाटेल तें म्हण, ही तुझी पत्नी आहे. हिचा स्वीकार कर किंवा तिला टाकून दे. नवऱ्याला बायकोचें वाटेल तें करतां येतें." आणि तो गौतमीला म्हणाला कीं आपण जाऊं या. शकुंतलेनें विचारलें कीं राजा माझा स्वीकार करीत नाहीं आणि तुम्हीही मला सोडून चाललांत तर मी काय करूं? गौतमीचें अंतःकरण कळवळलें; पण शार्ङ्गरव म्हणाला, "हा तुझा पति आहे. तुला याच्याचकडे राहिलें पाहिजे. हा म्हणतो तशी तूं असलीस तर तुला परत नेऊन काय फायदा? आणि जर तशी नसलीस तर पतिगृहांत मोलकरणीसारखी राहणें हेंसुद्धां तुझें कर्तव्य आहे." आणि असें म्हणून तो बालतपस्वी रागारागानें निघून गेला आणि मूर्तिमती सत्क्रिया अशी शकुंतला जगांत उघडी पडली. तिच्या आयुष्यांतील ती वेळ मोठी भयंकर होती. तिचें काय करावें हें राजालाही कळेना. तेव्हां त्याच्या उपाध्यायानें तोड काढली. तो म्हणाला:—"राजा, जर या मुलीला चक्रवर्ती लक्षणांनीं युक्त असा मुलगा झाला तर ती तुझीच पत्नी यांत शंका नाहीं. तेव्हां हिला मी माझ्या घरीं प्रसूतीपर्यंत नेऊन ठेवतों!' राजानें या सूचनेला अनुमति दिली. त्याच्याही अंतःकरणांत कालवाकालव चाललेली होती. पण शापप्रेरित विस्मरणामुळें ही आपली पत्नी असा त्याचा निश्चय होईना. उपाध्यायाबरोबर शकुंतला जाऊं लागली, पण

जातां जातां एक तेजस्विनी स्त्री आकाशमार्गानें खालीं उतरली आणि तिनें शकुंतलेला आपल्याजवळ घेतलें व हां हां म्हणतां ती अदृश्य झाली. अशा प्रकारें परगृहीं राहण्याचा शकुंतलेवरचा प्रसंग कवीनें टाळला. हा चमत्कार पाहून राजाचें व्याकुळ झालेलें अंतःकरण अधिकच कष्टी झालें आणि नंतर असे कांहीं प्रसंग घडून आले कीं त्यामुळें शकुंतला ही आपली पत्नी आहे याबद्दल राजाची खात्री झाली.

७. यानंतर आपली व शकुंतलेची गांठ सातव्या अंकांत पडते. इंद्रशत्रूचा पराभव करून दुष्यंत राजा इंद्राच्या रथांत बसून खालीं–स्वर्गातून–पृथ्वीवर उतरत आहे व मातली सारथीचा व त्याचा संवाद चालला आहे व राजा नजीक आलेल्या तपोवनाची प्रशंसा करीत आहे असा देखावा या अंकाच्या सुरवातीला आहे. नंतर दोन तपस्वी स्त्रियांबरोबर भरत येतो व त्याकडे पाहून राजाच्या अंतःकरणांत अपत्यप्रेम उचंबळून येतें. त्या प्रसंगाचें विवरण मागील भागांत केलें आहे. तो बालक पुरुवंशांतला आहे असें त्या तपस्वी स्त्रिया राजाला सांगतात. मग राजा त्याची आई ही कोणत्या राजर्षींची पत्नी म्हणून विचारतो. तेव्हां ती तापसी उत्तर देते :–– "धर्मपत्नीचा त्याग करणाऱ्या त्या राजाचें नांव कोण घेईल !" तेव्हां तर राजाची खात्रीच होते. 'धर्मदारपरित्याग' कालिदासाला अत्यंत असंमत होता हें स्पष्ट आहे. नंतर राजा म्हणतो––"काय ? याच्या आईचें नांवसुद्धां शकुंतला ?" ( शकुंत-पक्ष्याचें नांव निघतांच भरत बाळाला आपली आई शकुंतला हिचें स्मरण होतें व आशातंतु राजाच्या अंतःकरणांत उत्पन्न होतो. ) नंतर त्याच्या मनगटांत बांधलेला ताईत खालीं पडतो तो राजा उचलून आणतो, तेव्हां त्या स्त्रिया चकित होतात. कारण त्याच्या आईबापाशिवाय ताइताला कोणी स्पर्श केला तर तो सर्प होऊन पडेल असें मारीच ऋषीनें सांगितलेलें असतें. ताइताचा साप झाला नाहीं आणि भरत चक्रवर्तिलक्षणांनीं युक्त होता हें पाहून आतां बिलकुल शंका राहिली नव्हती म्हणून अनुतप्त दुष्यंतानें तो आपला मुलगा हृदयाशीं कवटाळला. पण मुलाला त्याची ओळख नव्हती. तो म्हणालाः–"मला सोड; मी आईकडे जातों. तूं माझा पिता नव्हेस. माझा पिता दुष्यंत." आणि त्या बाळकाचा तो विरोध पाहून दुष्यंत हंसला आणि म्हणाला "आतां शंकाच नाहीं." अशा त्या प्रसंगीं एकवेणीधरा शकुंतला तेथें आली. तिला ताइताची वगैरे सर्व हकीकत कळली होती. तिला पाहिल्याबरोबर राजा नम्र झाला–अत्रभवती शकुंतला–म्हणून मोठ्या सन्मानपूर्वक तो तिचा उल्लेख करतो. मलिन वस्त्र नेसलेली,

व्रतस्थपणामुळें चेहऱ्यावर फिकेपणा आलेली, एकच वेणी घातलेली, जशी काय माझ्या दीर्घ विरहव्रताचें आचरण करीत आहे अशी ही शुद्धशीला--आणि मी अतिनिष्करुण--हे शब्द राजाच्या तोंडीं आले यांत नवल नाहीं. ती आतां शृंगाररसानें भारलेली युवति नव्हती. तपश्चर्येच्या प्रकाशानें तळपणारी आणि वात्सल्यानें भरलेली ती मातृमूर्ति होती. ती माता होती म्हणून पश्चात्तापानें होरपळलेल्या राजाला तिनें क्षमा केली--त्याचें पूर्वकृत वर्तन तिनें मनांत आणलें नाहीं. ती आचाराला अनुसरून "आर्यपुत्राचा विजय असो" असें म्हणाली; पण ती कोण होती हें दुष्यंताला आतां कळलें. ती त्याच्या पुत्राची माता होती आणि आपल्या पुत्राच्या मातेचा अवमान करण्यासारखा भयंकर गुन्हा जगांत दुसरा नाहीं हें त्याला कळलें! तो लहान भरत आईला ओळंबून तिला विचारीत होता—"आई हा कोण ग?" आणि तिच्या डोळ्यांतून अश्रु गळत होते. तो देखावा पाहून पतित राजा पवित्र झाला. त्यानें आपल्या घोर अपराधाची कबुली दिली आणि त्या लहान मुलाच्या देखत, त्या तापसी स्त्रियांच्या देखत त्यानें आपलें मस्तक शकुंतलेच्या पायांवर ठेवून कृतकर्माचें प्रायश्चित्त घेतलें व पुनः तो शुद्ध झाला. त्या मातृमूर्तीला वंदन करून राजानें गमावलेलें निधान परत मिळविलें. त्याला ती अंगठी पण सांपडली होती ती त्यानें तिला दिली आणि मग तीं दोघे आपल्या प्रिय पुत्राला घेऊन मारीच ऋषींच्या दर्शनाला गेलीं. जातांना शकुंतला पुनः अगदीं पूर्ववत् पत्नीस्वरूपांत आली व राजाला म्हणाली:--"असें दोघांनीं बरोबर वडील माणसांसमोर जातांना मला लाज वाटते." मारीच आणि अदिति या जोडप्यानें त्यांचें अभिनंदन करून शकुंतलेवर शुभाशीर्वादांचा वर्षाव केला-"ही साध्वी शकुंतला, हा गोड मुलगा आणि तूं राजा यांचें एकत्र येणें म्हणजे श्रद्धा, वित्त आणि विधि यांचें एकत्र येणें होय," असें त्या महर्षीनें सांगितलें. यज्ञकर्म यथासांग होण्यास श्रद्धा पाहिजे, द्रव्य पाहिजे, विधिकार्याचें पूर्ण ज्ञान पाहिजे; संसार आनंदाचा होण्यास सत्पत्नी पाहिजे, सदपत्य पाहिजे, सत्पति पाहिजे आणि अशा प्रकारें शकुंतला मातृरूपानें नाटकाच्या शेवटीं सर्वत्र आनंदीआनंद उत्पन्न करणारी अशी आपल्या दृष्टीला पडते व तेथेंच आपण तिचा निरोप घेऊं.

तिचें हें शेवटचें स्वरूप परम मंगल असें आहे. ती प्रथमांकापासून शेवटपर्यंत शुद्धशीला आहे. तिला पश्चात्तापानें शुद्धि प्राप्त होण्याचा प्रश्नच निघत नाहीं.

पश्चात्तापानें शुद्धि राजाला मिळाली. शकुंतलेचें चित्र निर्व्याजमनोहर आहे; अत्यंत मधुर आहे; अतिशय चिंतनीय आहे. ती माता होती म्हणून बलिष्ठ होती. ती माता होती म्हणून तिच्या प्रभावानें दुष्यंत पुनः सुखी झाला. ती माता होती म्हणून दुष्यंतानें तिच्या चरणांव रआपलें मस्तक ठेवून त्या डोक्यांत असलेल्या सर्व किल्मिषांचा नाश करून टाकला. सातव्या अंकांत शृंगाराचा सोसाट वारा नाहीं; तेथें करुण आणि शांत रसाच्या मंद मंद पवन-लहरी आंगाला सुख देतात, आणि बाल भरताच्या आगमनामुळें नव्या संसाराकडे आपली दृष्टि वळवितात.

८. शकुंतला म्हणजे कुमारी, पत्नी, माता या स्त्रीच्या त्रिविध अवस्थांची कथा आहे व यांत पुढील दोन्ही अवस्था प्रथमावस्थेंत प्रणयाच्या आणि अजाणतेपणाच्या भरांत घडलेल्या गोष्टींचा परिणाम दर्शवितात. पार्वतीचें जें चित्र कुमारसंभव या महाकाव्यांत काढलेलें आहे तें निराळ्या प्रकारचें आहे. पार्वतीला शंकर हाच पति हवा होता. थोर मातापित्यांची ती सुशील आणि निश्चयी कन्या होती. शंकराच्या प्राप्तीचा तिला निदिध्यास लागण्याचें कारण पूर्वजन्मीं ती शंकराचीच पत्नी होती. तेव्हां ती दक्षाची कन्या होती--व दक्षाला आपल्या कन्येनें पतकरलेला पति शंकर मान्य नव्हता. दक्षाकडे मोठा यज्ञ झाला त्यावेळीं शंकराला आमंत्रणहि गेलें नाहीं. पण माहेरच्या लोभानें पति निवारण करीत असतांनाही सती-हें पार्वतीचें दक्षकन्या असतांना नांव होतें-पित्याच्या घरीं गेली. तेथें यज्ञसमारंभाला मोठी गर्दी जमली होती, पण सतीची विचारपूस कोणीही केली नाहीं. तेव्हां अर्थात् ती संतापली पण कांहीं वेळ यज्ञ-क्रिया पहात ती तेथेंच बसली. पण पुढें आहुति देतांना रुद्राचें—शंकराचें--नांव आलें त्यावेळीं दक्षाच्या आज्ञेवरून रुद्राला आहुति न देतां पुढील देवतेच्या नांवाचें आवाहन होणार हें पाहून मात्र सतीचा संताप अनावर झाला. तिनें रुद्राला आहुति मिळाल्याशिवाय दुसऱ्या कोणत्याही देवतेच्या नांवानें आहुतीचा स्वीकार करण्यास प्रत्यक्ष अग्नीला मनाई केली—आणि त्या महापतिव्रतेची आज्ञा भंग करण्याची छाती त्या सर्वभक्षक अग्नीलासुद्धां झाली नाहीं. यज्ञ थांबला; यज्ञ-कुंडांतील अग्नीच लुप्त झाला तेथें यज्ञक्रिया कसची होणार? आणि मग सतीनें आपलें शरीर योगमार्गानें नाहींसें केलें. ही सर्व हकीगत शंकरास कळून त्याच्या आज्ञेवरून त्याच्या गणांनीं दक्षाच्या यज्ञाचा विध्वंस करून त्याचें डोकें कापलें व

तेथें जमलेल्या मंडळीचा यथास्थित समाचार घेतला. त्यानंतर शंकरानें पुनः दुसऱ्या स्त्रीशीं विवाह केला नाहीं.

यदैव पूर्वे जनने शरीरं
सा दक्षरोषात्सुदती ससर्ज ।
तदाप्रभृत्येव विमुक्तसंगः
पतिः पशूनामपरिग्रहोभूत् ॥ कु. १–५३

तो विमुक्तसंग झाला व हिमाचलाच्या एका शिखरावर जाऊन तेथें त्यानें तपश्चर्या करण्यास सुरवात केली.

ही तपश्चर्या तो कां करीत होता हें सांगणें कठीण होतें. कारण तो शंकर—"स्वयं विधाता तपसः फलानां"—तपश्चर्येचें फळ देणारा तोच आणि त्यानें काय म्हणून तपश्चर्या करावी ? तेव्हां कवि म्हणतो—"केनापि कामेन तपश्चचार" म्हणजे कांहीं अतर्क्य अशा हेतूनं त्यानं तपश्चर्या आरंभिलेली होती. कवीनें या ठिकाणीं व्यंजना फार सुंदर साधली आहे. पत्नीच्या आकस्मिक निधनानंतर जरी शंकर तपश्चर्येच्या फलाचा विधाता होता तरी त्यानं स्वतः तप ज्या अतर्क्य कामनेनें आरंभिलें ती कामना त्या पत्नीची प्राप्ति हीच असावी असा तर्क करण्याचा जबरदस्त मोह होतो. पण शंकर निष्काम होता, तपस्वी होता, केवळ नियमनशीलच काय पण नियंता होता म्हणून "केनापि कामेन" ही कालिदासाची वर्णनयुक्तीच योग्य वाटते.

इकडे शंकर "केनापि कामेन" तप करीत होता, तर पूर्वजन्मींची दक्ष-कन्या सती आतां पर्वतराज हिमाचलाची कन्या झाली होती. कुमारसंभवाच्या सुरवातीच्या सर्गात प्रथम हिमालयाचें आणि नंतर पार्वतीचें—उमा हेंही तिचें नांव होतें—वर्णन कवीनें मोठ्या रसिकतेनें व मार्मिकतेनं केलें आहे. निसर्गाची आपल्या भरतखंडावर जी आश्चर्यकारक कृपा आहे तिचंच एक प्रतीक म्हणजे जगांतील अत्यंत विस्तीर्ण आणि अत्यंत उन्नत पर्वत आमच्या वाट्याला आलेला आहे हें होय. हिमालयाचा विस्तार, हिमालयाचीं अखंड हिमाच्छादित तुंग शिखरें,

* जेव्हां त्या सतीनें दक्षाच्या रागानें पूर्वजन्मांत शरीरत्याग केला तेव्हांपासून सर्वसंग सोडून पशूंचा पति म्हणजे शंकर हा अपरिग्रह म्हणजे अपत्नीक झाला.

स्वर्गलोकांना लाजविणाऱ्या हिमालयाच्या उदरांतील निवासभूमि, भरतखंडाला सुसंपन्न करण्यासाठीं हिमालयांतून वेगानें धावत येणारे नद आणि नद्या, हिमालयाच्या वनस्पति आणि खनिज संपत्ति—हें सगळेंच अपूर्व. त्या हिमालयाचें वर्णन आमच्या कवीनें केलेलें आहे तें दृढ परिचयानें केलेलें आहे, ही गोष्ट या पर्वत-राजाच्या प्रत्यक्ष दर्शनानें जे पावन झालेले आहेत त्यांच्या लक्षांत आल्याशिवाय रहात नाहीं. हिमाचलाच्या पत्नीचें नांव मेना. या जोडप्याच्या पोटीं पार्वती हें कन्यारत्न झालें. त्यांना मैनाक नांवाचा मुलगा अगोदर झालेला होता, पण ही कन्या त्यांना अत्यंत प्रिय होती. या कन्येवर त्यांचा जीव कीं प्राण होता आणि महाकवि कालिदासाचीही या पार्वतीवर केवढी भक्ति आहे—शिव-पार्वती हें कालिदासाचें कुलदैवत—हें आपल्या आश्चर्यकारक शब्दसृष्टींतील अत्यंत मूल्यवान् संपत्ति त्यानें तिच्यावरून ओंवाळणी म्हणून टाकलेली आहे त्यावरून लक्षांत येतें. दक्षकन्या सती मेनेच्या पोटीं आली. ज्या दिवशीं पार्वतीचा जन्म झाला त्या दिवशीं दशदिशा प्रसन्न होत्या; वाऱ्यांमध्यें धुरळ्याचें नांव नव्हतें; पुण्यकारक शंखस्वन होऊन नंतर पुष्पवृष्टि झाली आणि सर्व स्थावरजंगम पदार्थांना त्या दिवशीं आनंदीआनंद होऊन गेला. हिंदुसमाजांत कन्याजन्म म्हणजे सर्वांचें तोंड आंबट होतें. पण कालिदास हा स्त्रियांचा मोठा पुरस्कर्ता होता हें वर सांगितलेंच आहे. कन्याजन्माच्या महोत्सवाचें हें असें वर्णन कालिदासानेंच केलेलें आहे व ज्या कन्येच्या जन्माचें हें वर्णन आहे तिच्यावर कोणताही उत्तम कवि आपल्या काव्यसंपदेचा तसाच वर्षाव करील यांत शंका नाहीं.

बाल्यापासून यौवनाचा आरंभ होईपर्यंत पार्वतीची रूपसंपदा कशी वृद्धिंगत होत गेली, तिचें सौंदर्य कसें खुलत चाललें, याचें वर्णन कवीनें अगदीं भरदारपणानें केलेलें आहे. हिमाचल पुत्रवान् होता तरी त्या कन्येचें कौतुक त्याला विलक्षण वाटे आणि तिच्यामुळें आपणांला मोठें भूषण आलें, आपण मोठे पवित्र झालों असें त्याला वाटलें. कवीचें मूळचें वर्णन येथें वाचलें म्हणजे हिमाचलाला किती आनंद झाला होता त्याची कल्पना येते.

**प्रभामहत्या शिखयेव दीप-**
**स्त्रिमार्गयेव त्रिदिवस्य मार्गः।**

**संस्कारवत्येव गिरा मनीषी**
**तया स पूतश्च विभूषितश्च ॥ कु० १–२८**

आणि ही पार्वती म्हणजे

**सर्वोपमाद्रव्यसमुच्चयेन**
**यथाप्रदेशं विनिवेशितेन ।**
**सा निर्मिता विश्वसृजा प्रयत्ना-**
**देकस्थसौंदर्यदिदृक्षयेव ॥ कु० १–४९ ॥**

सर्व प्रकारचें उत्तमोत्तम सौंदर्य एका ठिकाणीं पहावयास मिळावें म्हणून विश्वकर्त्यानें ही पार्वती निर्माण केली. हळू हळू तिचा यौवनदशेंत प्रवेश झाला. एके दिवशी ती पित्याजवळ बसली असतां देवर्षि नारद तेथें आले. "ही शंकराची एक आणि अद्वितीय अशी वधू होणार आहे" असें भविष्य त्यांनीं सांगितलें. इंग्रजींत पत्नीला Better half म्हणण्याचा प्रघात आहे. येथें कवीनें वर्णन करतांना "शंकराचें शरीरार्ध हरण करणारी" असें पार्वतीचें वर्णन केलें आहे. नारदानें सांगितलेलें भविष्य ऐकून पार्वतीच्या पित्याला म्हणजे नगाधिराज हिमालयाला संतोष वाटला. प्रत्यक्ष शंकर जामात होईल तर दुसऱ्या जामाताची त्याला अभिलाषा नसावी यांत नवल नाहीं. नारदाची भविष्यवाणी ऐकल्यावरसुद्धां महादेवाची मागणी येईपर्यंत त्याला आपली कन्या अर्पण करणें नगाधिराजाला शक्य नव्हतें. "कन्येचा स्वीकार कर" म्हणून प्रार्थना केली तर शंकर होय म्हणेल का नाहीं म्हणेल याबद्दल हिमालयाला खातरी नव्हती आणि म्हणून जरी शंकर हाच वर त्याला पसंत होता तरी अभ्यर्थनाभंगभयानें तो स्तब्ध राहिला.

शंकराची या वेळीं खडतर तपश्चर्या हिमाचलाच्याच एका शिखरावर चालली होती. "तेथें जाऊन शंकराचें रोज दर्शन घे व त्याची आराधना कर" असें पर्वतराजानें कन्येला सांगितलें, आणि एका सखीनेंही तिच्याबरोबर जावें अशी योजना केली. समाधीच्या प्रसंगीं एखाद्या स्त्रीनें पूजनाला यावें ही गोष्ट तपश्चर्येला प्रतिकूल होण्याचा संभव होता. तथापि या योजनेला शंकरानें अनुमति दिली. कारण उघड आहे. तो खरा योगी, खरा धीर होता. विकार उत्पन्न होईल असा प्रसंग आला तरी ज्यांचीं अंतःकरणें गढूळ होत नाहींत त्यांनाच धीर म्हटलें पाहिजे, आणि अशा धीरांचा शंकर अग्रणी होता. त्याचें अंतःकरण इतकें निर्मल होतें कीं कोणीही स्त्री आली तरी त्याच्या समाधीचा, त्याच्या चित्तवृत्तींतील

समतेचा, भंग होण्याची भीति नव्हती. याप्रमाणें पार्वती दररोज त्याच्या दर्शनाला जाई व त्याचें पूजन करीत असे व अंतःकरणापासून इष्ट वरप्राप्तीचा आशीर्वाद मनांतल्या मनांत त्याजजवळ मागत असे.

९. अशा प्रकारें शंकराची तपश्चर्या आणि पार्वतीची पित्याच्या आज्ञेप्रमाणें चाललेली आराधना हीं सुरू असतांना सर्व देव ब्रह्मदेवाकडे गेले व त्यांनीं "तारकासुर नांवाच्या दैत्याचा सर्वांना फार उपद्रव होत आहे, त्याचा कांहीं तरी बंदोबस्त करावा," अशी मोठी करुणा भाकून विधात्याची परोपरीनें प्रार्थना केली; तेव्हां विधात्यानें त्यांना कांहीं काळ धीर धरण्यास सांगून, काळजी करूं नका म्हणून त्यांना आश्वासन दिलें. विधात्याच्याच वरामुळें त्या दैत्याला एवढें बळ प्राप्त झालें होतें तेव्हां त्याचा पराभव करणें हें कार्य मोठें दुर्घट होऊन बसलें होतें. शिव आणि उमा यांचा विवाहसंबंध होऊन त्यांना जो पुत्र होईल तो अर्थात् विलक्षण पराक्रमी होईल आणि तो त्या दैत्याचा संहार करील असेंही ब्रह्मदेवानें देवांना सांगितलें होतें. ब्रह्मदेवाचें हें भाकित जितक्या लवकर खरें होईल तितकें देवांना पाहिजेच होतें. म्हणून हा शिवपार्वतीचा संबंध त्वरित जुळवून आणण्याची देवांचा अधिपति इंद्र याची फार आतुरता होती. एवढ्या मोठ्या भयंकर दैत्याचा संहार करण्यासाठीं एक अत्यंत उत्कृष्ट रूपवती आणि शीलवती कन्या आणि एक अत्यंत जितेंद्रिय महायोगी यांचा संबंध घडावा ही कल्पना खरोखर मोठी लक्षांत ठेवण्यासारखी आहे. सध्यां ज्याला सुप्रजाजननशास्त्र असें नांव देतात तशाच प्रकारचा विचार अत्युच्च भूमिकेवरून शिवपार्वतीचा संबंध जुळून यावा अशी इच्छा करणारांनीं केलेला होता हें उघड दिसतें. बलिष्ठ शत्रूचा पराभव करण्यासाठीं जर पराक्रमी पुत्र हवा असेल तर त्याचा पिता आणि त्याची माता हीं अत्यंत शुद्ध वर्तनाचीं, अतिशय शक्तिमान् आणि शरीरावर पूर्ण स्वामित्व असणारीं, निर्भय वृत्तीचीं आणि ज्ञानसंपन्न व तपःसंपन्न अशीं असलीं पाहिजेत हा निर्णय ज्याला आपण "सुधारलेला" असें नांव देतों त्या कालांतही सर्व विचारी माणसांना पटण्यासारखा आहे. ज्यांची शक्ति शारीरिक किंवा मानसिक यातनांनीं क्षीण झाली आहे, जे इंद्रियांच्या आहारीं गेल्यामुळें ज्यांना स्थैर्य असें उरलेलें नाहीं, अशांना उत्कृष्ट संतति होणें संभवनीय नाहीं. उत्कृष्ट संतति निर्माण करणें यांत विवाहाचें पूर्ण सार्थक्य आहे, स्त्रीपुरुषसंबंधाचें खरें रहस्य आहे, हें विसरून चालणार नाहीं.

शिवपार्वतीचा विवाह लौकर व्हावा ही इंद्राला आतुरता होती; तेव्हां ब्रह्मदेवाचा आशीर्वाद यथाकाळ फलद्रूप होईपर्यंत वाट पहात बसून कालक्षेप करण्याला तो तयार नव्हता. त्यानें लागलीच या बाबतींत उद्योग आरंभिला. हिमाचलाच्या शिखरावर तपश्चर्या करीत बसलेल्या शंकराच्या दर्शनाला पार्वती प्रत्यहीं जाते हें त्याला माहीत होतें. तिचें प्रत्यहीं दर्शन घडूनसुद्धां शंकराच्या अंतःकरणाची वृत्ति यत्किंचितही डळमळणें शक्य नाहीं हेंही तो पुरें जाणून होता. त्या निर्विकार योगीश्वराचें अंतःकरण थोडें तरी चंचल झाल्याशिवाय, वैराग्याच्या त्या निबिड वातावरणांत अनुरागाचा थोडासा तरी प्रकाश खेळल्याशिवाय पुढचा विवाह जुळणें शक्य नाहीं हेंही तो ओळखून होता. पण शंकराच्या अंतःकरणांत चलबिचल उत्पन्न करणें ही गोष्ट अशक्य कोटींतील होती; निदान ती अतिशय अवघड होती हें इंद्राला समजत होतें. तेव्हां त्या निश्चल, निर्विकार साम्ययुक्त चित्तवृत्तीला चंचल करण्याचें दुष्कर कार्य अंगावर घेईल असा आपल्या दरबारांत कोणी आहे काय याची त्यानें चवकशी केली. त्या वेळीं मनुष्यमात्राच्या चित्ताला अतीव चंचल करून स्वर्गसुखाच्या भ्रमानें त्याला नरकाच्या यातना भोगावयास लावणारा, मी मी म्हणणाऱ्या मुनीश्वरांचें वैराग्य एका क्षणांत नष्ट करणारा, सहस्रावधि वर्षें घोर तप आचरून तपोधन बनलेल्या आणि महर्षिपदाला पोचण्याची इर्षा बाळगणाऱ्या विश्वामित्रासारख्या पराक्रमी पुरुषाला हां हां म्हणतां आपल्या कबजांत आणणारा कामदेव सभेंत बसला होता तिकडे इंद्राची दृष्टि गेली. कामदेवानें लागलीच हें काम आपल्याकडे घेतलें, फक्त मधु आणि माधव म्हणजे वसंतर्तूचे चैत्र व वैशाख हे दोन मास आपल्या मदतीला द्यावेत म्हणून त्यानें विनंति केली, ती इंद्रानें ताबडतोब मान्य केली. इंद्रसभेंत कामदेवानें स्वपराक्रमाची खूप बढाई मारली आणि इतर देवांनींही त्याची मुक्तकंठानें खूप स्तुति केली. त्यामुळें तो अगदीं शेफारून गेला. चंद्राचें तेज तारकांवर चालत असलें तरी सूर्यापुढें तें निर्माल्यवत् होतें त्याप्रमाणेंच शंकरापुढें आपली स्थिति होईल ही कल्पना त्या अज्ञ कामदेवाच्या मनांत आली नाहीं. शंकर जेथें तपश्चर्या करीत बसला होता तेथें कामदेव गेला. वसंतऋतूचा उदय होऊन तें तपोवन उपवनासारखें आल्हाददायक झालें. तथापि शंकराला त्याची दादही नव्हती. तो आपल्या समाधींत मग्न होता. बाह्य उपाधींच्या आंगीं त्याच्या योगयुक्त अंतःकरणावर परिणाम करण्याचें सामर्थ्य नव्हतें. नित्याप्रमाणें पार्वती त्याच्या दर्शनाला आली. तिनें त्याला

वंदन केलें; आशीर्वाद देण्यासाठीं भगवान् शंकरानें तिच्याकडे पाहिलें. कामदेवाला वाटलें कीं ही संधि बरी आहे. त्यानें आपल्या धनुष्याला बाण लावला. शृंगार रसाच्या विभावांची आणि अनुभवांची त्यानें अगोदरच गर्दी करून सोडली होती. त्या परिस्थितीचा अत्यंत सूक्ष्म पण निश्चित परिणाम शंकरावर झाला कीं काय असें वाटण्याला कारण झालें. रोज दर्शनाला येणाऱ्या पार्वतीकडे पाहून त्याच्या चित्त-वृत्तींत कधींही अल्पसुद्धां क्षोभ झालेला नव्हता. पण त्या निमेषांत शिवाची दृष्टि, पार्वतीच्या ओठांकडे गेली. ती निश्चल दृष्टि, ती योगयुक्त दृष्टि, ती शांत व दांत दृष्टि एक पळभर कां होईना पण फिरली, चलित झाली, पतित झाली. पार्वतीच्या आश्चर्यकारक सौंदर्याची, तिच्या ललित माधुर्याची त्या दृष्टीला पळभर कां होईना पण भूल पडली. कामदेवाचा प्रहार सफल झाला कीं काय—पण एक पळभर विचलित झालेली चित्तवृत्ति त्या जितेंद्रिय महंताच्या लक्षांत आली आणि लक्षांत आली त्याबरोबर त्यानें तिला मागें ओढली, तिला शांत केली व आपल्या चित्तवृत्तींत आंतर्दोषानें चांचल्य येणें शक्य नसल्यामुळें त्याला बाह्य कारण असावें हें त्यानें तत्काळ ओळखलें. शंकराचें अंतःकरण अत्यंत निर्मळ होतें. तेथून चित्तवृत्ति चलित होण्याची प्रेरणा उद्भवणें शक्यच नव्हतें. तेव्हां बाहेरची हवा बिघडली हें शंकराच्या ध्यानांत आलें व आपल्या समाधीला विघ्न करण्यासाठीं अशी हवा बिघडविणारा कोण आहे हें पाहण्यासाठीं शंकरानें चोहों-कडे पाहिलें. व धनुष्याला बाण लावून आतां दोरी ओढणार अशा स्थितींत पवित्रा करून बसलेला कामदेव त्याच्या दृष्टीस पडला. कामदेवाचें साहस पाहण्यासाठीं वर आकाशांत देवांच्या झुंडीच्या झुंडी लोटल्या होत्या. त्यांनीं पाहिलें कीं शंकर प्रसन्न दिसत नाहीं, आणि कामदेवावर कांहींतरी भयंकर प्रसंग ओढवणार. तेव्हां "देवा, आपला क्रोध आवर" अशी प्रार्थना करून त्यांनीं आकाश भरून टाकिलें; पण एका निमिषांत शंकराचा तिसरा नेत्र किंचित् उघडला आणि त्यांतून बाहेर पडलेल्या आगीच्या लोळांत कामदेवाच्या सुंदर शरीराचें हां हां म्हणतां भस्म झालें. हा सर्व प्रकार हें वर्णन करण्याला जितका वेळ लागला त्याच्या एक शंभरांशा-पेक्षांही कमी काळांत घडून आला. कामदेवाची पत्नी रति त्याजबरोबर आलेली होती; ती दुःखावेगानें मूर्च्छित झाली. देवांनीं शंकराची चित्तवृत्ति चंचल म्हणजे सानुराग करण्यासाठीं रचलेला व्यूह ढांसळला आणि जितेंद्रिय भगवंताच्या कटाक्ष-पातानें कामदेवाची मात्र राखरांगोळी होऊन गेली. आपल्या अत्यंत सुंदर,

ललित, आकर्षक अशा सौंदर्याकडे पाहून अनुरागाचा उदय स्वाभाविकपणें व्हावा, त्याऐवजीं शंकराच्या त्या क्षणमात्र क्रोधानें केलेला तो अनर्थ पाहून पार्वती लज्जित झाली. तिला आपल्या रूपाचा गर्व होता. आणि कां नसावा? तिचें रूप असामान्य होतें. त्या रूपसंपदेच्या जोरावर एक दिवस शंकराचें अंतःकरण आपण विद्ध करून टाकूं असें तिला वाटत होतें. या जगांत तिच्यासारख्या अप्रतिम रूपाला न भाळणारा पुरुष असेल असें तिलाच काय पण कोणालाही वाटण्याचें कारण नव्हतें. आणि रूपाची भुरळ नेत्रांवर पडून नेत्र सानुराग होणें हा निसर्गक्रमच नाहीं काय? पण पुरुषांमध्येंही पुरुषोत्तम एखादा मिळतो याची तिलाही कल्पना नव्हती. शंकर हा उत्तमोत्तम वर म्हणून त्याविषयीं ती अनुरक्त होती. पण याची उत्तमता उत्तमोत्तमाच्याही कोटीपलीकडची आहे, आणि केवळ रूपाच्या नखऱ्यानें वश होणारा हा पुरुष नव्हे हें तिला त्या विलक्षण प्रसंगीं पटलें. रूपाला न भाळणारा आणि रूपापेक्षांही बलवत्तर अशा गुणसंपदेची अपेक्षा करणारा—बाह्यांगाच्या भपक्यानें डोळे न दिपणारा म्हणून अंतरंगाच्या गौरवाची अपेक्षा करणारा—असा हा शंकर आहे हें तिनें जाणलें आणि तिचा आपल्या रूपाचा अभिमान गळला. ज्या रूपानें शंकरासारखा पति मिळण्याची शक्यता नाहीं त्या रूपाचा एवढा गर्व बाळगल्याबद्दल तिला अनुताप झाला. शंकराला जिंकावयाचें असेल, त्याच्या अंतःकरणांत आपल्याबद्दल अनुराग उदित करावयाचा असेल, अशा लोकोत्तर पुरुषाचें लोकोत्तर प्रेम जर संपादन करावयाचें असेल तर कोणत्याही पुरुषाला भूल पाडणारें केवळ रूप–मग तें कितीही सुंदर असो–कामीं येणार नाहीं; तर शंकराची गुणमत्ता, त्याची जितेंद्रियता, त्याची तपश्चर्या हीं आपल्या आंगीं बाणलीं पाहिजेत हें पार्वतीच्या लक्षांत आलें. रूपाचा अभिमान तिनें सोडला. ती रूपाला तुच्छ मानूं लागली; आणि उत्कृष्ट तपश्चर्या करून शंकराच्या मोठेपणाची भूमिका प्राप्त करून घेण्याचा तिनें निर्धार केला. तिला गुणांची जाणीव होती आणि गुणांना जिंकून निर्गुण बनलेल्या देवाधिदेवाची पत्नी व्हावयाला विलक्षण योग्यता आंगीं आली पाहिजे हें तिला पटलें. आपण तप करणार असें तिनें मातापितरांना कळविलें. त्यांनीं तिचा निर्धार पाहून मोठ्या नाखुषीनें तिच्या म्हणण्याला रुकार दिला. आणि अशा प्रकारें पार्वती तपश्चर्या करण्यासाठीं एका सखीसह वनांत गेली.

१०. पार्वतीच्या अंतःकरणाचें हें परिवर्तन अतिशय महत्त्वाचें आहे; आणि तिच्या उत्तमत्वाचें, थोरपणाचें, व कर्तृत्वाचें खरें मर्म त्यांत आहे. केवळ

रूपाला भाळणारा पुरुष पुनः रूपाच्या आहारीं जाण्याचा संभव असतो ही गोष्ट त्या चतुर कन्येच्या लक्षांत यावी हें स्वाभाविक होतें. रूपाला रूपत्व देणाऱ्या गुणसंपदेला मान्य करणारा असा पुरुष ज्या स्त्रीला लाभला तिचें भाग्य परम थोर याबद्दल तिला शंका नव्हती. म्हणून, जरी सखीदेखत आपल्या रूपाचा अवमान झाला असें वाटून ती ओशाळली होती तरी शंकराचा तिला राग आला नाहीं. किंबहुना त्या प्रसंगामुळें हाच पति पाहिजे हा तिचा निश्चय दृढतर झाला, आणि त्याची प्राप्ति व्हावी म्हणून तपश्चर्या कितीही बिकट करावी लागली तरी करावयाची असें तिनें ठरविलें. तिच्या तपाचें जें वर्णन कवीनें केलें आहे तें वाचलें म्हणजे तिच्या निश्चयी स्वभावाची खात्री पटते. असा अद्वितीय पुरुष पति मिळावा, अशा पतीचें प्रेम म्हणजे कांहीं तरी अपूर्व असणार,

**तथाविधं प्रेम पतिश्च तादृशः।**

तेव्हां सर्व उपाय करून त्याची प्राप्ति आपण करून घेतलीच पाहिजे यासाठीं तिनें मुनिव्रताचा अंगीकार करण्याचें ठरविलें. तिच्या आईनें तिची समजूत घालण्याचा पुष्कळ प्रयत्न केला व " तुझ्या नाजुक शरीराला तपश्चर्या सोसणार नाहीं " असें परोपरीनें तिला सांगितलें. पण ज्या नाजुकपणामुळें अभीष्ट वराची प्राप्ति होत नाहीं, त्या नाजुकपणाची प्रतिष्ठा पार्वतीजवळ राहिली नव्हती. शंकर प्रसन्न होईपर्यंत आपण तपश्चर्या करणार असें तिनें मातापितरांना निक्षून सांगितलें. सखीला बरोबर घेऊन उग्र तपश्चर्या आचरण्यासाठीं ती गौरीशिखरावर गेली. चंदनादि शीतल उपचार तिनें टाकून दिले. आपल्या सुंदर केशकलपाच्या तिनें जटा बनविल्या. ज्या हातांनीं कंदुकक्रीडा करावी त्यांना जपमाळेचे मणि ओढण्यास लाविलें; आणि चारही बाजूला चार अग्नि पेटवून सूर्याच्या प्रखर किरणाच्या माऱ्याखालीं तिनें पंचाग्निसाधन आरंभिलें. अशी तपश्चर्या करतां करतां जसजसे अधिकाधिक दिवस लोटले तसतसा तिच्या शरीराचा गौरवर्ण नाहींसा होऊन त्या ठिकाणीं काळसरपणा दिसूं लागला. तिची ती खडतर तपश्चर्या पाहून आजूबाजूचे ऋषि चकित झाले आणि तिला मोठा मान देऊं लागले. ती वयानें लहान होती. पण धर्मवृद्ध होती म्हणून तिच्या वयाचा विचार न करतां मुनिजनांनीं तिला ज्येष्ठपणाचा मान दिला. तिच्या सान्निध्यामुळें तें सर्व तपोवन पवित्र होऊन गेलें, आणि पशुपक्ष्यांदिकांतूनहि क्रूरता वगैरे दोष नाहींसे झाले. अनुरूप पति मिळविण्यासाठीं ( येथें अनुरूप हा शब्द रूढार्थानें योजिलेला आहे ) एवढी तपश्चर्या कर-

णारी ही बालिका केवळ निश्चयी होती एवढेंच नव्हे तर तिला जें प्रेम पाहिजे होतें तेंही मोठें अपूर्व असें होतें हें लक्षांत येण्यासारखें आहे. केवळ उरलेलें आयुष्य सुखांत जावें म्हणून अनुरूपता आणि प्रेम यांचा विचारही न करतां श्रीमंत पतींना पैशाच्या अवाढव्य रकमा नजर करून त्यांची प्राप्ति करून घेऊं पहाणाऱ्या कित्येक आधुनिक सुशिक्षित कन्यांनीं व त्यांच्या मातापितरांनीं हें पार्वतीचें उदाहरण लक्षांत घेऊन आदर्श आर्यकन्या पार्वती ही आहे कीं केवळ अर्थव्यवहारास्तव पति हुडकणारी आधुनिक कन्या आहे याचा विचार करावा. आम्हांला तर पार्वतीचें उदाहरण अत्यंत अनुकरणीय व रमणीय वाटतें. तिची तेजस्विता आणि तपश्चर्या करण्याची तयारी हीं जर आमच्या वर्तमानकालीन कन्यकांनीं आंगीं बाणवून घेतलीं तर त्यांची उन्नति कोणालाही थांबवितां येणें शक्य नाहीं.

अशा प्रकारें पार्वतीची कित्येक दिवस चाललेली तपश्चर्या पाहून प्रत्यक्ष शंकरालाही कौतुक वाटलें आणि ज्या "केनापि कामेन तपश्चचार" तो काम पूर्ण होणार असें त्याला वाटूं लागलें. तिच्या त्रिलोकसुंदर रूपाला तो भुलला नाहीं; पण तिच्या त्या आश्चर्यकारक तपश्चर्येनें त्याचें अंतःकरण प्रसन्न झालें, आणि जें कार्य कामदेवाच्या खटाटोपानें साध्य झालें नाहीं तेंच पार्वतीच्या गुणसंपदेनें, तपोबलानें सिद्ध होणार अशीं चिन्हें दिसूं लागलीं. पण आपणांबद्दल तिच्या अंतःकरणांत उत्पन्न झालेली भावना खरोखर किती तीव्र आहे याची कसोटी पाहिल्याशिवाय आपलें मनोगत प्रकट करावयाचें नाहीं असें त्यानें ठरविलें आणि एके दिवशीं तिची कसोटी पहाण्यासाठीं पार्वती जेथें तपश्चर्या करीत होती तेथें भगवान् शंकर बटुरूप धारण करून गेला. मृगचर्म धारण करणारा तो बालब्रह्मचारी अत्यंत तेजस्वी दिसत होता. प्रत्यक्ष ब्रह्मचर्याश्रमच शरीरबद्ध होऊन आला आहे कीं काय असें त्याकडे पाहून वाटत होतें. तो आश्रमांत आल्यावर रीतीरिवाजाप्रमाणें पार्वतीनें त्याचा योग्य सत्कार केला. त्या बटूनें थोडा वेळ विश्रांति घेतली आणि अत्यंत ऋजु म्हणजे सरळ, निष्पाप दृष्टीनें तिच्याकडे पाहून तिला कुशल विचारलें. कालिदासाचे बटु हे निष्पाप दृष्टीनेंच पहाणारे असतात याचें वर्णन पूर्वी आलेलें आहे; आणि पार्वतीसारखी अत्यंत रूपवती कुमारिका व हा कुमार ब्रह्मचारी यांच्या भेटीचें वर्णन करतांना "ऋजुनैव चक्षुषा" असे शब्द घालून कवीनें त्या प्रसंगाची उदात्तता प्रकट केली आहे. रसिक वाचकांना बाण-

भट्टाच्या कादंबरींत चंद्रापीड व महाश्वेता यांच्या भेटीचा प्रसंग असाच उदात्त भूमिकेवर आहे हें या ठिकाणीं आठवणें साहजिक आहे. बटूनें पार्वतीला केलेले प्रश्न समयाला अनुसरून असे होते, पण त्यांत विनोदही चमकत होता. "यज्ञासाठीं समिधा आणि कुश हे सुलभपणानें मिळतात ना? स्नान करतां त्या ठिकाणीं पाणी फार खोल नाहीं ना? शरीराच्या आवाक्याबाहेर तपश्चर्येचे श्रम होत नाहींत ना? कारण शरीर धड असेल तरच हातून धर्मसाधन योग्य प्रकारें होईल," वगैरे प्रश्न त्यानें विचारलें व पुढें तो म्हणाला:– "तुझ्या तपश्चर्येनें हा हिमालय पर्वत पावन झालेला आहे. येथें सप्तर्षि आहेत त्यामुळें किंवा येथें गंगेचा प्रवाह खेळतो आहे त्यामुळें सुद्धां एवढी पावनता या पर्वताला आली नव्हती." आणि मग त्यानें विचारलें कीं ही येवढी खडतर तपश्चर्या तूं कशासाठीं चालविली आहेस? हा त्याचा प्रश्न बरोबरच होता. कारण, तपश्चर्या करून पार्वती अधिक काय मिळवणार होती?

कुले प्रसूतिः प्रथमस्य वेधसः
त्रिलोकसौंदर्यमिवोदितं वपुः ।
अमृग्यमैश्वर्यसुखं नवं वयः
तपःफलं स्यात्किमतः परं वद ॥ कुमार० ५–४१ ॥

अगदीं पहिला असा जो वेधा म्हणजे ब्रह्मदेव त्याच्या कुळांत तिचा जन्म झालेला होता. तिच्या शरीराकडे पाहिलें म्हणजे त्रैलोक्यांतलें सौंदर्य एकवटून उभें राहिलें कीं काय असें वाटत होतें. सगळें ऐश्वर्यसुख तिला इच्छेप्रमाणें आपोआप मिळत होतें–तें हुडकण्याची कांहीं तिला आवश्यकता नव्हती. आणि तिचें वय अगदीं तरुण होतें. तेव्हां तपश्चर्या करून आणखी कांहीं मिळविण्याला राहिलें होतें अशांतला प्रकार नव्हता. तरी पण तिनें तपश्चर्या चालविली होती म्हणून बटूनें आश्चर्यानें विचारलें, "या अशा यौवनकालांत, दागदागिने वस्त्रभूषणें टाकून म्हातारपणाला शोभणारीं हीं वल्कलें तूं काय म्हणून धारण केलीं आहेस? स्वर्गसुखासाठीं अशी तपश्चर्या तूं करण्याचें कारणच नाहीं. कारण तुझ्या पित्याच्या म्हणजे हिमाचलाच्या अनेक भूमी अशा आहेत कीं त्या सौंदर्यांत स्वर्गालाहि लाजवितात. पण कदाचित् योग्य पति प्राप्त करून घेण्यासाठीं तर ही तुझी तपश्चर्या नसेल ना? पण तेंही शक्य नाहीं. तुझ्यासारख्या रत्नाला पति हुडकण्याचे श्रम

करण्याची जरूरच नाहीं. रत्नाला हुडकत लोक येत असतात, रत्न कधीं दुसऱ्यास हुडकण्यासाठीं जात नसतें. " अशा प्रकारें बोलतां बोलतां पति हा शब्द येतांच पार्वतीनें एक सुस्कारा टाकला. तेव्हां बटूनें तिचें हृद्गत ओळखलें. ( म्हणजे कवीनें तें वाचकांनीं ओळखावें अशी युक्ति केली. ) तो म्हणालाः-- "तुझ्या रूपाला शोभणारा पुरुषच मला कोणी दिसत नाहीं. तेव्हां तुझें चित्त ज्याच्या ठिकाणीं जडलें असेल तो भाग्यवान् समजला पाहिजे. तो तुला प्राप्त होणार नाहीं ही गोष्टच शक्य नाहीं. त्यांतही जर असा कोणी तुझ्यावर प्रसन्न न होणारा विलक्षण पुरुष असलाच तर ही खडतर तपश्चर्या पुरी कर. मीही तप करून पुण्य गांठीं बांधलें आहे. त्याचा अर्धा भाग तुला मी आनंदानें देतों. त्याच्या साहाय्यानें इच्छित वराची तूं प्राप्ति करून घे." या भाषणांत आमच्या कविकुलगुरूनें ध्वनि किती उत्कृष्ट साधला आहे हें रसिकांच्या लक्षांत येईलच. माझें अर्ध तप घे, म्हणजे माझ्या अर्ध्या तपाची मालकीण हो, म्हणजे माझी अर्धांगी हो असें शंकरानें या प्रकारें सुचविलें. आतां हा काव्यांतला ध्वनि पार्वतीनें ओळखला नाहीं. पण तिची मनःस्थितीच त्या कार्याला अनुकूल नव्हती व कवीनें केलेली ध्वनीची योजना रसिक वाचकांना शंकराची मनस्थिति कळावी यासाठीं आहे हें सांगण्याची आवश्यकता नाहीं. शेवटीं बटूनें हा भाग्यवान् पुरुष कोण म्हणून विचारलें. आर्यकन्यकांच्या परंपरेला अनुसरून पार्वतीनें प्रियकराचें नांव स्वतः घेतलें नाहीं पण तें सांगण्याबद्दल सखीला खूण केली. तेव्हां सखीनें सांगितलेंः-" मोठमोठ्या देवादिकांच्या मागण्या झिडकारून शंकरच आपणास पति पाहिजे असा हिनें निश्चय केला आहे. आणि शंकरानें तर जेथें मदनाला जाळून टाकिलें तेथें त्याच्यावर कितीही उत्तम रूप असलें तरी त्याचा काय परिणाम होणार? तो अरूपहार्य आहे. तेव्हां त्याची प्राप्ति करून घेण्यासाठीं हिनें ही खडतर तपश्चर्या आरंभिली आहे. बिचारीला शंकराशिवाय दुसरा ध्यास नाहीं. झोंपेंत सुद्धां त्याचेंच नांव ही घेते आणि जागेपणीं तर त्याचाच जप हिनें चालविलेला असतो." याप्रमाणें सखीनें सुरवात करून दिल्यावर पार्वती म्हणालीः-" एवढा थोर पति मिळावा ही मोठी आकांक्षा मी धरलेली आहे. ती सिद्ध होण्याला ही माझी तपश्चर्या पुरी पडेल का नाहीं हें मला माहीत नाहीं. पण माझा मनोरथ मोठा आहे आणि मनोरथाला तरी कोठेंही मज्जाव नाहीं." हें तिचें भाषण ऐकून त्या बटुवेषधारी शंकराच्या अंतरंगांत प्रसन्नतेचा प्रकाश

पडला; पण बाह्यात्कारीं त्यानें तोंड आंबट केलें. तो म्हणाला:—"एकूण त्या शंकरासाठीं ही एवढी तपश्चर्या! तो स्मशानवासी भिकारडा कां तुला पति हवा? नाहीं; पार्वती, तुझ्या या आकांक्षेला माझ्याच्यानें अनुमति देववत नाहीं. त्याचे गुण काय? त्याचा आहार विहार काय? त्याचा कपडालत्ता काय? जवळ संपत्तीचा तर पूर्ण वषट्कार! आणि काय त्याचें रूप! डोळे सर्वांना दोन असतात तर याला डोळे तीन! कोठें त्याचा जन्म झाला याचा पत्ताही नाहीं. विरूपाक्ष नांव ऐकलें कीं त्याच्या रूपाची दुसरी कल्पना करावयास नको. दिगंबर नांव घेतलें कीं त्याच्या वैभवाचें गांठोळें जगजाहीर झालें. पार्वति, पति हुडकतांना जे जे गुण त्याच्या ठिकाणीं पाहतात ते सगळे महादेवाच्या ठिकाणीं अगदीं गैरहजर आहेत. तूं त्याची अर्धांगी होऊन त्याच्याजवळ बसलीस कीं ज्या तुझ्या अंगाला चंदनाची उटी रोज लागते तेथें तें स्मशानांतलें भस्म लागेल. आणि इंद्राच्या ऐरावताला लाजविणाऱ्या हत्तीवर बसून मिरवणारी तूं राजकन्या जेव्हां त्या शंकराच्या वाहनावर म्हणजे बैलावर बसून हिंडावयाला निघशील, तेव्हां लोकांची हंसतां हंसतां पुरेवाट होईल आणि तूं लाजेनें थिजून जाशील. पार्वति, हा भलता विचार सोड. असला तीन डोळ्यांचा ( त्रिलोचन ) पति तुला मिळवून देण्यासाठीं मी कांहीं तुला माझी अर्धी तपश्चर्या अर्पण करणार नाहीं. हा वेडेपणाचा आलेला आवेश आवर आणि त्या दरिद्र शंकराचा हव्यास सोड." शेवटीं "कुठें तुझ्यासारखें सुलक्षण कन्यारत्न आणि कुठें त्या शंकरासारखा विलक्षण पुरुष!" असें म्हणून बटूनें आपलें भाषण संपविलें. महादेवाच्या निंदेनें भरलेलें तें भाषण ऐकून पार्वती रागावली. तिचे ओंठ कापूं लागले. तिच्या मुखावर रक्तिमा चढला. तिचे डोळे लाल झाले. ती म्हणाली:—"शंकराचें यथार्थ ज्ञान तुला नाहीं म्हणून तूं असें बरळत सुटला आहेस. मूर्खांना थोरांचा नेहमीं द्वेष वाटतो; कारण थोरांची वागणूक सर्वसामान्य नसते, सर्वांना साधण्यासारखी नसते. तिचा हेतु कळणेंसुद्धां दुरापास्त असतें. ज्यांना कसलाही लोभ नाहीं, ज्यांचा सर्व व्यवसाय केवळ दुसऱ्यांच्या कल्याणाकरतां, अशा सज्जनांचें चरित्र करंट्या लोकांना समजणें शक्य नाहीं. तूं सांगतोस कीं शंकर अकिंचन आहे. पण सर्व संपत्तीचा उगम त्याच्यापासून झालेला आहे हें तुला माहीत नाहीं. तूं त्याला दिगंबर म्हणतोस. पण, तो या त्रैलोक्याचा धनी आहे हें तुला माहीत नाहीं. त्याला कोणी विरूपाक्ष म्हणतात; पण तो अत्यंत कारुणिक आणि कल्याणप्रद असल्यामुळें शिव

या नांवानें सर्वत्र विख्यात आहे. तो हा पिनाकी शंकर त्याचें रूप यथार्थपणें जाणणारे फारच थोडे लोक आहेत—नाहींतच म्हटलें तरी चालेल. त्याच्या आंगाला लावलेल्या चिताभस्माचा एक कणच भयंकर पातकांचा नाश करण्याला समर्थ आहे आणि म्हणून तर स्वर्गांतले देव आपलें गाणें नाचणें सोडून तें भस्म आपल्या मस्तकावर धारण करतात. होय, शंकराचें वाहन बैल आहे; पण ऐरावतावर बसणारा इंद्र आपलें मस्तक त्या वृषभवाहनाच्या पायावर ठेवून आपणांला धन्य समजतो. तूं अलक्ष्यजन्मा असें विशेषण देऊन शंकराची चेष्टा करण्याचा प्रयत्न केलास. पण तुझी इच्छा नसतांनाही त्या विशेषणामुळें तूं शंकराची खरोखर स्तुति केली आहेस. सर्व विश्वाचें कारण जो आत्मभू ब्रह्मदेव त्याचेंही जो कारण आहे, त्या शंकराचा जन्म कोठें झाला हें कोणाला कसें सांगतां येणार? असूंद्या. तूं शंकराविषयीं म्हणतोस तें खरें असो किंवा खोटें असो. खरें असलें तरीही मला पर्वा नाहीं. माझें अंतःकरण त्याच्या ठिकाणीं स्थिर झालेलें आहे आणि तूं केलेल्या या निंदेमुळें तें ढळण्याचा बिलकुल संभव नाहीं." इतकें बोलून ती सखीला म्हणाली :— "या बटूला आणखी बोलूं देऊं नकोस. थोरांची निंदा करणारा पापी असतोच, पण ती निंदा ऐकणें म्हणजे सुद्धां पाप आहे. याला घालवून दे नाहीं तर मीच येथून जातें." असें म्हणून ती जावयास निघाली. तिच्या निरतिशय प्रेमामुळें चकित झालेल्या शंकरानें बटुवेश टाकून देऊन आपलें खरें रूप प्रकट केलें आणि हंसून तिचा हात धरला—तिचें पाणिग्रहण केलें—तेव्हां ती जावयास निघालेली बालिका थबकली. तिला राहण्याचाही संकोच वाटूं लागला, पण तिचा पायही उचलेना. महादेव प्रेमळ शब्दांनीं तिला म्हणाला:—"तुझ्या या विलक्षण तपश्चर्येच्या मोलानें तूं मला विकत घेतलें आहेस. मी तुझा दास आहें." हे त्याचे शब्द ऐकून तिचा तपश्चर्येचा सारा शीण नाहींसा झाला. केलेलें तप सफळ झालें म्हणून तिची वृत्ति उल्हसित झाली आणि प्रियकराच्या पाणिग्रहणामुळें आठही सात्विक भाव तिच्या ठिकाणीं उदय पावले.

याप्रमाणें ही प्रेमकथा आहे. यापुढें हें लग्न कसें जमविलें वगैरे वर्णन यथास्थळ येईल. जरी शंकरानें पाणिग्रहण केलें तरी कन्यादानाचा अधिकार पित्याचा आहे हें त्याला सुचवून पार्वतीनें प्रियकरावर मात केली आणि उत्कृष्ट प्रेम व सदाचार यांचें साहचर्य आहे हें फार खुबीदारपणानें व्यक्त केलें. मातापितरांनीं मुलांबाळांना पुष्कळसें स्वातंत्र्य द्यावें, विवाहाच्या बाबतींत त्यांना आपला भागी-

दार निवडण्यास मुभा द्यावी, आणि मुलांमुलींनींही आईबापांचा सल्ला घेऊन सर्व गोष्टी योग्य प्रकारें कराव्यात असा कालिदासानें काढलेल्या या रमणीय चित्राचा इत्यर्थ आहे. प्रस्तुत कालीं आपल्या समाजांत विवाहविषयक विचारांचीं जीं आंदोलनें चाललेलीं आहेत त्यांच्या संबंधांत हें कालिदासप्रणीत तत्त्व फार लक्षांत ठेवण्यासारखें आहे. पार्वती ही जशी तेजस्विनी आणि मनस्विनी कन्या होती तशीच ती मातापितरांच्या लाडांत वाढलेली, त्यांच्याबद्दल आदर असलेली कुलकन्यका होती. तिचीं मातापितरें समजूतदार होतीं. वैवाहिक प्रश्नांच्या बाबतींत आईबाप व मुलें यांचीं परस्परांसंबंधीं काय वृत्ति असावी, म्हणजे समाजांत सुख नांदेल याची कल्पना पार्वतीचें हें मनोरम चित्र काढून कालिदासानें रसिक वाचकांना दिलेली आहे.

११. यानंतर आपण सीताचरित्राकडे वळावयाचें. अखिल भरतखंडाला ललामभूत आणि वंदनीय अशी पुराणांत वर्णन केलेली पतिव्रतांची शिराणी जनककन्या सीता हिच्या उज्वल आणि आश्चर्यकारक चरित्राचें व चारित्र्याचें गायन अनेक कवींनीं करून आपल्या वाङ्मयाला थोरवी आणलेली आहे. मुनिश्रेष्ठ आणि आद्यकवि वाल्मीकि –"ज्याच्या शोकाला श्लोकत्व प्राप्त झालें" (श्लोकत्वमापद्यत यस्य शोकः) असें कालिदासानें मोठें यथार्थ वर्णन ज्याचें केलें आहे – यानें रामायणांत सांगितलेली सीतेची कथा फारच मनोहर आहे. जानकीचें नांव ऐकलें कीं प्रत्येक पुरुषाचें मस्तक लवतें; प्रत्येक स्त्रीला त्या नांवामुळें स्फूर्ति मिळते; त्या जानकीचें एका विशिष्ट काळांतलें म्हणजे उत्तरवयांतलें चित्र आमच्या कविकुलगुरूनें रंगविलें आहे. कालिदासाच्या ठिकाणीं स्त्रियांबद्दल जी कारुण्यबुद्धि विलसत होती तिच्या पार्श्वभूमीवर रघुवंशाच्या चौदाव्या सर्गांत व पंधराव्या सर्गांत जानकीचें चित्र अत्यंत कुशलतेनें रेखाटलेलें आहे. आणि जरी इतर अनेक कवींनीं हीच कथा वर्णन केलेली आहे तरी ग्रथनकौशल्यामुळें काव्याला नवीनपणा येतो या न्यायानें हें कालिदासाचें सीता–गीत अतिशय उदात्त आणि मनोहर उतरलेलें आहे. कुमारसंभवांतील पार्वतीच्या वर्णनांत मनस्वी, तेजस्वी आणि सच्छील तरुणीचें चित्र कवीनें रंगविलें. शाकुंतल या जगद्विख्यात नाटकांत भोळ्या आणि शांतप्रकृति अशा वन्य बालिकेची कथा त्यानें गाइली; रघुवंशांत रामचरित्राला उणेपुरे सहा सर्ग दिले आहेत; त्यांतील उपरोक्त दोन सर्गांत जिच्यावर उत्तरवयांत विलक्षण प्रसंग येऊन जिची पतीशीं ताटातूट कायमची झाली अशा

सीतेचें— जानकीचें, चरित्र अत्यंत काव्यमय वृत्तीनें त्यानें वर्णन केलें आहे. विवाहापासून ते रावणाचा पराभव होईपर्यंत जें सीता-चरित्र झालें त्याचें स्वतंत्र वर्णन कालिदासानें केलेलें नाहीं. त्याचें कारण पुनरुक्ति करावयाची नाहीं हा त्याचा निश्चय होता हेंच असावें असें वाटतें. स्वयंवर, विवाह, पतिपत्नीचा बाह्य कारणांमुळें वियोग, इत्यादि वर्णनें रघुवंशांत पूर्वीच येऊन गेलीं होतीं. वधूपरीक्षण, वरसंशोधन, परिणयसमारंभ इत्यादि विषयाची उभारणी कुमारसंभवांत झाली होती. त्याच प्रकारचीं तींच वर्णनें सीतेच्यासंबंधीं कवीनें केलीं नाहींत. तथापि ज्या पतिपत्नींत अत्यंत प्रेम होतें, जिच्या प्रेमामुळें रामचंद्रासारखा गंभीर पुरुष पंपा सरोवराच्या तीरावर धाय मोकलून रडला, जिला परत आणण्यासाठीं रावणाशीं त्यानें घनघोर युद्ध केलें, ज्या दोघांनीं कित्येक काळ वनवासांतील दुःख परस्परांच्या संनिधानामुळें स्वर्गसुखच मानिलें, त्या पतिपत्नींत त्यांच्या उत्तरवयांत एका क्षुद्र माणसाच्या विषारी शब्दामुळें कसा वियोगप्रसंग आला, आणि त्या वियोगाला टक्कर देतांना जानकी कशी वागली याचें हृदयंगम चित्र आपल्या कवीनें काढिलें आहे. त्या चित्राला पूरक म्हणूनच कीं काय महाकवि भवभूतीनें आपलें उत्तररामचरित लिहिलें असें केव्हां केव्हां वाटतें. गांवांत उठणाऱ्या गप्पांमुळें, लोकांच्या कलुषित वृत्तीमुळें कधीं कधीं रामसीता यांच्यासारख्या ध्येयरूप जोडप्यांवर काय प्रसंग येतो या विषयाची परिस्फुटता आपल्या ओघवती व रसनिस्यंदी वाणीनें कालिदासानें केलेली आहे. ती वाचतांना आर्यस्त्री म्हणजे काय याचें क्षणोक्षणीं चित्र डोळ्यांपुढें उभें राहतें आणि तें जरी डोळे पाण्यानें वरचेवर भरून येतात तरी स्पष्ट दिसतें.

रघुवंशाच्या तेराव्या सर्गांत लंका जिंकून व तेथें राज्यपदावर बिभीषणाची स्थापना करून राम पुष्पक विमानावर आरूढ होऊन सीतेसह अयोध्येला परत येत आहे असें वर्णन आहे. पुष्कळ दिवस परकीयांच्या हातांत सांपडलेल्या शुद्धचरित प्रियपत्नीला बरोबर घेऊन विमानांतून परत जातांना रामचंद्र वाटेंत दिसणाऱ्या स्थळांचें व त्यामुळें स्मरणाऱ्या प्रसंगांचें वर्णन करीत आहे हा देखावा खरोखर मनोहर आहे. वर्णन करतां करतां रावणानें तिचें हरण केल्यावर तिच्या वियोगानें आपण कसें वेडे बनलों याचाही उल्लेख राम करतो. हें सर्वच वर्णन दांपत्यस्नेहानें रसरसलेलें असून सहृदयांना अत्यंत आनंद देणारें आहे. पत्नीला बरोबर घेऊन सहल करण्याची मुभा आमच्या पुरुषांना भरपूर होती व रामचंद्रा-

सारख्या एकपत्नी पुरुषाचें हें पत्नीवरील प्रेम व आदरबुद्धि पाहिली म्हणजे अलिकडे पतिपत्नीसंबंधीं प्रचलित असलेल्या कल्पना आमच्या पूर्वजांच्या नव्हेत असें खचीत वाटतें. जानकीचा त्याग करण्याला राम पुढें तयार झाला याचें कारण राजा आणि पति या नात्यांच्या कर्तव्यांत त्यानें राजा या नात्याच्या कर्तव्याला अधिक महत्व दिलें हें होय.

**कौलीनभीतेन गृहान्निरस्ता**
**न तेन वैदेहसुता मनस्तः ।**

कौलीन म्हणजे लोकापवाद, त्यामुळें भ्यालेला असा राम झाला म्हणून त्यानें विदेहकन्या घरांतून काढली; मनापासून त्यानें तिला बाहेर काढलें नव्हतें; हें आपण लक्षांत ठेवलें पाहिजे. असो. तेराव्या सर्गांत निरनिराळ्या भूमिप्रदेशांचें वर्णन करतांना रामचंद्रानें सीतेला ज्या प्रकारें संबोधिलें आहे तो प्रकार मोठा सरस आहे. तिच्या वियोगामुळें झालेल्या दुःखाचें वर्णन एका प्रसंगाचें स्मरण करून रामचंद्रानें केलेलें मोठें सुंदर आहे.

**सैषा स्थली यत्र विचिन्वता त्वां**
**भ्रष्टं मया नूपुरमेकमुर्व्याम् ।**
**अदृश्यत त्वच्चरणारविंद-**
**विश्लेषदुःखादिव बद्धमौनम् ॥ रघु० १३-२३**

"याच ठिकाणीं तुझा शोध करीत असतांना तुझ्या पायांतलें एक नूपुर पडलेलें दिसलें. तें आवाज करीत नव्हतें. जसें काय तुझ्या पायाचा वियोग झाल्यामुळें तें निःशब्दच झालें होतें." या श्लोकांत केलेली उत्प्रेक्षा सीतेवरील निर्जीव पदार्थांचें प्रेमसुद्धां व्यक्त करते. जेथें नूपुरासारख्या अलंकाराची वियोगानें ही स्थिति झाली तेथें खुद्द रामचंद्राची दशा फारच कष्टदायक असावी यांत नवल नाहीं.

**इमां तटाशोकलतां च तन्वीं**
**स्तनाभिरामस्तबकाभिनम्राम् ।**
**त्वत्प्राप्तिबुद्ध्या परिरब्धुकामः**
**सौमित्रिणा साश्रुरहं निषिद्धः ॥ रघु० १३-३२**

"या तटावरच्या अशोकाची फांदी मला तुझ्या सारखीच भासली. स्तनाप्रमाणें सुंदर अशा पुष्पगुच्छांनीं ती वांकलेली होती, आणि तुझ्यासारखीच नाजुक

होती. तिला तूंच असें समजून मी आलिंगन देण्यास गेलों आणि लक्ष्मणानें डोळ्यांतून पाणी गाळीत गाळीत मला सांगितलें कीं ही सीता नव्हे; मागें व्हा." यांत शृंगार आणि करुण रसांचें जें मधुर संमेलन कवीनें केलें आहे तें अतिशय हृदयंगम आहे. सौमित्रीनें रामचंद्राचा निषेध केला त्यावेळीं त्याच्या डोळ्यांतून अश्रु गळूं लागले किंवा त्याच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले हें वर्णन फारच यथार्थ आहे. आतां आपल्या भावाचें पत्नीवियोगानें डोकें फिरणार असें भय वाटून लक्ष्मणाचे डोळे पाण्यानें भरून आले. हें कौटुंबिक चित्र मनोरम तर खरेंच, पण सीतेबद्दल तारुण्याच्या उष:कालांत ज्याच्या अंत:करणांत प्रेमाचा एवढा उमाळा होता आणि रावणवधानंतरही ज्यांतील दृढता बिलकुल कमी झालेली नव्हती त्याच रामचंद्राला, व्यवहाराला प्राधान्य द्यावें लागल्यामुळें, कसें निष्ठुर वर्तन करावें लागलें हें चित्र डोळ्यांपुढें ठेविलें म्हणजे विरोधामुळें दोन्ही प्रसंग अधिक खुलून दिसतात. तेराव्या सर्गांत स्थलवर्णनें सुंदर आहेतच, पण त्यांतल्या त्यांत गंगायमुनासंगमाचें रेखाटलेलें चित्र फारच यथार्थ व रमणीय आहे. गंगेचा शुभ्र प्रवाह व यमुनेचा कृष्ण प्रवाह यांच्या मीलनाचा चमत्कार पाहून कालिदासानें चार श्लोकांत जी उत्प्रेक्षांची मेजवानी वाचकांना दिली आहे, ती प्रयागदर्शन घडलेल्यांना तर फार समर्पक वाटते. महादेवाच्या शरीरावर शुभ्र भस्म आणि कृष्णवर्ण सर्प हे जसे एकत्र दिसतात त्याप्राणें यमुनातरंग मिसळल्यामुळें गंगाप्रवाह दिसतो अशा अर्थाचा श्लोकचतुष्टयांतील शेवटचा श्लोक आहे.

याप्रमाणें विमानांतून येतां येतां गुह निषादाचें शहर खालीं दिसूं लागलें. येथें रामचंद्रानें जटा धारण केल्या होत्या. तें पाहून सुमंत्र सारथी रडूं लागला व "चांडाळणी कैकेयि, तुझी इच्छा पूर्ण झाली" असें म्हणाला. रामचंद्रानें कैकेयीचा केव्हांही अपमान केला नाहीं; पण वरील स्मरणवर्णनांत रामचंद्रही मनुष्यच होता हें ध्वनिरूपानें कवीनें मोठ्या कौशल्यानें दर्शविलें आहे. नंतर विमान अयोध्येजवळ शरयू नदीवर आलें. तेथें शरयूला उत्तरकोशलाची धात्री असें नांव देऊन रामचंद्रानें आपल्या देशावरचें प्रेम व्यक्त केलें आहे. शरयूवर भरत वगैरे मंडळी रामाच्या आगमनाची वाट पहात होती. भरतानें वल्कलें परिधान केलीं होतीं व हातांत अर्घ्य घेऊन तो उभा होता तेथें विमान उतरलें आणि रामचंद्र व सीता लक्ष्मणासहित आपल्या नगराला आलीं.

१२ तें विमान आकाशांतून उतरतांना पाहून भरताबरोबर आलेले सर्व

प्रजाजन आश्चर्यचकित झाले. राम विमानांतून खालीं उतरला. प्रथम कुलगुरु वशिष्ठाला नमस्कार करून मग रामचंद्रानें अर्घ्याचा स्वीकार केला आणि आपला लाडका व सुशील भाऊ भरत याला प्रेमानें आलिंगन दिलें व त्याचें मस्तक हुंगलें. रामावरील प्रेमामुळें भरतानें राज्याचीही पर्वा केली नव्हती. असो. नंतर प्रधानमंडळांच्या भेटी झाल्यावर व लक्ष्मण सर्वांना भेटल्यानंतर मंडळी अयोध्येंत प्रविष्ट झाली आणि तेथें जाऊन रामलक्ष्मण आपल्या मातांना भेटले. चौदा वर्षांच्या पुनर्दर्शनानंतर कौसल्यासुमित्रांना हर्षातिरेक झाला. सुखाचे आणि दुःखाचे असे शीतल आणि उष्ण अश्रु त्यांच्या डोळ्यांत एकदम उभे राहिले. पण शेवटीं आनंदाश्रूंचाच विजय झाला असें मोठें मार्मिक वर्णन या ठिकाणीं कवीनें केलें आहे. वृद्ध मातांची पुत्रांशीं भेट झाल्यानंतर वीरमाता होणें म्हणजे केवळ सुखाची गोष्ट नाहीं असे उद्गार कवीच्या म्हणजे प्रेक्षकाच्या तोंडून निघावेत यांत नवल नाहीं. नंतर जानकीनें आपल्या तीनीही सासवांना नमस्कार केला. "मी सीता; माझ्यामुळें पतीला फार कष्ट सोसावे लागले; तेव्हां मी बऱ्या लक्षणाची नव्हे;" असें वंदन करतांना सीता म्हणाली. पण तिचे शब्द त्या तीन मातांनीं ग्रहण केले नाहींत. त्या म्हणाल्या, "बाळे, ऊठ; तुझ्या शुद्ध वर्तनामुळें आपल्या धाकट्या बंधुसमवेत तुझा पति एवढ्या मोठ्या संकटांतून पार पडला." आणि तें बोलणें जसें गोड होतें तसेंच खरें होतें ( प्रियमप्यमिथ्या ) असें कवि सांगतो. सासवासुनेचें हें चित्र सुंदर आहे. या चित्राचा विसर आमच्या समाजाला पुढें केव्हां तरी पडला व सासवासुना यांचे संबंध अहिनकुलवत् झाले.

यानंतर रामाला यथाविधि राज्याभिषेक होऊन तो सीतेसह संसार व राज्य करूं लागला. सीता दोहदवती झाली व पुत्रमुखदर्शनाच्या उत्सुकतेनें रामाचें तिच्यावरील प्रेम वृद्धिंगतच झालें. तिचे डोहळे पुरविण्याच्या इच्छेनें रामचंद्र तिला तिचे मनोरथ विचारूं लागला. तेव्हां भागीरथीच्या तीरावरील तपोवनांतून हिंडावें, तेथें ऋषिकन्यकांना भेटावें, तेथें वाढलेले दर्भ व कुश पहावेत अशी आपली इच्छा आहे असें तिनें सांगितलें. यांतही कवीनें तिच्यापुढें काय वाढून ठेवलेलें होतें हें सूचित केलेलें आहे. तिला बिचारीला त्यावेळीं माहीत नव्हतें कीं तिचें उरलेलें आयुष्य त्या तपोवनांतच जावयाचें होतें. त्याच सुमारास सीतेविषयीं शहरांत लोक चमत्कारिक बोलतात अशी हकीकत हेरानें येऊन रामचंद्राला कळविली, अणि प्रजानुरंजन हें राजा या नात्यानें आपलें प्रधान कर्तव्य आहे असें

समजून आपल्या अत्यंत निष्पाप आणि अत्यंत प्रिय अशा पत्नीचा त्याग करण्याचें त्यानें ठरविलें.

किमात्मनिर्वादकथामुपेक्षे
जायामदोषामुत संत्यजामि ॥ रघु. १४–३४.

आपल्यावर आलेल्या अपवादाची उपेक्षा करावी कां निर्दोष भार्येचा त्याग करावा याचा कांहीं वेळ त्यानें विचार केला. पण शेवटीं पित्राज्ञा ही स्वसुखापेक्षां अधिक आहे म्हणून जसा त्यानें पूर्वी राज्याचा त्याग केला होता त्याचप्रमाणें राजाचें पहिलें कर्तव्य प्रजानुरंजन हें आहे असें तत्त्व मान्य करून त्यानें पत्नीच्या त्यागानें तें कर्तव्य पार पाडण्याचा निश्चय केला. त्याचें पत्नीवरचें प्रेम बिलकूल कमी झालें नव्हतें.

अवैमि चैनामनघेति किंतु
लोकापवादो बलवान्मतो मे ॥ रघु. १४–४०

ती निष्पाप आहे हें मी जाणून आहें, पण लोकापवाद हा बलिष्ठ आहे असें मला वाटतें, असें राम सांगतो. आणि नंतर आपल्या तिघां बंधूंना बोलावून त्यानें आपला निश्चय त्यांना कळविला व त्या निश्चयापासून आपणांस परावृत्त न करण्याबद्दल त्यांना बजाविलें; त्याच्या तिघांही बंधूंना हा सीतात्याग मान्य नव्हता हें कालिदासानें याप्रमाणें स्पष्ट केलेलें आहे. "मी जगावें अशी तुमची इच्छा असेल तर माझ्या निश्चयापासून मला परावृत्त करण्याचा यत्न करूं नका," इतके निर्वाणीचे शब्द ऐकल्यावर जरी त्यांनीं त्याच्या निश्चयाला अनुमोदन देणें शक्य नव्हतें तरी ते त्याचा निषेध करण्यालाही समर्थ झाले नाहींत यांत नवल नाहीं. सीतेनें तपोवनांत जाण्याची इच्छा दर्शविली होतीच. गरोदर स्त्रीचे डोहाळे पुरविणें ही चाल आपल्यांत फार पुरातन आहे. संतति निर्माण करणें हा मोठा पवित्र अधिकार आहे व जी संतान धारण करते ती भावी माता म्हणून तिच्या इच्छा पुरविणें, तिचें कौतुक करणें हा चांगल्या समाजाचा नित्य गुण होत असतो. सीतेचा हा तपोवनांत जाण्याचा दोहद या प्रसंगीं रामाच्या फार पथ्यावर पडला. त्यानें लक्ष्मणाला सांगितलें कीं तुझ्या भावजयीच्या मनांत तपोवनें पाहण्याचें आहे, तेव्हां तिला घेऊन जा आणि तिकडेच सोड व तूं परत ये. मातेचा वध करण्याची क्रूर आज्ञा परशुरामानें जशी पाळली, तशीच रामाची ही आज्ञा लक्ष्मणानें पाळली;

कारण "आज्ञा गुरूणां ह्यविचारणीया;" वडिलांच्या आज्ञेची विचारणा लहानांनीं करावयाची नसते. "वृद्धास्ते न विचारणीयचरिताः" असें भवभूति म्हणतो. पण या दोन्ही वाक्यांत कवींचा रोख स्पष्ट आहे. आज्ञा अत्यंत अन्यायाची होती हें कवीनें सूचित केलें आहे. लक्ष्मण बिचारा हुकुमाचा ताबेदार! त्याला ती अमलांत आणल्यावांचून गत्यंतर नव्हतें.

लक्ष्मणानें सीतेला रथांत बसवून शरयूच्या तीरावर आणिलें; आणि तेथें नौकेंत बसवून परतीरावर नेलें आणि तेथें त्यानें तिला उतरविलें. आपल्यावर काय भयंकर अरिष्ट कोसळणार आहे याची त्या निष्पाप पतिव्रतेला कल्पनाही नव्हती. फक्त तिचा उजवा डोळा लवत होता, त्यामुळें ती थोडीशी भ्याली. उजवा डोळा लवला कीं आमच्या स्त्रिया शतकानुशतकें भीत आल्या आहेत. पण एवढा पराक्रमी पति असतांना उजवा डोळा लवला म्हणून काय बिघडणार आहे असेंही सीतेला वाटलें. तिला बिचारीला कशी कल्पना येणार कीं तो पतीच आपल्यावर उलटला आहे! नेत्रस्फुरणासारख्या बारीक सारीक सामाजिक समजुतींचा फायदा घेऊन कालिदास पुढें काय होणार हें दर्शवितो. असो. सीतेचें स्नुषा या नात्यानें वर्णन वर आलेंच आहे. आतां शरयूच्या परतीरावर उतरलेल्या व जिच्यावर मोठें संकट कोसळणार आहे अशा सीतेचें घरांतील वडील भावजय या नात्यानें वर्णन कालिदासानें केलेलें आहे. रामाची आज्ञा तिला कशी सांगावी हें लक्ष्मणाला मोठें संकट पडलें होतें. जिला रावणाच्या बंदींतून परत आणण्यासाठीं एवढें घनघोर युद्ध केलें, त्या मांगल्यमूर्ति जानकीला कोणत्या तोंडानें राजा रामचंद्राचा हुकूम सांगावा याचें त्याला साहजिक मोठें कोडें पडलें. त्याचा ऊर भरून आला आणि शब्दाची योग्य ठेवण जुळविणेंही त्याला फार अवघड वाटलें. लक्ष्मणाचा ऊर तर भरून आलाच; पण माणसांच्या अंतःकरणांतील गूढ स्थलांचें आविष्करण करणारा आमचा महाकविसुद्धां या प्रसंगाचें वर्णन करतांना सद्गदित झालेला दिसतो. लक्ष्मणानें काय सांगितलें हेंसुद्धां कवि सांगत नाहीं. ते कठोर शब्द प्रकट करण्याला त्याची वाणी तयार नव्हती. उत्पातकाळचा मेघ दगडांची वृष्टि करतो तिच्यासारखे ते राजाचे शब्द होते एवढेंच म्हणून त्याची वाणी खुंटली. कारण त्या पवित्र आणि थोर पतिव्रतेविषयीं रामानें उच्चारलेला अपशब्द लिहिण्याचें काम करण्यास त्याची लेखणी समर्थ झाली नाहीं. ती विलक्षण राजाज्ञा ऐकून सीता धाडकन् बेशुद्ध पडली आणि लक्ष्मणानें सावध

केल्यावर तर तिची स्थिति मोठी कष्टावह झाली. पण ती पतिव्रता दुःखाच्या त्या पहिल्या धडाक्यांतमुद्धां पतीबद्दल एकही अपशब्द बोलली नाहीं तर तिनें पुनः पुनः स्वतःलाच अभार्गी म्हणून दोष दिला.

**न चावदद्भर्तुरवर्णमार्या**
**निराकरिष्णोर्वृजिनादृतेऽपि**
**आत्मानमेव स्थिरदुःखभाजं**
**पुनःपुनर्दुष्कृतिनं निनिंद ॥ रघु० १४–२७**

हें चित्र अत्यंत हृदयस्पर्शी तसेंच अत्यंत नयनमनोहर आहे. तिची ती दुःखानें बेहोष झालेली स्थिति पाहून लक्ष्मण घाबरला, भ्याला, कळवळला. वाल्मीकीच्या आश्रमाचा रस्ता सांगून त्यानें सीतेचें सांत्वन करण्याचा प्रयत्न केला. "असली भयंकर राजाज्ञा अमलांत आणण्याचें करंटेपण माझ्या कपाळीं आलें आहे. देवि, तूं मला क्षमा कर !" असें म्हणून त्यानें भावजयीच्या पायांवर डोकें ठेवलें. त्याबरोबर सीता भानावर आली. लक्ष्मणानें केलें तें राजाचा नोकर या नात्यानें आपलें कर्तव्य केलें, हा विचार त्या विषादाच्या प्रसंगींसुद्धां ती सुज्ञ सीता विसरली नाहीं. दिराला वाईट वाटेल असें बोलणें योग्य नव्हे हें समजण्याइतकी ती थोर होती. ती सामान्य नव्हती. आपला धाकटा दीर म्हणजे मुलासारखा हें जाणून तिनें त्याला "बाळा, चिरंजीव हो" म्हणून आशीर्वाद दिला; आणि "तुझ्यावर माझा राग नाहीं; तूं राजाची आज्ञा पाळलीस त्यांत तुझा दोष नाहीं" असे तिनें त्याला आश्वासन दिलें. तिचा रामानें केलेला त्याग लक्ष्मणाला मान्य नव्हताच. त्या प्रसंगीं कारुण्यानें त्याचें अंतःकरण उंचबळून गेलें होतें. आणि ही महापतिव्रता जर कोपली तर तिच्या क्रोधाच्या एका ठिणगींत त्रैलोक्याची राखरांगोळी होईल हें लक्षांत येऊन तो भयभीतही झाला होता. पण संयमवती सीतेचे ते शब्द ऐकून तो विरघळून गेला व त्याच्या डोळ्यांतून घळघळां अश्रू वाहूं लागले. सीतेची वृत्ति अगदीं स्थिर होती. तिनें शांतपणें त्याचा निरोप घेतला आणि जातांना आपल्या पतीला—नव्हे, अयोध्येच्या राजाला—सांगण्यासाठीं तिनें निरोप लक्ष्मणाजवळ दिला. तिचा पति—पण तो शब्द आतां अर्थशून्य झाला होता आणि पतीला निरोप सांगण्यासारखी तिची मनःस्थितिहि नव्हती.

या निरोपाचें वर्णन करतांना कालिदासाच्या अलौकिक कवित्वाला देखील नवीन सौंदर्य चढलें आहे. प्रथम तिनें आपल्या तिन्ही सास्वांना यथानुक्रम नमस्कार सांगितला आणि त्यांच्याकडे काय पतीविषयीं तक्रार करण्यास सांगितलें ? छे ! छे ! तिचा आणि रामाचा संबंध हा तिच्यांत आणि रामांत होता. त्याची तक्रार तिसरीकडे नेण्याची कल्पनाहि तिनें मनांत आणणें शक्य नव्हतें. सास्वांना तिनें एवढीच विनंति केली कीं, "माझ्या उदरांत तुमच्या पुत्राचें तेज आहे त्याचें कल्याण चिंतीत असा !" या एका वाक्यांत पत्नी आणि माता यांचें अद्भुत चित्र कालिदासानें मोठ्या कुशलतेनें रेखाटलेलें आहे. मग तिनें राजाला सांगण्यासाठीं निरोप दिला. राजाला–होय, राजाला, रामाला नव्हे ! कारण जेव्हां कठोर रामचंद्रानें पतिपत्नीसंबंध झुगारून जानकीचा त्याग केला तेव्हांच पति म्हणून रामाचा अवतार उरला नाहीं. व्यवहारज्ञ रामचंद्रानें प्रणयनिबंधन तोडून टाकलें. राजकारणाच्या आवेशांत अत्यंत प्रिय आणि निष्पाप पत्नीचा त्याग केला ! प्रियकर म्हणून रामचंद्राचा अवतार उरला नाहीं. आतां तो राजा होता. राजेपणाच्या नादांत इतर सर्व नातीं तो विसरला होता आणि म्हणून जानकी लक्ष्मणाला सांगते—"वाच्यस्त्वया मद्वचनात्स राजा"–त्या राजाला हा माझा म्हणून निरोप सांग; तुझा म्हणून सांगूं नकोस—माझा आहे तेव्हां सांगतांना कचरूं नकोस—त्या राजाला सांग ! ही का सीतेची रामाबद्दल भाषा ! पण तिनें तरी काय करावें ? ती पतिव्रता होती, तेजस्विनी होती, मानिनी होती, आर्या होती ! ज्यानें राजेपणाला सारसर्वस्व मानून पतिपत्नीसंबंधाला कःपदार्थ लेखलें त्याला "तो राजा" म्हणावयाचें नाहीं तर काय म्हणावयाचें ? आणि सीतेनें एकच प्रश्न विचारला–ती शुद्ध होती, पवित्र होती, निष्कलंक होती, म्हणून तो प्रश्न विचारतांना ती कचरली नाहीं आणि अंतःकरणाच्या वल्लभापुढें तिला कचरण्याचें कारणहि नव्हतें—तिनें एकच प्रश्न विचारला—"आपल्या समक्ष मी अग्निदिव्य केलें; आतां लोकांचा प्रवाद ऐकून आपण माझा त्याग केलात. प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिलेली गोष्ट विसरून लोकांनीं उठविलेल्या कंड्यांना मान दिलात. ही गोष्ट आपल्या विद्येला आणि कुलाला शोभण्यासारखी आहे का ?" (रघु. १४–६१). आमची आर्य स्त्री पतीसाठीं सर्वस्व वेंचील पण पतीलासुद्धां आपल्या चारित्र्यावर शिंतोडा उडवूं देणार नाहीं. पति हा तिचा देव होय; पण तिचें चारित्र्य हें त्या देवाचें अधिष्ठान आहे आणि चारित्र्यावर ठपका ठेवण्याचा अपराध ती सहन करणार नाहीं.

हें कालिदासानें काढलेलें जानकीचें चित्र तेजस्वी आर्यस्त्रीचें चित्र आहे. हें चित्र आर्यांना वंद्य झालें पाहिजे. त्या चित्राशीं विसंवादी अशीं चित्रें दुसऱ्या कोणी रेखाटलीं असतील तर तीं आर्यस्त्रियांचीं नव्हेत. अशीं विसंवादी चित्रें रेखाटणाऱ्याला आर्यस्त्रीच्या वास्तविक स्वरूपाचा बोधच झाला नव्हता हें स्पष्ट आहे. सीतेचा हा संदेश येथें संपूर्ण देण्याला व त्याचें विवेचन करण्याला स्थळ नाहीं. संदेशाच्या शेवटीं ती म्हणतेः--"आतां तूं माझा त्याग केल्यावर मी प्राणत्यागही केला असता; पण तुझी संतति नष्ट व्हावी अशी माझी इच्छा नाहीं. म्हणून तिचें रक्षण मला केलें पाहिजे. प्रसूति झाल्यानंतर मी कठोर तपश्चर्या करणार आणि तूंच मला जन्मोजन्मीं पति मिळावास, मात्र असा वियोगाचा प्रसंग न यावा, हा वर मी मागणार." (रघु० १४-६५,६८.) रामचंद्राबद्दलचें प्रेम आणि त्यानें केलेल्या भयंकर अपमानाबद्दल दुःख या भावनांचें मिश्रण कवीनें या ठिकाणीं उत्कृष्ट चित्रित केलें आहे. "मी तापसी आहें, तेव्हां वर्णाश्रमपालनाची जबाबदारी घेतलेल्या त्या राजानें माझें रक्षण केलेंच पाहिजे" हेंही तिनें जातां जातां लक्ष्मणाला सांगितलें. लक्ष्मण तिचा तो निरोप घेऊन जड अंतःकरणानें निघून गेला. तो दृष्टीआड झाल्यावर एवढा वेळ दाबून ठेवलेला तिचा शोक धडाक्यानें उसळून बाहेर पडला. दिरासमोर तिनें आपलें दैन्य दाखविलें नाहीं, पण वनांत जेव्हां ती एकटीच राहिली तेव्हां तिनें मुक्तकंठानें रडण्यास सुरवात केली आणि त्या निष्पाप जानकीच्या त्या शोकानें सर्व अरण्यच शोकमय झालें.

नृत्यं मयूराः कुसुमानि वृक्षा
दर्भानुपात्तान्विजहुर्हरिण्यः।
तस्याः प्रपन्ने समदुःखभावम्
अत्यंतमासीद्रुदितं वनेपि ॥ (रघु० १४-६९)

मोरांनीं नृत्य बंद केलें; झाडावरचीं फुलें गळून पडलीं; तोंडांत घालण्यासाठीं उचललेलें गवत हरिणांनीं टाकून दिलें. अशा प्रकारें सर्व वनांत तिच्याशीं समदुःखभाव होऊन सर्वत्र शोकमय झालें. तिच्या शोकाचा ध्वनि ऐकून त्याच्या अनुरोधानें परम कारुणिक असे वाल्मीकिमुनि तेथें आले.

तामभ्यगच्छद्रुदितानुसारी
कविः कुशेध्माहरणाय यातः।

विषादविश्लांडजदर्शनोत्थः
श्लोकत्वमापद्यत यस्य शोकः ( रघु० १४-७० )

पक्ष्यांच्या जोडप्यावर निषादानें बाण मारलेला पाहून वाल्मीकीच्या शोकाला श्लोकाचें स्वरूप आलें! कालिदासासारख्या महाकवीनें महाकवींना स्फूर्ति देणाऱ्या वाल्मीकीवर उधळलेलें हें काव्यपुष्प नितांत रमणीय आहे यांत शंका नाहीं. वाल्मीकि म्हणजे याप्रमाणें दयेची मूर्ति. तेव्हां सीतेवर आलेला दारुण प्रसंग पाहून त्याचें हृदय कळवळलें यांत काय नवल? त्या श्रेष्ठ मुनीला पाहातांच सीतेनें डोळे पुसले व वस्त्र नीट सावरून घेऊन त्यांना नमस्कार केला. वाल्मीकीसारख्या श्रेष्ठासमोर अस्ताव्यस्त वर्तन करणें बरें नव्हे हें त्या प्रसंगींही ती विसरली नाहीं. तिनें नमस्कार करतांच "पुत्रवती हो" हा गोड आशीर्वाद मुनींनीं दिला आणि तिला आश्वासन देतांना रामचंद्राच्या पत्नीत्यागाबद्दलचें सर्व सज्जनांचें मत त्यांनीं स्पष्ट शब्दांत सांगितलें. वाल्मीकीच्या तोंडीं घातलेला हा विचार म्हणजे या विषयासंबंधीं कालिदासाचा निःसंदेह निर्णय होय हें उघड आहे. वाल्मीकि सीतेला म्हणतातः—"जरी त्रैलोक्याला त्रास देणाऱ्या दत्यांचा त्यानें काटा उपटून काढला आहे, जरी तो सत्यप्रतिज्ञ आहे आणि स्वतःची स्तुति न करणारा आहे तरीसुद्धां तुझ्या बाबतींत जें हें गैरवर्तन त्यानें एकाएकीं केलें आहे त्यामुळें भरताच्या वडील भावावर (म्हणजे रामावर) माझा राग झालेला आहे. (रघु० १४–७४) पण कांहीं काळजी करूं नकोस. थोर कीर्ति असलेला तुझा सासरा माझा मित्र होता. तुझा पिता सज्जनांच्या भवभयाचा नाश करणारा असा थोर ज्ञानी आहे. आणि तूं तर पतिव्रतांत अग्रेसर आहेस. तेव्हां तुझ्याबद्दल मला अनुकंपा उत्पन्न व्हावी हें अगदीं साहजिक आहे." (रघु० १४–७५). वाल्मीकि रामावर एवढा रागावला होता कीं त्यानें त्याचें नांव न घेतां "भरताचा वडील भाऊ" म्हणून त्याचा निर्देश केला.

सीता रामचंद्राची पत्नी, जनकाची कन्या, दशरथाची स्नुषा होती. पण ती स्वयंप्रकाश होती. पतिव्रतांच्या अग्रभागीं तिचें स्थान होतें म्हणून आदिकवि वाल्मीकीनें तिचें स्वागत केलें आणि तिला आपल्या आश्रमांत नेलें व हें आपलें घर समजून रहा म्हणून तिला सांगितलें व तिला सर्व प्रकारें अभय दिलें. त्या ठिकाणीं सर्व आश्रमवासी मंडळींनीं सीतेला फार ममतेनें वागविलें. रामचंद्रानें अश्वमेध

यज्ञ केला ( हा सहकुटुंब करावा लागतो; ) तेव्हां दुसरें लग्न न करतां तो सीतेची सुवर्णप्रतिकृति जवळ घेऊन पुण्याहवाचनास बसला हें वर्तमान ऐकून पतीचें आपल्यावरील प्रेम स्थिर आहे असें सीतेला पटलें व तिला त्यांतल्या त्यांत समाधान वाटलें. पण आतां तिला संसाराची आशा उरली नव्हती. फक्त प्रसूति होऊन मुलें मार्गाला लागण्याची वाट ती पहात होती. माता या नात्यानें आपलें कर्तव्य करण्याच्या तिच्या निश्चयाला पतीच्या वागण्यामुळें बाध येणें अर्थात्च शक्य नव्हतें. पुढें सीता यथाकाळ प्रसूत होऊन तिला दोन जुळे मुलगे झाले. त्यांचे सर्व संस्कार वाल्मीकीनें करून त्यांना विद्या शिकविल्या व सीता आपला काळ तपश्चरणांत घालवूं लागली. रामचंद्राला तिची आठवण होई व तिला त्याची आठवण होई; पण तो जसा व्यवहारानें बांधला होता तशी तीहि स्वाभिमानानें बांधलेली होती. वाल्मीकीनें त्या दोन्ही मुलांना ज्ञान आणि अस्त्रविद्या यांत पारंगत केलें आणि आपला रामायण हा काव्यग्रंथ त्यांना गावयास शिकविला. इकडे रामचंद्र विरक्त चित्तानें राज्य करीत होता. कांहीं दिवसांनीं सीतेचे मुलगे रामचरित्राचें गायन करीत असतां तें अयोध्येच्या कित्येक नागरिकांनी ऐकिलें. तेव्हां रामचंद्रानें कुतूहलानें त्यांना राजसभेंत बोलावून त्यांचें गायन ऐकलें. त्यांचा वेष तपस्व्यांचा होता आणि वय लहान होतें तरी ते अगदीं हुबेहूब रामचंद्रासारखे दिसत होते. त्यामुळें नागरिकांना मोठा चमत्कार वाटला. त्यांनीं गायिलेली रामकथा ऐकून राजसभेंतील लोकांच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. रामचंद्रानें त्यांना विचारलें, "बाळांनो, तुम्हांला काव्य म्हणावयास शिकविणारा कोण व हें काव्य कोणी रचिलें ?" तेव्हां दोन्ही प्रश्नांना त्यांनीं एकच उत्तर "वाल्मीकि" असें दिलें. त्यानंतर रामचंद्र बंधूसहित वाल्मीकींना भेटला व त्यांना त्यानें साष्टांग प्रणिपात केला; व त्या मुलांबद्दल विचारलें. वाल्मीकि म्हणाले :–"हीं दोन्ही मुलें सीतेला तुझ्यापासून झालीं आहेत. त्यांचें लालन पालन मी केलें आहे. तूं आतां या बालकांसह सीतेचा स्वीकार कर." रामचंद्र म्हणाला :–"मुनिराज, आपली सून आमच्या समक्ष अग्निदिव्य करून आली. पण त्यावर प्रजेचा विश्वास बसत नाहीं. त्यांनाही मैथिलीनें आपल्या उज्वल पातिव्रत्याचा प्रत्यय आणून द्यावा; म्हणजे आनंदानें मी त्या पुत्रवतीचा स्वीकार करतों." तेव्हां वाल्मीकीनें शिष्याकडून जानकीला राजसभेंत आणविली. ती काषाय वस्त्र नेसली होती. तिची नजर आपल्या पावलांकडे होती; तिच्या तापसी शरीरावरूनच ती पवित्र आहे

अशी सर्वांची खात्री पटली. तिच्या तेजानें लोकांचे डोळे दिपून गेले. आणि अशा थोर स्त्रीबद्दल आपण काय भलती शंका घेतली असें वाटूनच कीं काय सर्वांनीं माना खालीं घातल्या—सर्वांनीं माना लवविल्या. वाल्मीकि सीतेला म्हणाले :–" बाळे, आतां पतीच्या देखत स्वतःच्या चारित्र्याबद्दल सर्वांचा संशय नाहींसा कर." तेव्हां वाल्मीकिशिष्यांनीं आणिलेल्या जलाचें आचमन करून ती सीता केवळ सत्य अशी वाणी बोलली. ती म्हणाली :–" वाणी, मन आणि कृति यांपैकीं कोणत्याही मार्गानें पतीसंबंधीं मजकडून कधींही व्यभिचार घडला नसेल तर हे विश्वंभरे भूमाते, मला आपल्या पोटांत थारा दे!" तिची ती हांक ऐकून प्रत्यक्ष भूमाता मूर्तिमंत उदित झाली. ( सगळ्या विश्वानें सीतेचें पावित्र्य मान्य केलें. ) नागफणाच्या सिंहासनावर ती बसली होती. समुद्ररूपी कमरपट्टा तिनें घातला होता. तिनें सीतेला आपल्या मांडीवर घेतलें. व्यवहाराच्या पायीं बद्ध झालेल्या पतीनें टाकलेली, ती पवित्र, निर्मळ, मंगलमयी जानकी, कुटिल जनांच्या कृत्यांनीं दूषित झालेल्या संसाराला कंटाळली होती. तिला भूमातेनें लेंकराला घ्यावें त्याप्रमाणें मांडीवर घेतली. तेव्हां मात्र सभा चकित झाली. रामचंद्राचेंसुद्धां व्यवहारबंधन तुटलें व "जानकि, जाऊं नको, जाऊं नको" म्हणून त्यानें टाहो फोडला. पण आतां काय उपयोग? ती तेजस्विनी स्त्री, ती पतिव्रतांची शिराणी, ती वीरकन्या, वीरपत्नी, वीरमाता आपल्या जन्मदात्रीच्या मांडीवर बसून अंतर्धान पावली आणि अशा प्रकारें सीता-चरित्र संपलें. राजदरबारांत पतीशीं झगडणारी तपस्विनी शकुंतला, वेषधारी शंकराला शंकराचें माहात्म्य सांगणारी तपस्विनी पार्वती, उत्तरवयांत पतीच्या निरर्थक रोषाला पात्र झालेली तपस्विनी जानकी हीं कालिदासाचीं चित्रें एकदां पुरीं कळल्यावर अंतःकरणांतून हालण्यासारखीं नाहींत.

# भाग पांचवा

## कर्ते पुरुष

**व्यतिकरितदिगंताः श्वेतमानैर्यशोभिः**
**सुकृतविलसितानां स्थानमूर्जस्वलानाम्।**
**अकलितमहिमानः केतनं मंगलानां**
**कथमपि भुवनेऽस्मिंस्तादृशाः संभवन्ति ॥**

१. आधुनिक शिष्टसांप्रदायाला अनुसरून मुलें व स्त्रिया यांचा प्रथम विचार केला. आतां कालिदासानें जीं निरनिराळ्या पुरुषांचीं चित्रें काढलीं आहेत, तिकडे दृष्टि वळूं. तसें करतांना प्रारंभ भगवान् शंकरापासून व्हावा हें इष्ट आहे किंबहुना उचित आहे. शंकर-पार्वती म्हणजे कालिदासाचें आदि दैवत. काव्याच्या आरंभीं त्यांचें स्मरण तो करतो—विशेषतः श्रीशंकराचें स्मरण तो करतोच. रघुवंशांत "पार्वतीपरमेश्वरौ" या जगताच्या मायबापांना वंदन करून वागर्थानें रसरसलेल्या महाकाव्याची सुरवात होते. वास्तविक पार्वतीचें दर्शन घेतांना आपणांस शंकराचेंहि दर्शन झालेंच आहे. तथापि मदुरेंत ज्याप्रमाणें मीनाक्षीचें माहात्म्य त्याप्रमाणें पार्वतीचरित्रांत पार्वतीचेंच माहात्म्य. शंकराच्या दर्शनाचा धनत्तर लाभ पाहिजे असेल तर रामेश्वरास किंवा वाराणशीसच गेलें पाहिजे. त्याप्रमाणें येथेंही कालिदासानें काढलेलें शंकराचें गंभीर व प्रभावी चित्र स्वतंत्रपणानेंच पाहिलें पाहिजे. अर्थात् शंकराचें चरित्रही कुमारसंभवांतच मिळणार हें उघड आहे. चौथ्या प्रकरणांत आपण वधूपक्षाचे होतों. आतां वरपक्षाचे होऊन शंकराचें चरित्र व चारित्र्य पाहूं या. "न संति याथार्थ्यविदः पिनाकिनः" हें खरें, पण महाकवीच्या साहाय्यानें त्यासंबंधीं प्रयत्न करावा हें योग्य होईल.

कुमारसंभवांत शंकराचें जें रूप प्रथम दृष्टीस पडतें तें महान् योग्याचें; तपस्व्याचें; संयमशील व्रतस्थाचें आहे. त्या रूपांत मदनाचें दहन शंकरानें केलें. विकाराचा नुसता प्रादुर्भाव झाला न झाला अशी शंका येतांच विकाराचें मूळ असा जो काम त्याची शंकरानें राखरांगोळी करून टाकली; मात्र शंकर जेव्हां विवाह

करील तेव्हां मदन पुनश्च जगतीतलावर नांदूं लागेल असें आश्वासनही मदनपत्नीस म्हणजे रतीला– त्यानंतर मिळालें. यापुढें पार्वतीच्या प्रेमाची परीक्षा पाहणारा व शेवटीं त्या प्रेमानें पूर्ण वश झालेला शंकर आपण गेल्या भागांत पाहिला. यानंतर जाणून बुजून विवाहाच्या कार्यात पडणारा शंकर आपल्याला आतां पहावयाचा आहे. कुमारसंभवांत सहाव्या सर्गांत विवाहाच्या खटपटीचें वर्णन व सातव्या सर्गांत शंकरपार्वतीच्या विवाहाचें वर्णन आहे. तें करतांना कालिदासाचा सूक्ष्म व हृदयंगम विनोद पदोपदीं दृष्टोत्पत्तीस येतो. आठव्या सर्गांत शृंगार रसाच्या महासागरांत वाचकानें निखालस बुडून जावें अशी व्यवस्था आहे. शंकरपार्वतीच्या शृंगाराचें हें वर्णन पुष्कळ ठिकाणीं उत्तान आहे यांत शंका नाहीं व कित्येक टीकाकार त्यामुळें कालिदासावर नाराज झालेलेही आढळतात. तपस्वी शंकर आणि शृंगाररसैकमय शंकर या दोन चित्रांची तुलना खरोखर मनोवेधक होईल व संपूर्ण काव्य वाचतांना ही दोन्हीरूपें समसमान डोळ्यांपुढें ठेविलीं पाहिजेत. आतां आठव्या सर्गापासून मल्लीनाथाची टीका उपलब्ध नाहीं यामुळें व दुसऱ्या अशाच कित्येक कारणांमुळें येथून पुढचें काव्य कालिदासाचेंच आहे का दुसऱ्या कोणाचें आहे हाही वाद पुष्कळ दिवस चाललेला आहे; त्याचा उल्लेख आम्ही पहिल्या भागांत केलेला आहे. कदाचित् आठव्या सर्गातील शृंगारानें छातींत धडकी भरलेले कित्येक टीकाकार या सर्गापासून पुढचें काव्य कालिदासाचें नव्हे असें म्हणण्यास उद्युक्त झाले असतील. पण आठव्या सर्गातील उत्तान शृंगारवर्णन कालिदास करणार नाहीं असें मात्र त्याचे इतर ग्रंथ वाचून कोणासही म्हणतां येणार नाही. इतर कांहीं प्रमाणें मिळून हा सर्ग कालिदासकृत आहे किंवा नाहीं याचा काय निर्णय लागेल तो लागो, पण यांत शृंगाररसाचा अतिरेक आहे किंवा कित्येकांच्या मतें अलीकडच्या भाषेंत बोलावयाचें झाल्यास यांत "अश्लीलता" आहे म्हणून हा सर्ग कालिदासाचा नव्हे असें मात्र म्हणतां येणार नाहीं. या सर्गांत वर्णन केलेलें शंकराचें शृंगाररसैकमय रूप त्याच्या पूर्व रूपाला अनुरूप नाहीं असेंही म्हणण्याचें धारिष्ट करणें हें धारिष्टाचेंच होईल. संयमाच्या अग्नीनें तावून सुलाखून निघालेला पुरुष किंवा स्त्री हीं ज्यावेळीं संसारांत पडण्याचें ठरवून शृंगारसन्मुख होतात त्या वेळीं त्यांचा शृंगार "अशक्त" माणसांच्या शृंगाराहून निराळ्या स्वरूपाचा होईल असें मानण्यास हरकत नाहीं. "ओकासा"चें सेवन करून कृत्रिम तरतरी प्राप्त करून घेणारा पुरुष व "कॉड लिव्हर ऑईल"च्या जोरावर पुष्टतेचें अवसान आणणारी

स्त्री यांचा शृंगार, आणि जात्या सुदृढ, संयमशील, सशक्त, उत्तम रक्त ज्यांच्या अंगांत जोरानें सळसळत आहे व सर्व प्रकारच्या आनंदाचा उत्कृष्ट उपभोग घेण्याचें सामर्थ्य ज्यांना आहे अशा व्यक्ति यांचा शृंगार यांत जमीनअस्मानाचें अंतर असणार; आणि प्रचंड नैसर्गिक शक्तींचा संयोग झालेला पाहून व त्यामुळें वातावरणांत उत्पन्न होणारा विलक्षण क्षोभ अवलोकन करून ज्याप्रमाणें अशक्त माणसें गडबडतात, घाबरतात त्याचप्रमाणें शिवपार्वतीसारख्या अपूर्व जोडप्यांचा शृंगार वर्णिलेला वाचून कित्येकांची धांदल उडून रति या स्थायी भावाच्या उत्कर्षाऐवजीं "अश्लीलते" चा वास त्यांना येईल यांत नवल नाहीं. पण कोणताहि महाकवि या स्थायी भावाचा उत्कर्ष आपल्या काव्यांत चित्रित करण्याला डगमगला नाहीं व तो वाचतांना कोणत्याही स्थिर वृत्तीच्या सुज्ञ वाचकानें डगमगण्याचें कारण नाहीं.

शंकराचीं कुमारसंभवांत दिसणारीं तीन पृथक् स्वरूपें, योगीश्वर शंकर, विवाह-समुत्सुक शंकर, आणि रतिविलासी शंकर हीं तौलनिक दृष्टीनें खरोखर मोठीं आश्चर्यकारक वाटतात. कुमारसंभवाच्या तिसऱ्या सर्गांत "त्रियंबकं संयमिनं ददर्श" येथून पुढील सहा श्लोकांत तपस्वी शंकराचें केलेलें वर्णन खरोखर मोठें हृदयंगम आहे. त्यांतील शेवटचा श्लोक पहाः—

**मनो नवद्वारनिषिद्धवृत्ति**
**हृदि व्यवस्थाप्य समाधिवश्यम् ।**
**यमक्षरं क्षेत्रविदोविदुस्त—**
**मात्मानमात्मन्यवलोकयंतम् ॥ ३–५० ॥**

अशा प्रकारचें भगवान् शंकराचें हें पहिलें स्वरूप; या स्वरूपाला जिंकण्यासाठीं पार्वतीला अलौकिक तपश्चर्या करावी लागली; म्हणजे तपःसामर्थ्यात तिनें शंकराची बरोबरी केली तेव्हांच त्या दोघांत वास्तविक "अनुरूपता" उत्पन्न होऊन परस्परांचें प्रेम दृढ झालें व चिरस्थायी झालें. यानंतर शंकराच्या दुसऱ्या रूपाचें वर्णन पांचव्या सर्गाच्या शेवटच्या श्लोकांत व सहाव्या सर्गांत पहावयास मिळतें. "मी तुझा दास आहें" असें शंकरानें पार्वतीस सांगितलें. त्या काळीं दासदासी विकत घेण्याचा परिपाठ होता. "आपल्या तपश्चर्येनें तूं मला विकत घेतलेंस" असेंही त्याच वेळीं शंकरानें पार्वतीस सांगून टाकलें. अरुंधतीला घेऊन आलेले सप्तर्षी पाहून विवाह करणें उत्तम हें शंकराला पटलें. कारण

**क्रियाणां खलु धर्म्याणां सत्पत्न्यो मूलकारणम् ।**

(धर्माला मान्य अशा कार्यांची सिद्धि होण्याला पतिव्रता स्त्रियाच कारणीभूत आहेत.) त्यांच्याशिवाय धर्माचरण उत्तमपणें होणार नाहीं हें शंकराला पटलें. अर्थात् शंकर विवाह करण्याला उभा राहिला त्यांत कांहीं केवळ स्वार्थ नव्हता. पुत्र उत्पन्न करण्याची देवांनीं विनंति केली म्हणून शंकर या यातायातींत पडला; पण पडला तो मात्र पूर्ण विचारानें, निश्चयानें पडला. शंकरासारखा संयमी लग्नाला तयार झालेला पाहून "आपण लग्नकार्य केलें यांत चुकलें नाहीं" असें सप्तर्षींना वाटलें. यापुढें सातव्या सर्गांत विवाहविधीचें वर्णन मोठें सुंदर आणि पुष्कळ ठिकाणीं विनोदगर्भ आहे. त्यांत शंकराचें माहात्म्य व स्वभाव हीं दिसून येतात. आणि शेवटीं शृंगार रसांत तल्लीन झालेल्या शंकराचें वर्णन आठव्या सर्गांत आहे. या तल्लीनतेमुळें आपली मुलगी व जांवई यांचें उत्कृष्ट जमलें, आतां कसलीही काळजी करण्याचें कारण नाहीं, असें पार्वतीच्या आईला वाटलें हेंही कवीनें जातां जातां सांगून टाकलें आहे.

२. संसारांत पडण्याचें ठरविल्यानंतर योगीराज शंकरानें सप्तर्षींना मध्यस्थ योजून वधूला मागणी घालण्याचा प्रकार यथाविधि पार पाडला; प्रत्यक्ष पार्वतीनें सुचविलें होतें कीं कन्यादानाचा अधिकार आपल्या पित्याचा आहे: त्याला मान द्यावा; तसें त्यानें केलें. शंकराच्या वागण्याशीं तुलना केली म्हणजे दुष्यंताच्या वागण्याचा निराळा प्रकार पूर्णपणें ध्यानांत येतो. दुष्यंताचें पुढें जें वर्तन झालें त्याला दुर्वासाच्या शापामुळें झालेला स्मृतिनाश हें कारण कालिदासानें दिलें आहे; तें ग्राह्य मानलें पाहिजे. पण नाटकाच्या पहिल्या अंकांत शकुंतलेची गांठ पडल्यापासून तें तिसऱ्या अंकांत त्यांचा शारीरिक संबंध ध्वनित होईपर्यंत दुष्यंताचें वागणें उल्लूपणाचें आहे असें म्हटलें पाहिजे. कण्वाला दाद लागूं न देतां, तो आश्रमांत नाहीं असें पाहून, शकुंतलेच्या कौमार्यावर त्यानें गोड गोड थापा मारून जो घाला घातला त्याचें समर्थन "गांधर्व विवाह" या कानाला गोड लागणाऱ्या शब्दानें होणें शक्य नाहीं. दुष्यंताचें चित्र काढतांना त्याच्यासारख्या व्यवहारांत मुरलेल्या राजबिंड्याचें यथार्थ स्वभावलेखन करण्याचा कवीचा विचार होता हें स्पष्ट दिसतें. बलिष्ठ पुरुषांनीं स्त्रियांवर हात टाकला किंवा गोड थापा मारून त्यांना वश केलें तर त्यांच्यावर टीका करण्याची मुभा जर आजच्या जगांतही बहुधा नाहीं तर जुन्या

जगांत ती नव्हतीच नव्हती. तेव्हां त्यांच्या या वर्तनपद्धतीला "गांधर्व-विवाहा." सारखीं गोंडस नांवें मिळालीं. पण त्यामुळें त्यांचें जसेंच्या तसें चित्र काढून त्यांच्या स्वभावाचें आविष्करण करण्याचा मार्ग सत्कवींना खुंटला होता असें थोडेंच आहे. दुष्यंताचें चित्र हें शंकरासारख्या अलौकिक पुरुषाच्या चित्राहून भिन्न असावें यांत नवल नाहीं. नाट्यशास्त्राच्या व्याख्येला अनुसरून धीरोदात्त नायक काढला तरी तो सामान्य माणसांतलाच एक असणार. शंकरासारखा महा-पुरुष हा निराळा आणि त्याचें "धीरोदात्त"त्व हेंही निराळ्या प्रतीचें. तसलें धीरोदात्तत्व नाटकांतील नायकाकडे असलेंच पाहिजे असा आग्रह धरला तर बहुतेक नाटकें "नापाम" होतील हें सांगावयास नकोच. नाटक हें बहुधा संसाराचें चित्र आहे आणि म्हणून त्यांत सांसारिक स्त्रीपुरुषांचीं चित्रें येणार. त्यांत दुष्यंताची नीतिपटुता आणि शकुंतलेचें स्खलनसौलभ्य हीं दिसून येणार. शंकर पार्वतीचे स्वभाव निराळे व त्यांच्या थोरवीची जातच निराळी.

आतां दुष्यंताची आपण जरा अधिक ओळख करून घेऊं. येथें दुष्यंताचा विचार पुरुष व्यक्ति म्हणून करावयाचा आहे. चांगल्या राजांचें जें सामान्य वर्णन दुसऱ्या भागांत आलें आहे त्यांत सांगितलेलीं बाह्य वर्तनाचीं लक्षणें त्याच्यांत होतीं. येथें त्याहून आंत खोल शिरावयाचें आहे. पहिल्या अंकाच्या सुरवातीला तपोवनाची नासधूस होऊं नये म्हणून सैन्य मागें ठेवून आश्रमांत प्रवेश करणें, व पांचव्या अंकांत मोठ्या अदबीनें बोलण्याच्या ऐवजीं पुरोहितानेंच राजाचें धर्माचा पालनकर्ता असें कण्वानें शकुंतलेबरोबर पाठविलेल्या ऋषिकुमारांच्यापुढें वर्णन करणें या दोन गोष्टी लक्षांत ठेविल्या म्हणजे स्वतःच्या राजधानींत व तिच्या बाहेर विशेषतः दुसऱ्या मोठ्या माणसाच्या निवासस्थानांत "राजे" लोक निर-निराळ्या प्रकारें कसे वागतात हें लक्षांत येतें; व पहिल्या अंकाच्या उत्तरार्धापासून तिसऱ्या अंकापर्यंत आणि मग पुढें पांचव्या अंकांत राजाचें जें वागणें आपल्या दृष्टीला पडतें त्यावरून सुरवातीची नम्रता हा दुष्यंताच्या खानदानीचा एक दिखाऊ भाग होता असें म्हणावें लागतें. राजाच्या दृष्टीस शकुंतला पडल्याबरोबर प्रथम तिच्या स्वरूपाची तारीफ, तिला वनांत काम करावें लागतें याबद्दल कण्वा-वर थोडासा राग पण लौकरच तिच्या अधराकडे आणि लोभनीय यौवनाकडे सकाम दृष्टिप्रक्षेप असा क्रम आहे आणि शकुंतला क्षत्रपरिग्रहक्षम म्हणजे क्षत्रियानें विवाह करण्यास योग्य असलीच पाहिजे असें त्यानें ठरविलें. त्याला पुरावा काय

तर तिच्याबद्दल आपल्या अंतःकरणांत अभिलाष उत्पन्न झाला आणि आपल्या-सारख्या "सज्जनाच्या" अंतःकरणांत भलताच अभिलाष कसा उत्पन्न होईल हा प्रश्न त्यानें स्वतःला विचारला व त्याचें उत्तर स्वतःच देऊन टाकिलें. अंतःकरणप्रवृत्तीला प्रमाण धरणाऱ्या सज्जनानें शकुंतलेच्या पित्याला न कळत तिला वश करून तिचें शरीरही आत्मसात् केलें, ही कथानकाच्या सुरवातीची हकीकत दुष्यंत हा अलौकिक नसून हजार माणसांसारखा एक माणूस होता असें दाखविते. राजे लोकांचें जें ध्येयात्मक वर्णन कालिदासानें केलेलें आहे व ज्याचा उल्लेख मागें दुसऱ्या भागांत आलेला आहे तेवढेंच करून कवीनें आपलीं सर्व वर्णनें बरोबर त्याच धर्तीचीं केलीं असतीं तर त्याची सृष्टि केवळ यांत्रिक झाली असती. कवीची सृष्टि यांत्रिक आणि तांत्रिक असून चालत नाहीं. तिला तंत्र असलें आणि ती स्वतंत्र असली तरीसुद्धां तिच्यांत वास्तवता ही पाहिजेच. ध्येयात्मकता व वास्तवता यांचा उत्कृष्ट संधि ही तर महाकवित्वाची खूण आहे. दुष्यंतासारखा एकंदरीत चांगला राजासुद्धां प्रसंगीं वासनांच्या अधीन पडून कसा वागतो हें वास्तवचित्र अर्थात् नाट्यतंत्राच्या आश्रयानें कालिदासानें या कथेंत काढलेलें आहे.

पांचव्या अंकांत दिसणारें दुष्यंताचें चित्र याप्रमाणें सामान्य पण मोठ्या समजल्या जाणाऱ्या माणसाचें आहे; आणि तो सामान्यपणें मोठा नाहीं असेंही म्हणण्याचें कारण नाहीं. पण तो शंकरासारखा अलौकिक मोठा मात्र नाहीं. जगन्नाथ पंडितानें ज्याचें वर्णन

**विश्वाभिरामगुणगौरवगुंफितानां**
**रोषोपि निर्मलधियां रमणीय एव ।**

[ सर्व विश्वांत सुंदर असे गुण ज्याच्या ठिकाणीं नांदतात आणि ज्याची बुद्धि निर्मळ आहे अशांच्या क्रोधांत देखील मोठी मौज आहे. ]

असें केलें आहे, त्या कोटींत दुष्यंत येत नाहीं; त्या कोटींत शंकर येतो. म्हणून कुमारसंभवांतील शंकराचा मदनावरचा क्रोध पाहून आपणांस कौतुक वाटतें; पण पांचव्या अंकांतील दुष्यंताचा क्रोध पाहून त्याचा तिरस्कार येतो, त्याचा आपणांस क्रोध येतो. सहाव्या अंकांत तर दुष्यंताची सामान्यता अधिकच सिद्ध होते. या अंकाच्या सुरवातीला शकुंतला ही खरोखर आपली पत्नी असल्याचें त्याला समजतें; त्याची स्मृति पुनः जागृत होते आणि आपण

मोठा अन्याय केला हें पटून त्याला वाईट वाटतें; तो उदासीन होतो; त्याला सुंदर गोष्टींबद्दलही गोडी वाटत नाहीं; लोकांकडून रोज सेवा घ्यावी ही राजेपणाची हौसही त्याला रहात नाहीं; आणि रात्रभर झोंप न लागल्यामुळें या कुशीचें त्या कुशीवर होण्यांत त्याची रात्र निघून जाते. जेव्हां अंत:पुरांत जातो तेव्हां तो मनापासून बोलत नाहीं; केवळ सभ्याचाराची संवय पडल्यामुळें आवश्यक तेवढें बोलतो; फार तर काय नांवेंसुद्धां त्याच्या लक्षांत रहात नाहींत; त्यामुळें किती तरी वेळ भलतेंच नांव घेतल्यामुळें मग त्याला लाजेनें मान खालीं घालण्याचा प्रसंग येतो. (अ. शा. ६–५). आणि शकुंतलेची वरचेवर आठवण होऊन तो व्याकुळ होतो. तिला घालवून दिल्याचा तो सर्व प्रसंग त्याच्या डोळ्यांपुढें प्रत्यक्ष दिसावा तसा उभा राहतो. "मी येथें तिचा धि:क्कार केला तेव्हां आपल्या माणसांबरोबर जाण्यासाठीं ती निघूं लागली, परंतु प्रत्यक्ष गुरुप्रमाणें ज्याचा धाक अशा त्या गुरुशिष्यानें 'येऊं नको' असें दरडावून सांगितल्यावर बिचारी तेथेंच थांबली आणि पुन: रडत रडत तिनें मी जो क्रूर त्याच्याकडे पाहिलें, तें आतां सर्व विष लावलेल्या शल्याप्रमाणें मला जाळून काढीत आहे" असें तो मोठ्या दीन वाणीनें आपला मित्र विदूषक त्याला सांगतो. नंतर तो शकुंतलेचें चित्र पहातो व पुन: त्याच्या शोकाला भरती येते. त्या चित्राकडे पहातां पहातां त्याला त्या अत्यंत मधुर अशा वैषयिक क्षणांची आठवण होऊन तो विव्हल होतो. त्या चित्रांत तो इतका तल्लीन होतो की त्याला आपल्या प्रत्यक्ष परिस्थितीचा विसर पडतो; आणि मग हें चित्र आहे असें कळल्यावर तो पुन: दु:खित होतो. हें सगळें वर्णन विप्रलंभ शृंगाराचा परिपोष करतें व करुणरसाकडे वाचकांचें मन वेधतें. पण पुढें हळूहळू तो जेव्हां म्हणतो कीं "आतां मला मुलगा कोठून मिळणार ? जिच्या पोटीं मुलगा होणार हें निश्चित होतें तिला तर घालविली. आतां माझ्या पूर्वजांना श्राद्धविधि करून तिलांजलि कोण देणार ? आतां माझ्या वंशाचा विस्तार कसा होणार ?" तेव्हां वाचकाची समाधि उतरते व पत्नीसाठीं चाललेल्या या शोकाच्या मुळाशीं व्यावहारिक कारणें आहेत हें त्याच्या लक्षांत येतें. अशा व्यवहारी माणसाच्या शोकाचें वर्णन करतांना अजविलाप (रघु० ८) आणि मेघदूत लिहिणारा कालिदास उत्तररामचरिताच्या तिसऱ्या अंकांतील काव्यमय वातावरण उत्पन्न करीत नाहीं हा त्याचा दोष नसून

हा त्याच्या वर्णनांतील वास्तवतेचा गुण आहे हें येथें लक्षांत येतें. पत्नीप्रेमाचा फारसा मागमूस या सहाव्या अंकांत लागत नाहीं. पहिल्या तीन अंकांत दुष्यंताची अनिवार कामेच्छा दृष्टीस पडते तर सहाव्या अंकांत अन्याय केल्याबद्दल दुःख आणि पुत्रप्राप्तीला आंचवलों म्हणून शोक या व्यवहारांत जमणाऱ्या भावना स्पष्ट होतात. पण अंतःकरणाला हालवून सोडणारें अपरंपार प्रेम ज्याच्यापुढें व्यवहाराचें स्मरणही होत नाहीं त्याचा मात्र अनुभव येत नाहीं. सहाव्या अंकांत राजा विह्वल होतो, पण त्याचें कारण केवळ प्रणय हें नव्हे असें स्पष्टपणें म्हटल्यावांचून गत्यंतर नाहीं. त्याची विह्वलता घालविण्यासाठीं कवीनें या अंकाच्या शेवटीं मोठी खुबीची योजना केली आहे. इंद्राकडून त्याला इंद्रशत्रूंबरोबर लढण्यासाठीं आमंत्रण येतें व अशा प्रकारें त्याला आपली वृत्ति बदलणें भाग पडतें आणि इंद्राकडून परत भूलोकावर येतांना ज्या तपोवनांत शकुंतला राहते तेथेंच त्याला इंद्राचा सारथी मातलि आणून सोडतो आणि क्रमाक्रमानें त्याला प्रथम आपल्या गोड अपत्याची व पत्नीची गांठ पडते आणि शकुंतलेचें प्रेम जरी आतां सर्व सुकून गेलें होतें तरी आपल्या बालकाचा पिता म्हणून ती दुष्यंतानें केलेल्या सर्व गोष्टी विसरून त्याचा स्वीकार करते आणि दुष्यंताच्या प्रेमाचें स्वरूप जरी केव्हांही केवळ निर्मळ आणि केवळ उदात्त नव्हतें तरी आपल्या बालकाची माता अशा त्या मातृमूर्ति शकुंतलेच्या पायावर तो डोकें ठेवतो.

शकुंतलेची क्षमा याचतांना राजाच्या तोंडीं कवीनें काव्यमय अशीं भाषणें घातलेलीं आहेत व शकुंतलाही आपल्या नेहमींच्या स्वभावानुरूप ( जो स्वभाव पांचव्या अंकाच्या खडतर परिस्थितींतच किंचित् काल स्वसंरक्षणार्थ कठोर झालेला दिसतो ) त्याच्यांत झालेल्या पालटाबद्दल अभिनंदन करते, कमलाही उणा अधिक शब्द त्याला बोलत नाहीं. शकुंतलेचें स्वभावरेखन या ठिकाणीं कवीनें अगदीं हळुवार-पणानें केलेलें आहे. जरी तिच्या प्रेमाचा अवमान होऊन तिचा संसार त्या दृष्टीनें पूर्वींच संपला होता तरी आतां मातृपदावर आरूढ झाल्यामुळें आणि मुलाची व त्या पित्याची भेट होऊन मुलाच्या भविष्यत्कालाविषयीं ती निर्धास्त झाल्यामुळें तिच्या निर्मल अंतःकरणांत क्रोधाचा लवलेशही उरला नव्हता. राजाला मात्र आपण विचित्र प्रकारें कां वागलों हें स्पष्टपणें सांगून पत्नीच्या मनांत कसलाही किंतु राहूं नये असें वाटावें हें स्वाभाविक आणि उचित होतें. शकुंतला दृष्टीस पडल्याबरोबर राजाच्या मुखांतून निघालेले उद्गार आदरानें व पश्चात्तापानें भरलेले आहेत. "अरे,

ही अत्रभवती शकुंतला," यांतील अत्रभवती शब्दानें प्रतीत केलेली पूज्यबुद्धि मराठींत एका शब्दानें आणतां येण्यासारखी नाहीं; निदान पत्नीच्या बाबतींत अत्रभवतीला मराठींत बरोबर दुसरा शब्द नाहीं. इंग्रजींत या शब्दाचें भाषांतर Her Ladyship असें करून मूळच्या "अत्रभवती"चें स्वारस्य येत नाहीं. आणि Her Ladyship चें मराठींत भाषांतर "या शकुंतलाबाईसाहेब" असें करून मूळचा अर्थ कोणीकडच्या कोणीकडे नाहींसा होतो. Her Ladyship किंवा "बाईसाहेब" हे शब्द शकुंतलेचा समाजांतील दर्जा दाखवितात. परंतु येथें तिच्याबद्दल पूज्य भावनेनें व आदरानें दुष्यंताचें अतःकरण भरून गेलें होतें त्याचें निदर्शन "अत्रभवती" या शब्दानें जसें संस्कृतांत झालें आहे तसें वर दिलेल्या पर्यायांनीं अनुक्रमें इंग्रजींत व मराठींत होत नाहीं हें उघड आहे. असो. कित्येक वर्षांनीं दुष्यंताला दिसलेली शकुंतला सुरवातीला दिसली तशी शृंगारमूर्ति नव्हती, अंतःकरणांत कामाग्नि पेटविणारी, रतिसर्वस्व अशा अधराची अत्यंत चुंबनलालसा चेतविणारी, अशी यौवनारंभानें मुसमुसलेली बालिका नव्हती तर तपोमूर्ति माता होती, संसारांतील संकटानें पोळलेली व्रतस्थ अशी धर्मपत्नी होती. यौवनसुलभ अशा कामनांना आणि भावनांना जिंकून, इंद्रियदमन करून, तपश्चर्येच्या ऐश्वर्यानें अंतःकरणांत आदर आणि पूज्यभाव यांची प्रेरणा करणारी देवता होती.

> **वसने परिधूसरे वसाना**
> **नियमक्षाममुखी धृतैकवेणिः ।**
> **अतिनिष्करुणस्य शुद्धशीला**
> **मम दीर्घं विरहव्रतं बिभर्ति ॥** ७–२१

भडक नाहींत आणि म्हणून मलिन दिसणारी अशीं फक्त दोनच वस्त्रें जिनें परिधान केलेलीं आहेत, केशपाशांचा कसलाही शृंगार न करतां फक्त एकच वेणी जिनें धारण केलेली आहे, आणि नेमधर्माप्रमाणें कडकडीत वागल्यामुळें जिचें मुख सुकून गेलेलं आहे; मी अत्यंत निर्दयतेनें वागलों असतांना सुद्धां जिच्या शुद्ध शीलाला यत्किंचित्‌ही धक्का लागलेला नाहीं, आणि इतकीं वर्षें जी माझ्या वियोगाचें व्रत पाळीत आहे ती ही "अत्रभवती" शकुंतला असे राजा दुष्यंताचे उद्गार त्या प्रसंगीं प्रशंसापर नव्हेत तर यथार्थवर्णनपर वाटतात.

आपल्या स्मृतीवर आलेलें मोहाचें पटल दूर झालें आहे असें राजा तिला सांगतो आणि आपण जो तुझा प्रत्यादेश केला, तुला जी स्वीकार न करतां घालवून दिली, तें सर्व अंतःकरणांतून काढून टाक म्हणून तिला विनंति करतो. ज्यांचीं अंतःकरणें केवळ काळोखानें भरून गेलीं आहेत त्यांना उत्तम गोष्टी देखील दुष्ट वाटूं लागतात, मस्तकावर सुगंधि आणि सुकुमार फुलांची माळ कोणी ठेविली तरी तिला साप मानून ती टाकून देतात, आणि माझें वर्तन तुझ्या बाबतींत तसेंच अगदीं मूर्खपणाचें झालें हें तो प्रांजलपणानें कबूल करतो व मग तिच्या पायांवर डोकें ठेवतो. या पूर्ण नमस्कारानें राजाच्या पापाची निष्कृति होते ही गोष्ट तर खरीच पण त्यामुळें शकुंतलेबद्दल त्याला वाटणारी पूज्य बुद्धीही विशेष व्यक्त होते यांत शंका नाहीं. पुढें हें पुष्कळ दिवसांनीं एकत्र झालेलें दांपत्य आपल्या पुत्रासहित मारीच ऋषीला जाऊन भेटतें व त्याचा आशीर्वाद मिळवितें; आणि तो महर्षि—जरी संसारापासून अलिप्त होता—तरी तिला सांगतो, "आतां तुझ्या पतीच्या मनांत सांचलेला अंधार दूर झाला आहे. आतां त्याच्यावर तुझीच सर्वस्वीं सत्ता आहे." याप्रमाणें शकुंतलेच्या "सत्तेचा दास" झालेल्या दुष्यंताचा आपण येथें निरोप घेऊं.

३. समाजांत पतिपत्नीचें नातें विशेष महत्त्वाचें आहे, कारण त्यांतूनच इतर सर्व नातीं उत्पन्न होतात. त्यापैकीं पत्नीचीं वर्णनें आपण मागील भागांत वाचलीं. त्या त्या स्त्रियांच्या अनुषंगानें त्यांच्या पतींचीं वर्णनेंहि आपण ऐकिलीं. चालू भागांत पार्वतीचा पति शंकर आणि शकुंतलेचा पति दुष्यंत यांचीं रेखाटलेलीं चित्रें आपण पाहिलीं. सीतेचा पति रामचंद्र याचें चित्र पृथक्पणानें आपण पाहूं आणि तें पाहिल्यानंतर इतर कांहीं पतींचीं चित्रें आपणांस पहावयास मिळतात तिकडेहि लक्ष देऊं. रामचंद्राच्या पूर्ववयांतील वर्णनाचा बराचसा उल्लेख वर तिसऱ्या भागांत आलेला आहे. त्यानंतर (रघुवंशाच्या) बाराव्या, तेराव्या, चौदाव्या व पंधराव्या सर्गांत त्याचें वर्णन आहे. त्यांतील बारावा सर्ग खेरीजकरून बहुतेक भाग सीतेसंबंधीं लिहितांना येऊन गेलेला आहे. विवाहानंतर ते रावण-वधापर्यंत सर्व हकीकत संक्षेपानें बाराव्या सर्गांत अंतर्भूत झालेली आहे. दशरथ राजा वृद्ध झाला आणि त्यानें रामचंद्राला यौवराज्याभिषेक करण्याचें ठरविलें. पण रामाला अभिषेक होण्यास राजाच्या मुख्य तीन स्त्रियांपैकीं कैकेयीनें विरोध केला. तिला राजानें दोन वर दिले होते. एका वराप्रमाणें रामचंद्रानें चौदा वर्षें वनवासास

जावयाचें होतें आणि दुसऱ्या वरामुळें तिचा मुलगा भरत यास यौवराज्याभिषेक व्हावयाचा होता. दशरथाचें रामावर एवढें प्रेम होतें कीं रामाचें वनवासानिमित्त प्रयाण झाल्यावर तो जगेल हें निश्चित नव्हतें; किंबहुना त्याला मृत्यु येईल हेंच निश्चित होतें. म्हणूनच भरताला प्राप्त होणारी लक्ष्मी ही वैधव्यैकफला म्हणजे कैकयीला खात्रीनें वैधव्य येणार असा निश्चित परिणाम उत्पन्न करणारी होती असें.कवीनें वर्णन केलें आहे व राजाजवळ भलताच हट्ट धरून तिनें आपणांवर वैधव्य ओढवून घेतलें असें सूचित केलें आहे. रामानें वनाला जाण्याबद्दल पित्यानें केलेली आज्ञा आनंदानें ऐकिली; कारण तिचा स्वीकार करून पित्यानें दिलेल्या वचनांतून त्याला ( पित्याला ) मुक्त करण्याची संधि त्याला मिळाली. म्हणजे रामाचा जो सत्यवचनीपणा होता त्यांत पित्यानें दिलेलीं वचनेंही पाळण्याचा त्याचा निश्चय अंतर्भूत झाला होता. कुटुंबांत काय किंवा राष्ट्रांत काय, व्यवहारांत काय आणि व्यापारधंद्यांत काय, मागीलांच्या वचनांची पूर्ति पुढीलांनीं करणें हा समाजांत स्थैर्य नांदविण्याचा मार्ग पुरातन कालापासून चालत आलेला आहे.

वनवासास निघतांनाहि रामाची वृत्ति उल्हसित होती असें त्याचें वर्णन केलेलें आहे. प्रत्येक कर्तव्य आनंदानें करावयाचें, "सुखदुःखे समे कृत्वा" करावयाचें, हा तर कर्मयोगाचा प्रमुख दंडक आहे. राम वनास जावयास निघाला त्यावेळीं त्यानें ( आणि त्याबरोबर जावयास निघालेल्या त्याच्या पत्नीनें आणि बंधु लक्ष्मणानें ) वल्कलें धारण केली व पहिल्या श्रीमंतींत उपयोगांत आणण्याच्या वस्त्रांचा त्याग केला. त्याचें वर्णन करतांना कवि सांगतोः—

**दधतो मंगलक्षौमे वसानस्य च वल्कले ।**
**ददृशुर्विस्मितास्तस्य मुखरागं समं जनाः ॥** ( रघु० १२–८ )

राम उत्तम कपडे घालीत होता तेव्हां त्याची जी चर्या होती ती वल्कलें नेसल्यावरही कायम होती. त्या चर्येवरची प्रसन्नता बिलकुल ढळली नाहीं हें पाहतांना लोकांना मोठा विस्मय वाटला. कसलीहि स्थिति आली तरी जे थोर आहेत त्यांच्या वृत्तींत फरक पडत नाहीं हें खरें, पण असे थोर खरोखर विरल आणि त्यांचें दर्शन हें केव्हांहि विस्मय उत्पन्न करणारें असतें. तेव्हां कर्तव्यतत्परता हा रामचंद्राचा विशेष गुण होता हें या वर्णनावरून सिद्ध होतें. रामचंद्राच्या वियोगदुःखानें व भलतेच वर आपण कसे दिले या पूर्वकर्माच्या पश्चात्तापानें राजा

दशरथ मृत्यु पावला; कवि म्हणतो कीं त्यानें या पूर्वकर्माची निष्कृति करण्यासाठीं देहत्यागाचें प्रायश्चित्त घेतलें, म्हणजे देहांत प्रायश्चित्त घेतलें. पुढें भरत जेव्हां मातुलगृहाहून परत आला तेव्हां पित्याला कसें मरण आलें याची सर्व हकीकत त्यानें ऐकली. तेव्हां त्यानें आपली माता कैकयी व राज्यलक्ष्मी या दोघींबद्दलहि पराङ्मुखता प्रकट केली म्हणजे दोघींकडून आपलें तोंड फिरविलें; म्हणजे आईची करणी त्याला आवडली नाहीं व राज्यप्राप्तीचें त्याला बिलकूल सुख वाटलें नाहीं. त्यानें वनांत राम होता तेथें जाऊन त्याची गांठ घेतली व त्याला राज्यस्वीकाराबद्दल विनंति केली. पण पित्याची आज्ञा पालण्याचा आपला निश्चय रामचंद्रानें सांगितला व चौदा वर्षांचा वनवास पुरा झाल्याशिवाय आपण राज्यस्वीकार करणार नाहीं असें त्याला स्पष्ट कळविलें. तेव्हां रामाच्या पादुका नेऊन त्यांच्या नांवें चौदा वर्षें राज्य चालविणार, आपण स्वतः राज्याचा उपभोग घेणार नाहीं, हा आपला निश्चय पण भरतानें रामाला कळविला; म्हणजे आपलें कर्तव्य निर्लोभपणानें पार पाडावयाचें हें व्रत दोघांहि भावांचें होतें व दोघांबद्दलहि आपणाला मोठें कौतुक वाटतें. राज्यतृष्णेचा त्याग करून आईनें केलेल्या पातकाचें प्रायश्चित्त भरतानें घेतलें असें वर्णन या ठिकाणीं कवीनें केलेलें आहे. तृष्णेचा, लोभाचा, उपभोगेच्छेचा त्याग हें संसारांतून मुक्त होण्यासाठीं, सर्व कर्मांच्या फलनाशासाठीं उत्कृष्ट प्रायश्चित्त आहे हें या ठिकाणीं कवीनें ध्वनित केलें आहे. हें प्रायश्चित्त घेतल्यामुळें भरताची निष्पापता तर सिद्ध झालीच, पण त्याच्या आईचाही दोष त्यानें धुवून काढिला. आईबापांच्या संपत्तीवर जसा मुलांचा हक्क तसा त्यांच्या दोषांचा परिहार करण्याचीहि जबाबदारी मुलांवर आहे. कुटुंबसंस्थेंत आईबाप व मुलेंबाळें ही न तुटणारी सांखळी आहे व ती परस्परसंबंधीं कर्तव्यांनीं बांधलेली आहे आणि त्या कर्तव्यांपासून ढळणें म्हणजे मोठा सामाजिक अपराध आहे, हें तत्त्व येथें कवीनें स्पष्ट केलें आहे:—

राम सीतेसह आणि लक्ष्मणाला बरोबर घेऊन वनवासास गेला. वनवास हें एक प्रकारचें व्रत होतें व त्याचें प्रतिपालन व्रतस्थपणानेंच होणें योग्य होतें. राम हा वनवासास बाहेर पडला होता; नवोढा पत्नीला घेऊन संसाराचीं प्रारंभसुखें उपभोगण्यासाठीं बाहेर पडला नव्हता. हा अर्थ स्पष्ट करण्याचें कार्य कवीनें एक साभिप्राय विशेषण देऊन केलें आहे :—

**रामोपि सह वैदेह्या वने वन्येन वर्तयन्**
**चचार सानुजः शांतो वृद्धेक्ष्वाकुव्रतं युवा॥ (रघु० १२-२०)**

राम हा युवा म्हणजे तरुण होता. वैदेहीला घेऊन रानावनांत तो हिंडला, पण बरोबर धाकटा भाऊ लक्ष्मण होता. वन्य फलमूलादिकांवर त्यानें आपली गुजराण केली म्हणजे खाण्यापिण्याची चैन तो तेथें करीत नव्हता. तर त्या ठिकाणीं तो युवा असूनसुद्धां व नवोढा पत्नी बरोबर असूनसुद्धां इक्ष्वाकु कुलांतले राजे वार्धक्यांत जसे वागतात (म्हणजे वानप्रस्थाश्रम घेतात) तसें वागण्याचें व्रत त्यानें घेतलें होतें. आणि हा सर्व अर्थ थोडक्यांत पण पूर्णपणें प्रकट करण्यासाठीं तो शांत होता, शमयुक्त होता, शमदमादिगुणयुक्त होता असें वर्णन केलें आहे. याचा अर्थ त्याचें पत्नीवर प्रेम नव्हतें असा नव्हे; प्रेम उत्कट होतें पण चौदा वर्षांचा काळ व्रताचा, नियमाचा असल्यामुळें, रामाचें वर्तन व्रतस्थपणाला योग्य असें होतें. वर दिलेल्या श्लोकापुढेंच जे दोन श्लोक आले आहेत त्यांत शृंगाराची अस्पष्ट सूचना दिसते, पण उपरोक्त श्लोकांतील स्पष्ट अर्थामुळें तेथें शृंगार रसाची सिद्धि करण्याचा कवीचा हेतु नाहीं, हें उघड आहे. पुढें शूर्पणखेची गांठ पडल्याचा वृत्तांत आला आहे. ती रामावर मोहित होते; तिला राम जें सांगतो तें थोडेंसें चमत्कारिक आहेः—

**कलत्रवानहं बाले कनीयांसंभजस्व मे।**

मी सपत्नीक आहें तेव्हां माझ्या धाकट्या बंधूचा आश्रय कर. आतां या ठिकाणीं शंका येते, ती अशी कीं राम कलत्रवान् होता तर लक्ष्मणहि कलत्रवान् होता; कारण त्याचेंहि लग्न झालें होतें. मग "कनीयांसं भजस्व" याचा अर्थ काय? त्या वेळीं रामाजवळ पत्नी होती, लक्ष्मणाची तेथें नव्हती तेव्हां त्या विशिष्ट काळीं व स्थळीं संकुचित अर्थानें लक्ष्मण रामासारखा कलत्रवान् नव्हता; या अर्थाहून दुसरा अर्थ येथें निष्पन्न होणें शक्य दिसत नाहीं. कांहीं दुसरा अर्थ असेल तर तो पुढीलप्रमाणें संभवतो. शूर्पणखा राक्षसी होती म्हणजे कुरूप होती. तेव्हां तिची व आपल्या धाकट्या भावाची चेष्टा करण्याची संधि रामानें साधली. तरुण व बरोबरीच्या माणसांत अशी चेष्टा सुलभ असली तरी ती रामासारख्यानें करावी काय असाहि कोणी प्रश्न करतील; आणि स्त्रियांची चेष्टा मग ती स्त्री राक्षसी असो किंवा मानुषी असो, करावी काय असाहि प्रश्न उपस्थित

होईल. आतां प्रथम दिलेल्या श्लोकांत रामाचें "युवा" म्हणून वर्णन केलें आहे व "वृद्धेक्ष्वाकुव्रत" घेणारा तो होता असें सांगितलें आहे. तरी पण तो युवा होता आणि गंमत करण्याची संधि होती ती त्यानें साधली हें मनुष्यस्वभावाला अनुरूप आहे असें म्हणतां येईल. आणि ती राक्षसी म्हणजे मायाविनी, च्युत वृत्तीची, संस्कृतिशून्य होती हें त्यानें ओळखलें म्हणून त्यानें तिची चेष्टा केली असें म्हणतां येईल. लक्ष्मणाला ही चेष्टा सोसली नाहीं व त्यानें तिला झिडकारली. तेव्हां ती परत रामावर आपल्या मोहिनीचा प्रयोग करूं लागली. ( मायावीपणानें तिनें त्या प्रसंगासाठीं सुंदर रूप धारण केलें होतें.) तेव्हां आपला पति किंवा दीर हे परस्त्रीला भाळणारे नाहींत हा विचार मनांत येऊन आणि त्या बाईची झालेली फजीती पाहून सीता हंसली. कांहीं प्रसंग असे असतात कीं त्या वेळीं हंसें आवरतच नाहीं. तोच प्रकार सीतेचा त्या वेळीं झाला असावा. तिच्या हंसण्यामुळें आपल्या प्रेमयाचनेला कोणी भीक घालीत नाहीं म्हणून अगोदरच चिरडीला आलेल्या शूर्पणखेचा क्रोध वाढला. तिचे मधुर शब्द थांबले व तिनें सीतेला धमकी देण्यास सुरवात केली. "तूं मला आतां हंसतेस, पण याचें फळ तुला लौकरच भोगावें लागेल" असें म्हणून तिनें आपलें मायावी सुंदर रूप टाकलें व ती खरोखर राक्षसी दिसूं लागली. बिचारी सीता भयानें अगदीं गांगरून गेली व रामचंद्राला बिलगली. लक्ष्मणानें पाहिलें कीं प्रथम कोकिळेसारखी बोलणारी आणि आतां घोर भाषण करणारी ही विकृता आहे म्हणजे मायाविनी आहे म्हणजे संस्कृतीच्या बाहेरची आहे; तिला आपल्या रीतिरिवाजाप्रमाणें वागविण्याची बिलकुल आवश्यकता नाहीं. तेव्हां हिची गय करण्यांत अर्थ नाहीं. म्हणून हातांत नागवी तरवार घेऊन राम बसला होता तेथें पर्णशाळेंत तो आला आणि तिचे कान नाक कापून अगोदरच विद्रुप असलेलें तिचें रूप त्यानें दुप्पट विद्रुप केलें.

शूर्पणखेनें जाऊन आपल्या राक्षसबंधूंना ही हकीकत कळविली व ती दशमुख रावणापर्यंत जाऊन पोहोंचण्यास वेळ लागला नाहीं. प्रथम खरदूषणादि तिच्या बंधूंनीं रामावर हल्ला केला व त्यांचा पराभव रामचंद्रानें केला. तेव्हां ही सर्व हकीकत राक्षसांचा राजा जो रावण त्यापर्यंत पोंचविण्यास शूर्पणखाच काय ती उरली. आपली भगिनी जी शूर्पणखा तिची फजिती केली आणि आपले आप्त राक्षस यांना मारले म्हणजे रामानें आपल्या दाही डोक्यांवर पाय दिला असें रावणास वाटलें आणि डोक्यांवर रामाचा पाय पडला असें समजून

रावण ( सर्पाच्या शेपटीवर पाय पडला म्हणजे तो जसा खवळतो तसा ) खवळला. अशा प्रकारें रामाला मोठा शत्रु निर्माण झाला. ज्याच्या आंगीं कर्तृत्व आहे त्याला शत्रु उत्पन्न झाल्याशिवाय रहात नाहीं. अजातशत्रुत्व हें साधुत्वाचें लक्षण नसून ( सर्व थोर साधूंना शत्रु उत्पन्न होतात ) मेषपात्रपणाचें, दुर्बळपणाचें, अजागळपणाचें लक्षण आहे असें म्हटलें तर अतिशयोक्ति होणार नाहीं किंवा व्यवहारांतील अनुभवाला बाध येणार नाहीं. रावणानें मारीच राक्षसाला मृगाचें रूप घ्यावयास लावून व रामलक्ष्मणाला भुरळ पाडून त्या मृगाची मृगया करण्यास भाग पाडलें आणि ते दूर असतांना त्यानें असहाय सीतेचें हरण केलें. सीताहरणाची गोष्ट इतकी सुप्रसिद्ध आहे कीं तिची माहिती फक्त एका श्लोकांत कवि देतो आणि निरर्थक किंवा विनाकारण शब्दावडंबर लिहावयाचें नाहीं असा आपला निश्चय असल्याचें स्पष्ट करतो. रामलक्ष्मण मग सीताशोधार्थ निघाले. वाटेंत जटायु पक्षी रावणाशीं युद्ध करून पडलेला आढळला. त्याची उत्तरक्रिया यथासांग करून ते पुढें चालले. वालीचा वध करून रामानें सुग्रीवाशीं मैत्री संपादन केली व सुग्रीवाचा सेवक हनुमान् हा नामांकित मित्र मिळविला. मारुतीची योजना सीतेचा शोध करण्यासाठीं झाली. त्यानें ती रावणाच्या लंकेंत आहे हा पत्ता काढला व तेथें जाऊन तिची गांठ घेतली. तेथें राक्षसींच्या पाहऱ्यांत बसलेली त्याला "जानकी विषवल्लीभिः परीतेव महौषधिः" ( रघु० १२-६१ ); म्हणजे विषवल्ली जिच्याभोंवतीं भरलेल्या आहेत अशा उत्कृष्ट औषधी म्हणजे वनस्पतीप्रमाणें ती दिसली." ही उपमा वाचून " उपमा कालिदासस्य " असें कां म्हणतात त्याचें रहस्य कळतें. मारुतीनें तिला रामचंद्राची आंगठी दाखविली, त्याचा आश्वासनाचा निरोप सांगितला, व नंतर लंकादहन करून सीतेकडून रामाला देण्यासाठीं खूण घेऊन तो परत आला आणि पुढें क्रमाक्रमानें रामानें घनघोर युद्ध करून रावणाचा वध केला. सीतेच्या वियोगानें विव्हळ झालेल्या रामचंद्राचें वर्णन कालिदासानें फारसें केलेलें नाहीं. वाल्मीकीनें केलेल्या वर्णनावर कडी करणें ही गोष्ट अशक्यप्राय असल्यामुळें कदाचित् हा कवि त्यांत पडला नसेल. तथापि बाराव्या सर्गांत रामरावणयुद्धाचें वर्णन त्यानें विस्तृतपणें करून वीररसाचा परिपोष केला आहे आणि आपल्या वाचकांपुढें " प्रणयी राम " फारसा न ठेवतां " वीर राम "च त्यानें प्रकट केला आहे व रामचंद्राचें तें स्वरूप अकराव्या सर्गापासून तों पंधराव्या सर्गापर्यंत एकसूत्रीपणाचें आहे हें खरें आहे. कालिदासानें रामचंद्राच्या " प्रणयीपणा "कडे हें

जें दुर्लक्ष केलें त्यामुळें काव्यविषयाला अत्यंत अनुरूप असा एक वर्णनप्रसंग राहून गेला. त्याची भरपाई पुढें कित्येक शतकांनीं महाकवि भवभूति यानें " उत्तररामचरित " या आपल्या करुणरसानें थबथबलेल्या लोकोत्तर नाट्यकृतींत केली हें रसिकांना श्रुत आहेच. रामाचा बाण रावणाच्या हृदयाचा भेद करून भूमींत शिरला, त्यावर कवि उत्प्रेक्षा करून म्हणतो कीं रावणवधाची आनंदाची बातमी पाताळवासी लोकांना देण्यासाठीं तो जमिनींत शिरला. रामचंद्राचा पराक्रम पाहून त्याच्यावर देवांनीं पुष्पवृष्टि केली. रामाला बसण्यासाठीं इंद्रानें आपला रथ मातलि सारथीबरोबर पाठविला होता असें वर्णन कवीनें केलेलें आहे. असो. रामचंद्रानें याप्रमाणें आपल्या शत्रूंचा व देवांच्याही शत्रूंचा निःपात करून, अग्निदिव्य करून आपली शुद्धता निर्बाध असल्याबद्दल जिनें खातरी करून दिली होती अशा आपल्या प्रिय पत्नीला जवळ घेतलें; आपल्या वैऱ्याची राजलक्ष्मी त्याच्याच भावाला देऊन टाकिली ( आपण तिचा स्वीकार केला नाहीं ) आणि पुष्पक विमानांत बसून बंधु व पत्नीसहित तो अयोध्येला परत येण्यास निघाला. या प्रवासांत रामाचा आणि सीतेचा पतिपत्नीसंबंध कसा मनोरम होता त्याचें नाजुक हातानें कवीनें चित्र रेखाटलें आहे (तेरावा सर्ग), व पुष्कळ दिवसांनीं भेटलेल्या पत्नीवरच्या प्रेमाचें हें वर्णन वाचतां वाचतां राजेपणाचें कर्तव्य म्हणून रामाला कठोर कसें व्हावें लागलें याचें वर्णन चौदाव्या सर्गात आलेलें आहे.

४. पुष्पक विमानांत सीतालक्ष्मण व इतर मित्रमंडळी ( सुग्रीव, जांबुवंत, हनुमान् वगैरे ) यांना घेऊन राम अयोध्येकडे यावयास निघाला व येतांना त्यानें लंकेच्या समुद्रापासून तों अयोध्येपर्यंत वाटेंत लागणारीं स्थळें आपल्या पत्नीला दाखविलीं. या वर्णनांत शृंगाररसाची पार्श्वभूमि आहे. चौदा वर्षांनीं ज्या प्रियकरिणी प्रियपत्नीची भेट झालेली तिच्याबरोबर रामचंद्र विमान अयोध्येला पोहोंचेपर्यंत बोलत होता यांत कांहीं नवल नाहीं. या वर्णनांत रामाची रसिकताही व्यक्त होते. सृष्टिसौंदर्याची त्याला आवड आहे आणि त्याच्या ठिकाणीं वर्णनशक्तिही उत्तम आहे. समुद्राचें वर्णन आणि प्रयागच्या त्रिवेणीसंगमाचें वर्णन हीं अत्यंत हृदयंगम उतरलीं आहेत. बाराव्या सर्गात रामाच्या सीतावियोगशोकाचें बहुतेक वर्णन नाहींच असें वर म्हटलें आहे व एकंदरींत प्रणयी रामाचें चित्र काढण्याचा कवीचा हेतु नसून वीर राम व नृपति राम याचें चित्र त्याला काढावयाचें आहे असेंही तेथें म्हटलें आहे. पण चौदाव्या सर्गात वनवासांतील

कांहीं गोष्टींचें वर्णन (अर्थात् थोडक्यांत) आहे. तेव्हां पुनरुक्तिदोष होऊं नये म्हणून या वर्णनाला बाराव्या सर्गांत अजीबात फाटा दिलेला आहे असेंही म्हणण्यास हरकत नाहीं. या विमानमार्गानें केलेल्या प्रवासाचा पुढें उल्लेख होणार असल्यामुळें त्याविषयीं येथें अधिक लिहिण्याची आवश्यकता नाहीं. रामाचा शोक किती तीव्र झाला होता याचें या सर्गांत सांगितलेलें एकच उदाहरण आपण घेऊं. "नदीतटावरील अशोकलतेला पाहून ती सीताच आहे असें त्या वियोगदुःखाच्या भरांत मला वाटलें आणि म्हणून त्या लतेला मी आलिंगन द्यावयास उद्युक्त झालों तेव्हां लक्ष्मणानें डोळ्यांत पाणी आणून किंवा अश्रु ढाळीत माझा निषेध केला, व मला सांगितलें 'रामा, ही लता आहे. तिला कशासाठीं आलिंगन देतोस! ती सीता नाहीं!'" असें राम सीतेला सांगतो. येथें लक्ष्मण साश्रु झाला असें मोठें हृदयभेदक वर्णन कवीनें केलें आहे. आपला एवढा ज्ञानी व पराक्रमी भाऊ पण पत्नीच्या वियोगानें त्याला भ्रम झाला, त्याचें डोकें हलकें झालें असें वाटून लक्ष्मणाचे डोळे अश्रूंनीं भरून आले हें उघड आहे. विमान जसें अयोध्येच्या जवळ आलें तसें रामाचें अंतःकरण उचंबळून आलें. चौदा वर्षांनंतर आपल्या जन्मस्थानाला—मातृभूमीला—तो परत येत होता. शरयू नदीचें दुरून दर्शन होतांच राम म्हणतो:—"या शरयूला मी उत्तरकोसल देशाला पुष्ट करणारी म्हणून आम्हा सर्वांची धात्री—दाई—समजतों—नव्हे, ती माझी आईच आहे. ती आपल्या तरंगरूप हातांनीं मला जशी काय आलिंगन देऊं पहात आहे." शरयू नदीच्या कांठीं अयोध्या आहे. तेथें भरत सर्व नागरिकांसहित रामचंद्राची वाट पहात होता—भरताची कर्तव्यनिष्ठा आणि निष्कामता हीं कवीच्या कल्पनेच्या सृष्टींतसुद्धां अत्यंक आश्चर्यकारक वाटतात. भरताचे गुण राम ओळखतो आणि म्हणून रामाचें सौजन्यहि चांगलें प्रतीत होतें. आपल्या या थोर अंतःकरणाच्या भावंडाचें वर्णन रामचंद्र अत्यंत प्रेमळपणानें, कौतुकानें, अभिमानानें करतो. वल्कलें धारण केलेला भरत, वसिष्ठ गुरूला पुढें करून आणि पाठीमागें सैन्य उभें करून वृद्ध अमात्यासहित रामाचें स्वागत करण्याला हातांत अर्घ्य घेऊन उभा होता. वल्कलें धारण केल्यामुळें राज्याचा लोभ त्याला नव्हता हें उघड होतें. वशिष्ठाला पुढें करून तो मागें उभा होता यावरून त्याची नम्रता स्पष्ट होते. सैन्य मागें उभें केलें होतें यावरून स्वतःची मिरवणूक काढण्यासाठीं तो सैन्याचा उपयोग करीत नव्हता हें कळतें. आणि त्याच्याबरोबर वृद्ध अमात्य होते म्हणजे दशरथाच्या वेळेला जीं

विश्वासू माणसें राज्याच्या नोकरींत होतीं त्यांना त्यानें दूर केलें नव्हतें हें लक्षांत येतें. त्या बंधुरत्नाला पाहून रामानें आनंदानें व अभिमानानें पत्नीला त्याचें गौरव कथन करावें हें साहजिक नाहीं काय ? रामचंद्र म्हणतो ( आणि तो काय म्हणतो हें महाकवि कालिदास आपल्या अर्थपूर्ण शब्दांनीं, आपल्या रसवंतीनें सांगतो ):—

**पित्रा विसृष्टां मदपेक्षया यः**
**श्रियं युवाप्यंकगतामभोक्ता ।**
**इयन्ति वर्षाणि तया सहोग्र-**
**मभ्यस्यतीव व्रतमासिधारम् ॥ रघु० १३–६७**

ही राज्यलक्ष्मी पित्यानें भरताला दिलेली होती ( म्हणजे त्याला ती योग्य मार्गानें मिळालेली होती. ) तो वयानें तरुण ( जेव्हां राज्यलक्ष्मी कशीही मिळाली तरी तिचा त्याग करणें सोपें नसतें अशा स्थितींत ) होता आणि ती राज्यलक्ष्मी त्याच्या अंकावर येऊन बसली होती. पण तिचा त्यानें उपभोग घेतला नाहीं. कारण त्याचें माझ्यावरचें अनिर्वचनीय प्रेम ! ती राज्यलक्ष्मी रामचंद्राची; तेव्हां तिचा आपण उपयोग घ्यावयाचा नाहीं ही जाणीव ठेवून ती अंकगता असतांनासुद्धां त्यानें आज इतकीं वर्षें तिच्याबरोबर अत्यंत खडतर असें असिधाराव्रत* आचरणांत आणलें. असें हें भरताचें वर्णन रामचंद्रानें केलें आहे. नंतर विमानांतून उतरून सर्व मंडळीच्या भेटी झाल्या. आपल्या मातेसमान असणाऱ्या ज्येष्ठ भावजयीला भरतानें पायांवर डोकें ठेवून नमस्कार केला. त्या नमस्काराचें वर्णन करतांना आमच्या कवीच्या काव्यसमुद्राला पौर्णिमेच्या दिवशीं यावी तशी भरती आली आहे. जानकीचे पायही पवित्र आणि भरताचें मस्तक ही पवित्र; त्यांचा संयोग होऊन दोघांचेंही पावनत्व वृद्धिंगत झालें.

* असिधाराव्रताची माहिती देतांना मल्लीनाथानें यादवाचा पुढील श्लोक दिलेला आहेः—

**युवा युवत्या सार्धं यन्मुग्धभर्तृवदाचरेत् ।**
**अंतर्निवृत्तसंगः स्यादासिधारं व्रतं हि तत् ॥**

आणि अर्थ स्पष्ट करण्यासाठीं मल्लीनाथ पुढें लिहितोः—' इदंच असिधाराचंक्रमणतुल्यत्वाद् आसिधारव्रतं इति उक्तम् । '

लंकेश्वरप्रणतिभंगदृढव्रतं तद्
वंद्यं युगं चरणयोर्जनकात्मजायाः ।
ज्येष्ठानुवृत्तिजटिलं च शिरोऽस्य साधो-
रन्योन्यपावनमभूदुभयं समेत्य ॥ रघु० १३-७८.

मला वश हो म्हणून लंकेश्वर ज्या पायावर सारखें डोकें ठेवीत होता पण ज्या पायांनीं त्या नमस्कारांना कधींही दाद दिली नाहीं म्हणून ज्यांचें दृढ व्रत सिद्ध होतें असें जानकीचें चरणयुगुल वंदनीय होतें; आणि ज्येष्ठ बंधूला सुख देण्यासाठीं जें जटिल ( जटाभार वाढविलेलं ) झालें होतें तें सज्जन भरताचें मस्तकही पवित्र होतें; हीं दोन्ही एकत्र येऊन परस्परांना पावन करणारीं झालीं. असो. अशा प्रकारें रामचंद्र आपल्या राजधानीला परत येऊन चौदा वर्षांनीं आपल्या माणसांत येऊन पडला. भरताची जशी त्याच्यावर निष्ठा होती, तशीच रामाची भरतावर होती. कांहीं दिवस राज्योपभोग घेतल्यावर रामाच्या आयुष्यांत असा एक रावणयुद्धापेक्षांही खडतर असा एक प्रसंग येऊन उभा राहिला.

सीतेबद्दल जेव्हां प्रजाजनांपैकीं कोणी तरी आक्षेप घेतला त्यावेळीं तिचा त्याग करण्याचें रामचंद्रानें ठरविलें. त्यासंबंधीं विस्तृत विवेचन मागें स्त्रीसृष्टि या भागांत आलेलं आहे त्याची द्विरुक्ति येथें करण्याचें कारण नाहीं. रामचंद्रानें जें केलें तें आपण कर्तव्य करीत आहोंत, राजेपणाचें कर्तव्य प्रजानुरंजन हें आहे म्हणून हें करणें भाग पडत आहे, अशा समजुतीनें केलें. सीतेचा त्याग त्यानें मनापासून केला नाहीं. सीतेवर त्याचें प्रेम अढळ होतें. विशेषेंकरून पत्नी गरोदर असतांना तिचा त्याग त्यानें करण्याचें ठरविलें, यावरून राजेपणाचें कर्तव्य व पत्नीसंबंधीं कर्तव्य किंवा देशसंबंधीं कर्तव्य आणि कुटुंबासंबंधीं कर्तव्य यांत त्यानें पहिलें श्रेष्ठ ठरविलें व दुसरें गौण म्हणून त्याचा त्याग केला. या बाबतींत त्याच्या बंधूंना जरी प्रत्यक्ष निषेध करण्याची संधि मिळाली नाहीं तरी त्यांना रामाचें हें करणें योग्य वाटलं नाहीं हें कवीनें स्पष्ट केलें आहे. शिवाय वाल्मीकीसारख्या थोर ऋषीकडून

अस्त्येव मन्युर्भरताग्रजे मे ।

असे उद्गार काढविले त्यावरूनही कालिदासाचा अभिप्राय सीतात्यागाविरुद्ध होता हें स्पष्ट झाल्याशिवाय रहात नाहीं. जगांत प्रत्येक वर्तन—जर तें उत्तम व्हायचें

असेल–तर अनेक तत्त्वांचा परिणाम म्हणून होत असतें. त्यांतील एखाद्या तत्त्वाला जर एकांतिक महत्त्व दिलें आणि इतर तत्त्वें जर गौण म्हणून त्याज्य ठरविलीं तर वर्तनांत दोष उत्पन्न होऊन तें दुःखाला कारणीभूत होतें. तोच प्रकार रामाच्या बाबतींत झाला आणि तोच प्रकार मोठ्या व लहान माणसांच्या वागण्यांत इतके वेळां होतो कीं रामचंद्रानें राजेपणाचें कर्तव्य या तत्त्वाला एकांतिक महत्त्व दिलें, यांत मनुष्यस्वभावच दृग्गोचर होतो. पत्नीच काय पण सर्व कुटुंब हें कर्त्या पुरुषाच्या सुखासाठीं गोळा झालेलें असतें व त्या वैयक्तिक सुखाला उद्देशून रामानें कुटुंबाला विषयार्थ असें म्हटलें आहे; सीता या व्यक्तीला उद्देशून विषयार्थ म्हट-लेलें नाहीं असा अर्थ लावणें ज्यास्त सयुक्तिक वाटतें. खासगी सुख व प्रजानु-रंजन या दोहोंत रामानें स्वार्थाचा त्याग केला असें म्हणतां येणार नाहीं असें नाहीं. एका व्यक्तीच्या बाबतींत अन्याय झाला तरी त्याला खपला—त्यानें खप-वून घेतला. ती व्यक्ति त्याची प्रियतमा पत्नी होती; पण सर्व जनतेला त्यानें खूष करण्याचें ठरविलें. कर्तव्याच्या या झगड्याच्या बाबतींत रामानें वैयक्तिक दुःख पतकरलें पण राष्ट्राचें सुख पाहिलें. राजा या नात्यानें त्यानें हें केलें; त्यावर वाल्मीकीसारख्याचें मत वर दिलेंच आहे. पण जें केलें त्यांत स्वार्थ नव्हता एवढें लक्षांत ठेविलें तर रामचंद्रानें केलेली गोष्ट आपणांला अत्यंत अमान्य झाली तरीसुद्धां त्याच्या कर्तव्यनिष्ठेची प्रशंसा करावी हें योग्य वाटेल. असे जेव्हां बिकट प्रसंग येतात तेव्हां थोर माणसें स्वार्थ गौण लेखतात व दुसऱ्यांचें समा-धान पहातात. या स्वार्थाचा त्याग करतांना त्यांच्या आप्तांच्या बाबतींत त्यांची इच्छा नसतांना अन्याय घडतो ही गोष्ट खरी आहे. सीतेवर हें मोठें संकट कोसळलें; तिचा अपराध असा बिलकूल नव्हता; पण रामापुढें तरी अत्यंत अवघड प्रश्न उभा राहिला होता व तो सोडवितांना त्यानें स्वतःचा स्वार्थ असा पाहिला नाहीं. कर्तव्यनिष्ठेचें पर्यवसान एकांतिकपणांत होतें तसें त्याचें झालें. जानकीनें सांगितलेला संदेश लक्ष्मणानें रामचंद्राला निवेदन केला. तेव्हांचें वर्णन कवीनें थोडक्यांत पण अर्थपूर्ण केलें आहे व त्यांत रामचंद्रानें असें कां केलें याचाही परिहार आहेः—

**बभूव रामः सहसा सबाष्प-**
**स्तुषारवर्षीव सहस्यचंद्रः ।**
**कौलीनभीतेन गृहान्निरस्ता**
**न तेन वैदेहसुता मनस्तः ॥ १४–८४**

लक्ष्मणानें सीतेचा निरोप सांगतांच रामाच्या डोळ्यांतून घळघळा अश्रु वाहूं लागले. पौष महिन्यांत चंद्र जसा चंद्रिकातुषारांचा म्हणजे आपल्या किरणांचा वर्षाव करतो त्याप्रमाणें रामानें अश्रूंचा वर्षाव केला म्हणजे तो ढळढळा रडला. सीता जें बोलली त्याचा राग त्याला मुळींच आला नाहीं किंबहुना तिच्यावर हा प्रसंग आपणच आणला म्हणून तो विरघळून गेला. त्याच्या अंत:करणाची स्थिति काय झाली होती याचें कालिदासाच्या कवित्वावर मात करणारें वर्णन भवभूतीच्या उत्तररामचरितांत आहे. पण वर दिलेल्या श्लोकावरूनही रामाच्या अंत:करणाची ओळख पटते. त्यानें सीतेला टाकून दिली ती अपवादाच्या भयानें; मनापासून नव्हे हें कवीनें स्पष्ट केलें आहे. पुढें यज्ञ करण्याचा प्रसंग आला तेव्हां पुण्याहवाचनास सपत्नीक बसणें अवश्य होतें. त्या निमित्तानें रामाला विवाह करतां आला असता. किंवा अलीकडे कित्येक संशोधक म्हणविणाऱ्यांनीं जी आपली समजूत करून घेतली आहे कीं राम एकपत्नी नव्हता, त्याला अनेक स्त्रिया होत्या, तर अशा स्त्रियांपैकीं एखादी पुण्याहवाचनाला बसवून तें कार्य पार पाडतां आलें असतें. पण कालिदासाचा राम एकपत्नी होता आणि त्याचें सीतेवर इतकें निस्सीम प्रेम होतें कीं तिचा जागा घेण्यास योग्य अशी दुसरी स्त्री मिळणें त्याला शक्यच वाटत नव्हतें आणि त्याला दुसरी स्त्री नको होती. म्हणून त्यानें यज्ञप्रसंगीं सीतेची सुवर्णप्रतिमा करून यज्ञाचा कार्यभाग शेवटास नेला. हा वृत्तांत कानावर आला तेव्हां दुर्वार म्हणजे निवारण करण्याला अत्यंत कठीण असें नवऱ्यानें आपणांस टाकून दिल्याबद्दलचें भयंकर दुःख कसें तरी सीतेनें सहन केलें. रामाच्या या पुढच्या वर्तनामुळें सीतेचें दुःख जर थोडेंसें हलकें झालें तर सीतापरित्यागामुळें रामाचा जो आपणांला योग्य संताप येतो तो हलका व्हावयास हरकत नाहीं; आणि ज्यांना तसा संताप होत नसेल त्यांनीं हें लक्षांत ठेवावें कीं ते रामाच्या बाजूचे असले तरी राम त्यांच्या बाजूला नाहीं. कारण जरी अपवादभयानें रामानें सीतेला टाकली तरी सीतेचा पक्ष त्यानें कधींही सोडला नाहीं.

५. पंधराव्या सर्गांत जें रामाचें वर्णन आलें आहे त्याचा उल्लेख मागील भागांत सीतेच्यासंबंधीं केलेल्या विवेचनांत झाला आहेच. तेथें वर्णन केल्याप्रमाणें सीतेचा शेवट झाल्यावर आपलाही काळ जवळ आला हें रामानें ओळखलें आणि त्यानें सर्व निरवानिरव करून आपल्या व लक्ष्मणाच्या पुत्रांची राज्यविभागांवर स्थापना केली. लक्ष्मणानेंही शरयूतीरावर जाऊन योगमार्गानें देहत्याग केला.

सीता गेली, लक्ष्मणही गेला, तेव्हां रामाचेंही चित्त उदासीन झालें आणि आपल्या सर्व अनुयायांसहित विमानानें तो देवलोकाला गेला. रघुवंशांत रामाचें चरित्र कालिदासानें गायिलें आहे त्यावरून आपण सीता आणि राम यांच्या चारित्र्याचा परिचय करून घेतला. पण रघुवंशांत रामचरित्राहून सरस अशीं चरित्रें या महाकवीनें ग्रथित करून आपली वाणी धन्य केली आहे. तीं चरित्रें वाचून त्यांच्या कोंदणांत रामचरित्र वाचलें म्हणजे असें वाटतें कीं अशा थोर कुलांत रामानें जन्म घ्यावयाचा नाहीं तर तो कोठें घ्यावयाचा? दिलीप, रघु आणि अज या तिघांच्याही चरित्राकडे राजे या नात्यानें थोडा वेळ पाहिलें म्हणजे कालिदासाची राजासंबंधीं ध्येयबुद्धि काय होती हें लक्षांत येतें. पैकीं दिलीपाचा उल्लेख मागें आलेला आहे व रघूच्या ल्हानपणाची हकीकत तिसऱ्या भागांत आलेली आहे. त्याची आणखी पुढची हकीकत त्याच भागांत वरतंतूच्या वृत्तांतांत आलेली आहे. तेव्हां आपण आतां अजराजाचा वृत्तांत पाहूं. अजराजाची विशेष प्रख्याती त्यानें पत्नीनिधनानंतर जो शोक केला त्यामुळें आहे. कालिदासीय वाङ्मयांत अजविलाप हें करुणरसाचें अत्यंत हृदयंगम उदाहरण म्हणून सुप्रसिद्ध आहे हें रसिक वाचकांस सांगावयास नकोच. वरतंतु ऋषीचा शिष्य कौत्स याला रघूनें सोन्याचा पर्वत दिल्यावर "तुला आपल्या गुणांना अनुरूप असा पुत्र होवो" म्हणून त्या ब्राह्मणबटूनें आशीर्वाद दिला आणि योग्यकाळीं रघूची पत्नी प्रसूत होऊन तिला पुत्रप्राप्ति झाली. या मुलाचें नांव अज असें रघूनें ठेविलें. बापाच्या म्हणजे रघूच्या आंगचे सर्व गुण अजाच्या ठिकाणीं होते :—

रूपं तदोजस्वि तदेव वीर्यं
तदेव नैसर्गिकमुन्नतत्वम् ।
न कारणात्स्वाद्बिभिदे कुमारः
प्रवर्तितो दीप इव प्रदीपात् ॥ रघु० ५-३६.

त्याचें रूप बापासारखेंच ओजस्वी; त्याची शक्ति बापाप्रमाणेंच; आणि बापाच्या ठिकाणीं जो स्वाभाविक थोरपणा होता तोच अजाच्या ठिकाणीं होता; आपल्या पित्यापासून गुणाच्या बाबतींत तो मुळींच निराळा नव्हता; मोठ्या दिव्याला लावून प्रज्वलित केलेल्या दिव्याप्रमाणें तो वाटला. अजाचा विद्याभ्यास वगैरे यथायोग्य प्रकारें पार पडल्यावर त्यानें योग्य वधूशीं विवाह करावा असें रघूला वाटलें आणि त्याच वेळीं विदर्भ (सध्यांचे वऱ्हाड) देशाच्या राजानें आपली बहीण

इंदुमती इचें स्वयंवर उभें केलें होतें व त्यासाठीं रघूकडे आमंत्रणही पाठविलें होतें. हें लग्न जुळेल तर उत्तम असें वाटून रघूनें अजाला स्वयंवरासाठीं विदर्भ देशाच्या राजधानीकडे मोठा लवाजमा देऊन पाठविलें. थोड्या दिवसांनीं अज तेथें जाऊन पोहंचला व स्वयंवराला जमलेले मोठे मोठे राजे लोक त्याच्या दृष्टीला पडले. त्या राजांनीं जेव्हां अजाला पाहिलें तेव्हां इंदुमती आपणाला माळ घालील ही त्यांची आशा नष्ट झाली असें कवीनें वर्णन केलें आहे. स्वयंवराच्या वेळीं इंदुमतीचें आपल्याकडे लक्ष वेधावें म्हणून त्या राजेलोकांनीं ज्या निरनिराळ्या युक्त्या योजिल्या त्यांचें मोठें चतुर वर्णन कालिदासानें केलें आहे. इंदुमती आपली दासी सुनंदा इच्यासमवेत हातांत फुलांची माळ घेऊन स्वयंवर–मंडपांत प्रविष्ट झाली. तिला पाहातांक्षणींच, ते राजे लोक केवळ देहानें आपल्या आसनावर बसले होते पण त्यांचीं अंतःकरणें तिच्या चरणावर जाऊन प्रणयमुग्ध झालीं. त्या राजेलोकांतून तिनें वाटेल तो वर निवडावा अशी योजना होती. सुनंदा प्रत्येक राजाचा वृत्तांत मोठ्या खुबीदारपणानें राजकन्येला सांगत होती व राजकन्या तो ऐकत ऐकत त्या मंडपांत पुढें पुढें चालली होती. अंगराजाचें वर्णन करतांना सुनंदा म्हणाली:—“या अंगनाथाच्या तारुण्याची संपत्ति आपल्याला प्राप्त व्हावी म्हणून स्वर्गातल्या अप्सरा अभिलाष धरतात. हत्तीला शिक्षण देणारे मोठमोठे तज्ञ आणवून त्यानें आपले हत्ती तयार केले आहेत. आणि अशा प्रकारें पृथ्वीवर राहून सुद्धां तो इंद्राचें ऐश्वर्य भोगतो. श्री आणि सरस्वती यांचें कधीं जमत नाहीं, स्वभावतः त्यांचा विरोध आहे, परंतु त्या आपला नित्य-विरोध विसरून याच्याजवळ एकत्र राहिल्या आहेत. रूप आणि मन्य वाणी यामुळें तूंच याला योग्य आहेस व श्री आणि सरस्वती-मध्यें तिसरी शोभून जाशील” असें वर्णन ऐकूनसुद्धां इंदुमतीच्या मनाला तो आला नाहीं. सुनंदेला “ पुढें चल ” असें ती म्हणाली. राजा उत्तम नव्हता असेंही नाहीं आणि इंदुमतीलाही नीट कळत नव्हतें असें नाहीं. पण तिनें कांहीं त्याच्याकडे दृष्टि दिली नाहीं. तेव्हां कवि म्हणतो “ भिन्नरुचिर्हिलोकः ” कोणाची आवड कशी असेल हें सांगतां येणार नाहीं. पुढें अवन्तीनाथाचीही सुनंदेनें पुष्कळ स्तुति केली. [ कालिदास हा अवन्तीनाथाच्या पदरीं होता अशी समजूत आहे व रघूच्या सहाव्या सर्गांतील ही त्याची स्तुति त्यामुळें कालिदासानें केलेली आहे असें कित्येकांचें म्हणणें आहे. मग अंगराजाचीही त्यानें खूप तारीफ केली आहे

म्हणून तो त्याच्या पदरीं होता असें कां म्हणूं नये?] परंतु तो उज्जयिनीचा (अवंतीचा) राजाही तिच्या मनाला आला नाहीं. सुनंदेनें आणखी कित्येक राजांचीं वर्णनें केलीं पण इंदुमती पुढें पुढें चालली होती; पुढें ती जेव्हां अजाजवळ आली तेव्हां तो मनांत थोडासा गडबडला. "इतके मोठमोठे राजे येथें आहेत त्यांपैकीं कोणीही हिला पसंत पडला नाहीं, तेव्हां ही मला तरी कशी माळ घालणार?" अशी शंका क्षणभर त्याच्या अंतःकरणांत उत्पन्न झाली. पण त्याचा उजवा बाहु स्फुरण पावूं लागला व त्यामुळें त्याची शंका नाहींशी झाली. पुरुषांचा उजवा बाहु स्फुरण पावणें हें त्याच्या लाभाचें चिन्ह समजत, त्याला अनुसरून हें वर्णन आहे. अजाजवळ जेव्हां ती कुमारी प्राप्त झाली आणि त्याच्यांत दोष काढण्याला कोठेंही जागा नाहीं असें जेव्हां तिला कळलें तेव्हां पुढें पुढें जाऊन दुसरे वर पाहण्याची इंदुमतीची इच्छा नाहींशी झाली. प्रफुल्ल अशा आम्रवृक्षाजवळ आल्यानंतर भृंगपंक्ति ज्याप्रमाणें दुसऱ्या वृक्षाकडे जाण्याची इच्छा करीत नाहीं, त्याप्रमाणें प्रफुल्ल अशा अजाचें दर्शन होतांच ती राजकन्या तेथेंच थबकली. तिच्या सर्व चित्तवृत्ति अजाच्या ठिकाणीं स्थिर झाल्या. तें पाहून अजाची सविस्तर माहिती सुनंदेनें सांगितली. दिलीप व रघु यांचें गौरवानें वर्णन करून हा दिलीपाचा नातू व रघूचा मुलगा असें सांगून तो या थोर राजांच्या तोडीचा आहे हें तिनें स्पष्ट केलें. आणि शेवटीं आपली स्वतःची शिफारस म्हणून तिला स्पष्ट सांगितलें:—

> कुलेन कान्त्या वयसा नवेन
> गुणैश्च तैस्तैर्विनयप्रधानैः ।
> त्वमात्मनस्तुल्यममुं वृणीष्व
> रत्नं समागच्छतु कांचनेन ॥ रघु० ६–७९.

"हा अत्यंत थोर कुळांत उत्पन्न झालेला; याचें रूप अतिशय तेजस्वी; हा वयानें अगदीं तरुण; विनम्रता वगैरे सर्व उत्तम गुण याचे ठिकाणीं आहेत; आणि म्हणून सर्व प्रकारें हा तुझ्याजोगता आहे; यालाच माळ घाल आणि रत्न व सुवर्ण यांचा संयोग जसा अत्यंत अनुरूप त्याप्रमाणें तुमचा दोघांचा विवाह म्हणजे अतिशय योग्य होईल." आणि इंदुमतीनें हातांतील माळ अजाच्या गळ्यांत घालून मोठ्या प्रसन्न अशा दृष्टीनें त्याचा स्वीकार केला. तिच्या अंतःकरणांत त्याच्याबद्दल आतु-

रता उत्पन्न झाली होती हें ती विनयवती कुलकन्या असल्यामुळें तिला बोलून दाखविणें शक्य नव्हतें. परंतु तिच्या शरीरावर ती भावना रोमांचरूपानें प्रत्यक्ष-तेला आली. सुनंदा तिची बरोबरची मैत्रीण; ती चेष्टा करण्याच्या हेतूनें म्हणाली-मुद्दां—" आतां पुढं जाऊं या ना येथून ! " तेव्हां इंदुमतीनें थोडेसे रागानें तिच्या-वर डोळे वटारले; आणि अशा प्रकारें इंदुमती आणि अज यांचा हा रत्नकांचन-योग जमून आला.

हें जोडपें किती उत्कृष्ट जमलें होतें याचें पुढच्या म्हणजे सातव्या सर्गांत कवीनें पुनः एकदां वर्णन केलें आहे तें पहाः—

परस्परेण स्पृहणीयशोभं
न चेदिदं द्वंद्वमयोजयिष्यत्।
अस्मिन्द्वये रूपविधानयत्नः
पत्युः प्रजानां वितथोऽभविष्यत् ॥ ७-१४

अत्यंत सौंदर्ययुक्त अशा या दोघांची योजना जर दांपत्य म्हणून ब्रम्हदेवानें केली नसती तर त्या दोघांनाही जी अनुपम रूपसंपत्ति देण्याचा त्यानें प्रयत्न केला होता तो फुकट गेला असता ! कारण दोघांचीही रूपें अशीं होतीं कीं जणूं काय तीं परस्परांसाठींच निर्माण केलेलीं होतीं. लग्न मोठ्या थाटानें झालें. लग्नानंतर निराश झालेल्या इतर राजेलोकांनीं गडबड केली पण अजानें त्यांचा पूर्ण पराभव करून टाकला आणि आपल्या सुंदर पत्नीरत्नाला घेऊन तो आपल्या राजधानीला परत आला त्या राजेलोकांचा त्यानें परा-भव केल्यामुळें इंदुमती त्याची केवळ पत्नी नव्हे तर मूर्तिमंत समरविजय-लक्ष्मी म्हणून त्याबरोबर आली. रघूला विवाहाची आणि विजयाची सर्व हकीकत अगोदरच कळलेली होती, तेव्हां अज परत आल्यावर त्याचें मोठें कौतुकानें रघूनें अभिनंदन केलें. एकतर शेंकडों नृपतींचा पराजय करून पराक्रमी पुत्र घरीं आलेला; आणि दुसरें, अत्यंत अनुरूप अशी पत्नी घेऊन आलेला. अभि-नंदनाचें आणखी एक कारण होतें. मुलगा कर्तासवरता झाला, त्याची काळजी करण्याचें कारण उरलें नाहीं; राज्याचा भार टाकल्यावर तो भार तो उत्तम प्रकारें सहन करील ही पण रघूची खात्री झाली.

चांगली रूपगुणसंपन्न सून घरीं आली तेव्हां मुलग्याचा संसार उत्तम प्रकारें होईल याबद्दल शंका उरली नाहीं; तेव्हां रघूला आतां संसाराचा त्याग करावा, व मोक्षमार्गाला लागावें असें वाटूं लागलें. रघूचें चरित्र आपण राजकुमार म्हणून पाहिलें, मोठा दानशूर नृपति म्हणून पाहिलें. त्याचें उत्तर चरित्रही मोठें हृदयस्पर्शी आहे; आणि तें वर्णन करतांना अजाचेंही वर्णन कालिदासानें केलें आहे. तेव्हां अजाची पुढची हकीकत—म्हणजे पत्नीवरील निरतिशय प्रेमाची हकीकत—ऐकण्यापूर्वी रघूच्या उत्तरकालीन चरित्राचा चमत्कार आपण पाहूं. म्हणजे उत्कृष्ट पिता, उत्कृष्ट गृहस्थ हा कसा वागतो याचें प्रत्यंतर मिळेल. तिकडे वळण्यापूर्वी येवढें म्हटलें पाहिजे कीं अज-इंदुमती केवळ गुणांनीं व रूपसंपदेनें अनुरूप होते असें नाहीं तर त्यांचा परस्पर अनुरागही अत्यंत दृढ होता. त्या अनुरागाची पार्श्वभूमि त्यांच्या अनुरूपतेनें व अनुगुणतेनें आपल्या दृष्टीस पडते. परस्परांचा अत्यंत अनुराग, कौतुक करणारीं वडील माणसें, आणि व्यवहारांत दक्ष स्वतः पतिपत्नी असा सर्व योग जुळून आल्यामुळें अजाच्या व इंदुमतीच्या संसाराची सुरवात फारच मधुर अशा प्रकारची झाली होती.

संसारांत पितापुत्रांनीं, वृद्ध पिढीनें व तरुण पिढीनें परस्परांशीं कसें वागलें असतां तो पूर्ण आनंदमय होतो, कल्याणदायक होतो याचें सुंदर चित्र आठव्या सर्गाच्या सुरवातीला कालिदासानें काढून ठेविलें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. दिलीप राजानें नव्याण्णव यज्ञ यथासांग पार पाडले व नंतर आपला मुलगा रघु याच्यावर राज्य व संसार सोपवून तो सपत्नीक वनांत वानप्रस्थाश्रमाचें पालन करण्यासाठीं गेला त्याच वेळीं कवीनें म्हटलें आहे—

गलितवयसामिक्ष्वाकूणामिदं हि कुलव्रतम् ।

म्हातारपणीं वानप्रस्थाश्रम घेणें हें इक्ष्वाकु कुळांतील राजांचें कुलव्रतच आहे. आणि त्याच कुलव्रताची परंपरा रघूनें आपला मुलगा मोठा झाल्यावर चालविली. मुलगा कर्तासवरता झाला कीं आईबापांनीं संसारांतून निवृत्त होऊन मोक्षमार्गाला लागावें, वानप्रस्थाश्रम घ्यावा, अलीकडच्या भाषेंत बोलावयाचें म्हणजे घरीं जाणत्या व मोठ्या झालेल्या मुलाबाळांच्या पाठीमागें पिरपिर न लावतां कांहीं तरी चांगल्या (स्वतःला किंवा लोकोपयोगी ) कार्यांत निःस्वार्थपणानें वेळ घालवावा अशी व्यवस्था असली म्हणजे संसारांत बखेडे कमी होतात;सामाजिक व्यवहारांतहि

अशाच वागण्यानें बखेडे कमी होतात. कालिदास या आश्रमव्यवस्थेचें ठिकठिकाणीं कौतुकानें वर्णन करतो. पूर्वीच्या राजांचें एक महत्त्वाचें कर्तव्य, लोक वर्णाश्रम-धर्माप्रमाणें वागतात का नाहीं हें पहाण्याचें होतें; म्हणजे आश्रमधर्माचें आचरण करण्याची सक्ती त्यांना करतां येई. अर्थात् वयाची पन्नाशी, साठी उलटल्यानंतर कोवळ्या पोरीशीं विवाह करून संसारांत पुनः पडूं पाहणारे आणि सासूबाईपेक्षां सून वयानें प्रौढ असल्यामुळें घरांत भलभलते तंटे उत्पन्न करणारे चमत्कारिक नागरिक त्या राजसत्तेनें सहन केले नसते असें म्हणण्यांत अतिशयोक्ति होण्याचा बिलकुल संभव नाहीं. रघुराजानेंही अज विवाहित व कर्ता झालेला पाहून त्याजकडे राज्य सोपविलें. अजाच्या अंगावरची लग्नाची हळद अद्यापि पुसून गेली नव्हती तेव्हांच म्हणजे पत्नीला घेऊन स्वगृहीं परत आल्याबरोबर, घरभरणी झाल्याबरोबर, रघूनें वसुधेचें राज्य त्याच्या हवालीं केलें; जशी इंदुमती त्याची एक पत्नी तशी वसुधा ही दुसरी पत्नी त्याच्या हातांत दिली; आमच्या मराठी शब्दसांप्रदायाचा उपयोग करून बोलावयाचें म्हणजे वसुधाही त्याच्या पदरांत टाकली. अजानें तिचा स्वीकार केला—राज्यलोभानें केला नाहीं, त्याची इच्छा वडिलांनीं इतक्यांत वानप्रस्थ स्वीकारूं नये अशीच होती; पण पित्याची आज्ञा पाळणें हें त्याचं कर्तव्य होतें म्हणून त्यानें राज्याधिकाराचा स्वीकार केला. कवि म्हणतो, राजघराण्यांत केवढाल्या उचापती करून राज्यें मिळविण्याचा प्रयत्न राजपुत्र करतात; पण अजानें स्वीकार केला, तो जें अगदीं त्याच्यापुढं येऊन पडलें होतें अशा राज्याचा स्वीकार केला आणि तो सुद्धां केवळ पित्याच्या आज्ञेचें परिपालन करण्यासाठीं. त्याला राज्याच्या उपभोगाची तृष्णा मुळींच नव्हती. पण मुलगा निर्लोभ आहे म्हणून बापानें आपलीच सत्ता गाजवावयाची; मुलगा पित्राज्ञापालन करणारा आहे म्हणून त्याच्यावर हवी तशी कुरघोडी करावयाची; मुलगा सज्जन आहे म्हणून त्याच्या लग्नाच्या बाबतीचीं पत्रें आपण चोरून फोडून पहावयाचीं व तीं मुलाच्या हातीं लागूंही द्यावयाचीं नाहींत, वगैरे वगैरे समाजांत आजकाल रूढ असलेले प्रकार आर्यसंस्कृतीच्या आश्रमव्यवस्थेला मुळींच मान्य नव्हते. रघुवंशांत कालिदासानें हें वर्णन केलें आहे तें क्षत्रिय-राजांचें. त्यांच्यांत आश्रमधर्म उत्कृष्टपणें पाळण्याचें कुलव्रत होतें. मग जे ब्राह्मण आहेत, जे जात्याच निर्लोभ व विद्याभिलाषी असले पाहिजेत, त्यांनीं संसारांत गुरफटून राहणें, प्राण जाण्यापूर्वीची उचकी येणार असें वाटल्यावर आतां उपाय नाहीं म्हणून चतुर्थाश्रम मरतां मरतां घेण्याचा उपद्व्याप करणें

आणि आपला ढोंगीपणा किंवा मूर्खपणा जगजाहीर करणें या गोष्टी तर आर्य-संस्कृतीला केव्हांही मान्य होणाऱ्या नाहींत. कालिदासाच्या काव्यांतून वर्णनरूपानें किंवा ध्येयरूपानें आर्यसंस्कृतीचीं जीं उज्ज्वल तत्त्वें प्रतीत होतात, त्यांचा विचार या ग्रंथाच्या शेवटच्या भागांत करावयाचा आहे. त्या तत्त्वांपैकीं आश्रमधर्म हें एक फार महत्त्वाचें तत्त्व आहे. त्या तत्त्वाला अनुसरून रघूनें वसिष्ठ ऋषीकडून ( वसिष्ठ हा रघुवंशाचा कुलगुरु, कुलोपाध्याय होता हें सर्वश्रुत आहे ) अजाला राज्याभिषेक करविला आणि याप्रमाणें अजाचें क्षात्रतेज व गुरु वसिष्ठाच्या आशीर्वादांत अंतर्भूत असलेलें ब्रह्मतेज यांचा हा संयोग वारा आणि अग्नि यांच्या समागमासारखा परशत्रूंना अजिंक्य असा झाला. आर्यसंस्कृतीचें हें दुसरें महत्त्वाचें तत्त्व आहे. राष्ट्र उत्कृष्ट प्रकारें चालण्याला बुद्धि आणि पराक्रम यांची एकतानता असली पाहिजे. ब्राह्मण व क्षत्रिय म्हणजे परंपरेनें वर्णव्यवस्थेनें व्यवहारांत उत्पन्न झालेले सर्व वर्ण यांचा एकोपा असला पाहिजे आणि तो एकोपा होण्यासाठीं या निरनिराळ्या वर्गांनीं आपापलीं ठरलेलीं कामें उत्तम पार पाडलीं पाहिजेत व दुसऱ्यांच्या क्षेत्रांत ढवळाढवळ करतां उपयोग नाहीं. म्हणजे समाजकार्य हें सर्वांचें मिळून कार्य आहे. निरनिराळे समाजघटक परस्परानुकूल असतील तर समाजाचें कल्याण सिद्ध होईल, परस्परांना प्रतिकूल असतील तर समाजाचा विनाश होईल आणि हिंदु समाजाचा जो ऱ्हास आज कित्येक शतकें चाललेला आहे त्याच्या मुळाशीं वर्णव्यवस्थेंतील मूळचें परस्परानुवर्तित्व जाऊन तेथें परस्परद्वेष उत्पन्न झाला आहे हें आहे. त्याला जबाबदार कोण या वादांत पडण्याचें हें स्थळ नव्हे. आर्यसंस्कृतीच्या तत्त्वमालिकेंत जातिद्वेष नाहीं तर माणसांच्या निरनिराळ्या शक्तींचा संयोग गृहीत धरलेला आहे. या परस्परा-नुकूल संयोगाला धृति किंवा धारणा म्हणतात आणि या धृतीच्या बलावर समाज चालतो आणि या धारणेला अनुकूल आचरण त्याला धर्म म्हणतात आणि प्रतिकूल आचरणाला अधर्म म्हणतात. तेव्हां सध्यां हिंदुधर्माच्या व्याख्येविषयीं व मूलतत्त्वांविषयीं जे विवाद चालू आहेत त्यांचा विचार करतांना समाजाची धारणा याचा अर्थ आर्यसंस्कृति काय समजते हें लक्षांत घेतलें पाहिजे. कोण-त्याही एका वर्णाचें प्राबल्य असावें असें त्या संस्कृतीचें रूप नाहीं तर निरनि-राळ्या वर्णांत स्वाभाविकपणें असणाऱ्या शक्ति एकवटाव्या म्हणजे समाजाला कल्याणप्राप्ति होते असा तिचा स्पष्ट संदेश आहे; आणि अज व वसिष्ठ यांच्या परस्परानुकूलतेचें वर्णन करतांना तोच संदेश सूचित आहे. असो.

अज राजा रघूप्रमाणेंच राज्यकारभार उत्तम प्रकारें चालवूं लागला; जसा काय रघूच पुनः तरुण होऊन राज्य करावयास लागला आहे असें प्रजाजनांना वाटूं लागलें; कारण रघूची केवळ सत्ताच अजाला प्राप्त झाली होती असें नाहीं तर पित्याचे सर्व उत्तम गुणही त्याच्यांत उतरले होते. राज्य प्राप्त झालें तरी त्याला गर्व चढला नाहीं. तर तो विनयशील होता, म्हणजे एवढी अधिकारसंपत्ति प्राप्त झाली तरी त्याचीं इंद्रियें त्याच्या ताब्यांत होतीं; तो त्यांच्या आहारीं गेला नाहीं. प्रजेवर त्याचा दरारा होता आणि प्रजेवर त्याचें प्रेमही होतें. तो फार कठोरपणानेंही वागत नसे आणि मऊपणानेंही वागत नसे. ( अंमल चालविणाराला या दोन्ही गोष्टी टाळल्या पाहिजेत हें प्रसिद्ध आहे ). याप्रमाणें मुलग्याचें राज्य यथास्थितपणें चाललें आहे असें पाहून रघुराजा विनाशवंत अशा विषयांच्या बाबतींत निस्पृह झाला; त्यानें आशा निराशा या गोष्टींचा त्याग केला. ( घरांत मुलगा कर्ता होईपर्यंत बापाला संसारांतून निवृत्त होतां येत नाहीं. कुटुंब ही एक जबाबदारी आहे; तिची योग्य निरवानिरव केल्याशिवाय तींतून निसटणें म्हणजे कर्तव्यभ्रष्टतेचा दोष लागतो. आणि वाजवीपेक्षां अधिक संसारांत राहणें म्हणजेही कर्तव्यभ्रष्टता होते ). रघूला आतां कसलाहि लोभ उरला नाहीं. ब्रह्मचिंतनांत मरण येईपर्यंत कालक्षेप करावयाचा असें त्यानें ठरविलें. कारण, वर सांगितल्याप्रमाणें तें त्याचें कुलव्रतच होतें. त्या कुलव्रताचें वर्णन कवि आणखी एकदां करतोः—

गुणवत्सुतरोपितश्रियः
परिणामे हि दिलीपवंशजाः ।
पदवीं तरुवल्कवाससां
प्रयताः संयमिनां प्रपेदिरे ॥ ८–११

गुणवान् अशा पुत्राला राज्यलक्ष्मी अर्पण करून दिलीप वंशांतले राजे आयुष्याच्या उत्तर भागांत यमनियमयुक्त होतात आणि झाडांचीं वल्कलें धारण करून संयमनशील ऋषींच्या मार्गाचा आश्रय करतात. रघु वनांत चालला तेव्हां अजानें त्याच्या पायावर डोकें ठेवून "बाबा, मला टाकून तुम्ही जाऊं नका" म्हणून परोपरीनें विनविलें. तेव्हां दूर वनांत जाण्याऐवजीं राजधानीजवळच्या भागांत आश्रम करून राहण्याचें रघूनें ठरविलें. पण राज्यकारभार त्यानें सोडला तो सोडलाच तिकडे पुनः लक्ष घातलें नाहीं; त्याची मुखत्यारी जी पुत्राकडे सोंपविली तींत पुनः

हात घातला नाहीं. आतां राज्यलक्ष्मीला तो रघुराजा आपली सून मानीत होता त्यामुळें तिच्या बाबतींत त्याच्या अंतःकरणांत कसलीही विकृति उत्पन्न होण्याची शक्यताच राहिली नाहीं. पितापुत्रांमधील येथें वर्णन केलेलें प्रेम मोठें हृदयस्पर्शी आहे यांत शंका नाहीं; असें प्रेम असण्याला दोघेंही चांगलीं माणसें असलीं पाहिजेत हें जितकें खरें तितकेंच असें प्रेम उत्पन्न होण्याला आश्रम-धर्माचें यथायोग्य परिपालन हें अतिशय कारणीभूत होतें हेंही खरें; आणि सध्यांच्या आपल्या समाजस्थितींत या तत्त्वाकडे जितकें लक्ष द्यावें तितकें थोडेंच होईल.

७. वर सांगितल्याप्रमाणें रघूनं यतीचं व्रत घेतलं आणि अजानें राजाचं व्रत घेतलें. उत्तम प्रकारें राज्य चालविणें हें फार कठीण व्रत आहे व तें पार पाडण्यासाठीं व्रतस्थपणाचा अवलंब केला पाहिजे; वाटेल तसा धुमाकूळ घालतां येण्याची शक्यता म्हणजे राजेपणा ही कल्पना अत्यंत चुकीची व हानिकारक आहे. तो राजेपणाही नव्हे व तें स्वातंत्र्यहि नव्हे. त्या दोघांनीं हीं व्रतें कशीं पाळलीं याचें जोडीजोडीनें वर्णन कवीनें केलें आहे तें मोठें काव्यमय आणि आल्हाददायक आहे. तें वर्णन करण्याच्या मिषानें त्या व्रतामुळें माणसांवर काय जबाबदारी येऊन पडते त्याचाहि खुलासा कवीनें विस्तारानें केला आहे. अयोध्येचे लोक पितापुत्रांचें तें व्रतपालन मोठ्या कौतुकानें पहात होते. त्यांना वाटलें कीं प्रत्यक्ष मोक्षधर्म व अभ्युदयधर्म म्हणजे ऐहिक अभ्युदयधर्म हे यांच्या रूपानें पृथ्वीवर अवतीर्ण झाले आहेत. अभ्युदयधर्माचें प्रतिपालन करून मग माणसानें ( संसारांत पडलेल्या माणसानें तरी ) मोक्षधर्माचा रस्ता धरावयाचा असतो हेंही कवीनें सूचित केलें आहे. मोक्षमार्ग म्हणजे निवृत्तिमार्ग आणि अभ्युदयमार्ग म्हणजे प्रवृत्तिमार्ग असा आपल्या टीकेंत मल्लीनाथानें स्पष्ट खुलासा केलेला आहे. आतां आपापल्या व्रतपालनार्थ रघु व अज एकाच प्रकारच्या दिसणाऱ्या पण खरोखर ज्यांचें फळ भिन्न अशा गोष्टी करीत होते. सर्व जगांत आपणांस अजिंक्य कसें होतां येईल याचा विचार करण्यासाठीं अजानें राजनीतींत प्रवीण असे मंत्री आपल्याभोंवतीं गोळा केले व त्यांच्या साह्यानें तो आपल्या कार्याला लागला. रघूनेंही आपल्याभोंवतीं साहाय्यक गोळा केले होते पण ते "आप्त" म्हणजे यथार्थवादी, सत्य बोलणारे, भीडभाड न ठेवणारे असे योगी होते, म्हणजे संयमनशील आणि तपोनिधि असे होते. 'वारांगनेव,' नृपनीतिरनेकरूपा

असें राजनीतीचें वर्णन आहे आणि त्या राजनीतींत जे निष्णात ते यथार्थवादी, निःस्पृहपणानें खरें तें बोलणारे, या अर्थानें आप्त असणें शक्य नाहीं. नीतिविशारद आणि आप्त या शब्दांना एकत्र आणून त्यांतील भेद कालिदासानें फार चातुर्यानें, एकही अधिक शब्द खर्च न करतां, सूचित केला आहे. रघूला आप्त, योगीच मंत्री हवे होते. त्याला जग जिंकावयाचें नव्हतें; तर जेथें कसलाही धोका नाहीं असें मोक्षपद त्याला प्राप्त करून घ्यावयाचें होतें आणि म्हणून त्यानें योगिजनांच्या मंडळीशीं स्नेह केला हें युक्तच होतें. दोघांनींही आसनाचा स्वीकार केला. पण अजानें व्यवहारासन घेतलें म्हणजे राजशासनाचें कार्य तेथून चालविलें आणि प्रजेंत न्यायान्यायाकडे दृष्टि ठेविली, तर इकडे रघूनें योगशास्त्राला अनुसरून कुशासनावर बसण्याला सुरवात केली व चित्ताची एकाग्रता साधण्याचा अभ्यास आरंभिला. अजानें अनेक नृपतींना आपल्या शक्तीच्या जोरावर जिंकून आपल्या अमलाखालीं आणलें तर रघूनें समाधीच्या जोरावर शरीरांतील पंच प्राणांवर आपलें स्वामित्व गाजविलें. शत्रूंनीं केलेल्या खटपटी आणि लटपटी अजानें अगदीं सर्वत्र हाणून पाडल्या तर ज्ञानरूप अग्नीनें रघूनें आपल्या कर्मांची होळी करून टाकली. ( म्हणजे तो निष्कर्म झाला—अकर्म नव्हे—अर्थात् मोक्षाचा अधिकारी झाला. ) या ठिकाणीं भगवद्गीतेंत सांगितलेलें तत्त्वज्ञान कवीनें सूचित केलेलें आहे. साम-दाम इत्यादि राजनीतींत शत्रूंना जिंकण्याचे जे मार्ग सांगितले आहेत त्यांचा आश्रय करून—आणि तो आश्रय करतांना त्यांचें फळ काय येईल हें पूर्णपणें लक्षांत घेऊन—अज वागत होता तर रघु लोखंड आणि सुवर्ण यांना सारखेंच लेखून प्रकृतीच्या तिन्ही गुणांवर ( तमस्, रजस्, सत्व ) विजय मिळवीत होता. मनांत योजलेलें धोरण पार पडेपर्यंत सुरू केलेले प्रयत्न अज चालू ठेवीत होता आणि अशा प्रकारें तो स्थिरकर्मा म्हणजे सततोद्योगी होता तर प्रत्यक्ष परमात्मदर्शन होईपर्यंत रघूनें योगविधि म्हणजे योगसाधन अगदीं स्थिर बुद्धीनें चालू ठेविलें. याप्रमाणें एक ( अज ) शत्रूंना मागें चेपीत होता तर दुसरा ( रघु ) इंद्रियांचा निग्रह करीत होता आणि दोघांनाही जें जें पाहिजे होतें तें तें मिळालें. म्हणजे सर्व शत्रूंचा बीमोड करून अजाला जगावर निष्प्रतिबंध राज्य करण्याचा अधिकार प्राप्त झाला आणि इंद्रियनिग्रहामुळें, योगसाधनामुळें रघु मोक्षाचा अधिकारी झाला. आणि याप्रमाणें कांहीं वर्षें गेल्यानंतर आणि अजाची—आपल्या मुलग्याची—

आपण दूर जाऊं नये ही इच्छा पूर्ण केल्यावर, तो सर्वत्र समदर्शन असा रघु एके दिवशीं समाधि लावून जेथें जन्ममरण नाहीं, असें जें परब्रम्ह त्यांत विलीन झाला; सोप्या व्यावहारिक भाषेंत बोलावयाचें म्हणजे त्यानें मर्त्य शरीर टाकून दिलें. त्याच्या मरणाची हकीगत ऐकून अजाला अतिशय दुःख झालें व त्यानें पित्याचे सर्व उत्तर संस्कार यथाविधि केले. हें सांगतांना कवि म्हणतोः—

अकरोत्स तदौर्ध्वदैहिकं
पितृभक्त्या पितृकार्यकल्पवित्।
न हि तेन पथा तनुत्यज-
स्तनयावर्जितपिंडकांक्षिणः ॥ रघु० ८-२६

पित्याचे औंर्ध्वदैहिक संस्कार अजानें यथाविधि आणि यथासांग केले. एक तर त्याचें पित्यावर अतिशय प्रेम होतें, आणि दुसरें, पित्याला परलोकीं समाधान मिळावें यासाठीं त्याच्या पुत्रानें काय केलें पाहिजे हें त्याला माहित होतें. याप्रमाणें त्यानें आपलें कर्तव्य योग्य प्रकारें बजावलें. पण परलोकांतील सद्गति मिळण्यासाठीं मुलानें केलेल्या संस्काराची रघूला मात्र आवश्यकता नव्हती. त्याला उत्तम गति मिळाली व मिळालीच असती. कारण योगामार्गानें जे देहाचा त्याग करतात ते मुलानें आपणांला श्राद्ध करून पिंडप्रदान करावें मग आपणांला सद्गति मिळेल ही अपेक्षाच बाळगीत नसतात. योगमार्गानें देहत्याग झाला कीं सद्गतीच मिळावयाची. म्हणजे एकंदरींत वडिलांनीं पुढीलांची कांहींहि आशा ठेवूं नये हा मार्ग उत्तम. अर्थात् पुढीलांनीं वडिलांविषयीं आपलें कर्तव्य करावें हें योग्य आहे; पण कोणीहि आपल्या सद्गतीला दुसऱ्याच्या–मुलग्याच्यासुद्धां–कर्मावर अवलंबून ठेवूं नये; आपल्या सद्गतीची तजवीज आपणच करून ठेवावी. आपण वाटेल तसें वागून मग सद्गति मिळणार नाहीं म्हणून मुलाबाळांच्या नांवानें खडे फोडीत बसणें हा भलेपणाचा मार्ग नव्हे. असो. पिता वारल्यानंतरही अजानें राज्य उत्तम चालविलें व त्याच्या राज्यांत सर्वत्र भरभराट झाली. पृथ्वीच्या पोटांतून त्याला अगणित संपत्ति ( रत्नें वगैरे ) प्राप्त झालीं. आणि त्याच्या लाडक्या पत्नीनें म्हणजे इंदुमतीनेंही पुत्रदर्शनाचा अत्यंत आल्हाददायक आनंद त्याला दिला. अशा प्रकारें अजाचा संसार आणि अजाचें राज्य दोन्हीही कांहीं दिवस उत्तम चाललीं होतीं.

पण कधीं आकाश निरभ्र असावें तरी कधीं त्यांत ढग यावेत; कधीं सर्वत्र प्रकाशाचा लखलखाट असावा तर कधीं काळ्याकुट्ट अंधारानें सर्व दिशा भरून जाव्यात हा तर सृष्टीचा क्रम आहे. अजाच्या सुखाला आतां पारावार उरला नव्हता. सुशील पत्नीच्या सुखांत पुत्रसुखाची भर पडून त्याचा संसार कृतार्थ झाला होता. त्याचें राजकीय म्हणजे सार्वजनिक आयुष्यही अत्यंत स्पृहणीय होतें.

बलमार्तभयोपशांतये
विदुषां सत्कृतये बहु श्रुतम्।
वसु तस्य विभोर्न केवलं
गुणवत्तापि परप्रयोजना ॥ ८-३१

केवळ त्याचें धनच नव्हे तर त्याचा प्रत्येक गुण हा परोपकारासाठीं होता. त्याच्या शक्तीचा विनियोग गांजलेल्यांचें भय दूर करण्यासाठीं होई आणि तो स्वतः विद्वान् होता; त्याचा परिणाम विद्वान् लोकांचा सत्कार त्यानें फार उत्कृष्ट करावा यांत झाला. म्हणजे त्याचें सामर्थ्य दुसऱ्यावर जुलूम जबरदस्ती करण्यांत खर्च होत नसे; आणि विद्वत्तेचा उपयोग विद्वान् लोकांचें उणें-दुणें काढण्यांत होत नसे. असें सर्व कांहीं उत्तम चाललें होतें. पण असें सतत उत्तम चालणें म्हणजे या जगांतील व्यवहाराला धरून होणार नाहीं. एक दिवस त्याच्यावर मोठा भयंकर प्रसंग येऊन त्याच्या आयुष्यांतील सर्व आनंदाचा लोप झाला; त्याच्या संसाराचा अचानक शेवट होऊन सगळें जग शून्यवत् झालें. कारण विलक्षण योगायोगानें त्याची प्रिय पत्नी, सौंदर्यानें व गुणवत्तेनें अत्यंत थोर अशी इंदुमती त्याच्या डोळ्यांदेखत, त्याच्याजवळ बसली असतांना गतप्राण झाली. एक दिवस शहराजवळच्या बगीच्यांत तो आपल्या पत्नीसह मौजेनें बसला होता. त्याच वेळीं आकाशमार्गानें नारद ऋषि दक्षिणसमुद्रतीरावर असलेल्या गोकर्ण क्षेत्राकडे चालला होता. त्याच्या वीणेवर स्वर्गीय पुष्पांची माळ अडकविलेली होती. इतक्यांत मोठा वारा आला आणि जसा काय त्या माळेच्या सुगंधाचा लोभ त्याला अनावार होऊन त्यानें ती उचलली; म्हणजे सोसाट्याच्या वाऱ्यामुळें वीणेवरील ती फुलांची माळ खालीं पडली. त्या माळेचा घमघमाट इतका सुटला होता कीं त्या बगीच्यांतील फुलझाडांना बहर आला होता तरी त्यांचा वास तिच्यापुढें लोपून गेला. आणि ती फुलांची माळ—ती स्वर्गांतील पारिजातका सारख्या

अतिशय मृदु फुलांची माळ इंदुमतीच्या छातीवर येऊन पडली. त्या माळेकडे इंदुमती पहाते न पाहते तोंच ती विव्हल झाली आणि धाडदिशीं खालीं पडून गतप्राण झाली. ती तर पडलीच पण राजाचा देखील त्यामुळें तोल गेला. तिला शुद्धीवर आणण्याचे पुष्कळ उपाय केले, पण जिचे प्राणच निघून गेले होते ती कसची शुद्धीवर येणार ? आयुष्य शिल्लक असेल तरच उपाय यशस्वी होतात. आयुष्याची दोरीच तुटली तेथें कोणाचें काय चालणार ! याप्रमाणें अजाची प्रिय पत्नी एका-एकीं दिवंगत झाली.

पत्नीची ती अवस्था पाहून राजा मूर्च्छित झाला. पण वारा वगैरे घालून जवळच्या लोकांनीं त्याला शुद्धीवर आणला. पत्नीला अपाय झालेला पाहून तत्काळ मूर्छा येणारा अज राजा खरोखर मोठा पत्नीव्रत होता हें सांगावयास नकोच. त्यानें हलकेच तिला सावरून आपल्या मांडीवर घेतलें आणि जरी तो एवढा मोठा वीर होता तरी त्या प्रसंगीं त्याचा सारा धीर तुटला; त्याचा कंठ भरून आला; त्याच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले, आणि पाषाणालाही पाझर फुटेल असा शोक करण्यास त्यानें सुरवात केली.

अभितप्तमयोपि मार्दवं
भजते कैव कथा शरीरिषु ॥

लोखंड देखील खूप तापविलें म्हणजे मऊ होतें मग दुःखानें इतकें पोळून निघाल्यावर शरीर धारण करणाऱ्या माणसांच्या आंगीं मऊपणा यावा, त्यांचा घट्टपणा, त्यांचा धीर नाहींसा व्हावा यांत नवल तें काय ? अजाचा विलाप हा कालिदासाच्या करुणरसाचा अत्यंत हृदयंगम नमुना आहे;

अजविलापाचें करुणरसदृष्ट्या विवेचन पुढें कालिदासाचें काव्यसौंदर्य पाहण्यासाठीं जो भाग येणार त्यांत असल्यामुळें येथें फक्त अजाच्या पत्नीसंबंधीं व पतिपत्नी-संबंधाविषयीं कल्पना किती उदात्त आहे हें पाहून त्याच्या पुढील चरित्राकडे वळूं. तो म्हणतो "मी नांवाचा क्षितिपति आहें, पण माझें सर्व प्रेम केवळ तुझ्यावर आहे; माझें खरें अंतःकरण राज्यकारभारांत, व्यवहारांत नसून, तें तुझ्या ठिकाणींच पूर्णपणें आहे." या ठिकाणीं रामचंद्राची व अजाची म्हणजे रामचंद्राच्या आजाची तुलना करण्याचा मोह कोणालाही होईल. अजही पत्नीवियोगाच्या भयंकर प्रसंगानें कर्तव्य-च्युत झाला नाहीं, हें आपणांस पुढें दिसून येईल. पण राम व्यवहाराला अधिक

मानीत होता तर अज माझी भावनिबंधना ( खरी ) प्रीति तुझ्यावर आहे; क्षितिपति मी फक्त नांवाचा आहे, पण क्षिति ही कांहीं तुझी सवत नव्हे; माझी खरी आणि एकच पत्नी तूं आहेस असें या प्रसंगीं म्हणतो. सीता आपल्या सुप्रसिद्ध संदेशांत ( रघु. १४ ) "आतां राज्यलक्ष्मी तुझ्या घरांत आली आणि त्या सवतीनें मला बाहेर काढलें" असें रामाला स्पष्टपणें सांगते व त्यामुळेंही राम पत्नीला आपल्या राजेपणाच्या कर्तव्यापुढें "इंद्रियार्थ" लेखीत होता हें स्पष्ट आहे. आणि म्हणूनच आमच्या या महाकवीनें सीतावियोगानें रामाला झालेला शोक वर्णन न करतां अजाचा शोक एवढ्या भरदारपणानें वर्णन केला आहे काय? रामाला मुलांचें प्रेम नव्हतें असें नाहीं, पण गरोदर स्त्रीला लौकिकरक्षणासाठीं कां होईना घराबाहेर घालविण्याइतका तो निष्ठुर बनला. अज आपल्या मृत पत्नीला विचारतो—"हा आपला बाळ आतां हळूहळू मोठा होत चालला आहे. त्याला टाकून जाण्यांत तूं केवढा कठोरपणा दाखवीत आहेस?" अजाचें अंतःकरण आपल्या पत्नीकडे, आपल्या बालकाकडे गुंतलेलें होतें. राजेपणाचीं कामें तो कर्तव्य म्हणून बजावीत होता; पण त्या कामांना तो आयुष्यांत आत्यंतिक महत्त्व देत नव्हता. पत्नीच्या मृत्यूनें त्याची स्थिति किती दुर्धर झाली हें पुढील दोन श्लोकांत कवीनें स्पष्ट केलें आहे:—

धृतिरस्तमिता रतिश्च्युता
विरतं गेयमृतुर्निरुत्सवः ।
गतमाभरणप्रयोजनं
परिशून्यं शयनीयमद्य मे ॥ ८—६६

"आतां माझें सर्व धैर्य गळून गेलें; आतां प्रेमाचे सुख ही गोष्ट नाहींशी झाली; आतां गायन सर्व विरून गेलें आणि ऋतूंच्या शोभेनें आनंद होणार नाहीं अशी स्थिति प्राप्त झाली. आतां उत्तम कपड्यालत्त्यांचें किंवा अलंकारांचें कांहीं प्रयोजन उरलें नाहीं; आणि सौंदर्यानें नटविलेलें माझें शयनमंदिर आतां ओस पडलें." यावरून विवाहसुखाची त्याला केवढी आवड होती आणि कुटुंबाच्या आनंदांत तो किती गर्क होता हें स्पष्ट होतें. दुसरा श्लोक त्याची पत्नीबद्दलची कल्पना किती उदात्त आहे हें दाखवितो:—

गृहिणी सचिवः सखी मिथः
प्रियशिष्या ललिते कलाविधौ ।
करुणाविमुखेन मृत्युना
हरता त्वां वद किं न मे हृतम् ॥८–६७॥

" या निर्दय मृत्यूनें तुला नेल्यामुळें माझें सर्व कांहीं तो घेऊन गेलेला आहे. कारण तूं माझी घरकरीण तर होतीसच; पण मला सल्लामसलत देणारी मंत्री आणि एकांतांतील माझी मैत्रीण होतीस; आणि रमणीय अशा कलांच्या अभ्यासांत तूं माझी प्रियशिष्या होतीस. " या वर्णनावरूनच स्पष्ट होतें कीं इंदुमती अजाच्या कांहीं केवळ इंद्रियार्थच नव्हती. धर्मपत्नीला त्या अवमानकारक नांवानें संबोधण्याइतका अज हा, गडकऱ्यांच्या भाषेंत सांगावयाचें म्हणजे, " अस्सल हिंदु " नव्हता. पुढें अज म्हणतो कीं " माझें सर्व सुख तुझ्यावर अवलंबून आहे. " अशा प्रकारें पत्नीबद्दलचें अत्यंत प्रेम अंतःकरणांत वसणारा असा हा अज आपल्या समाजाच्या परंपरेकडे पाहिलें म्हणजे कौतुक करण्यासारखा पुरुष वाटतो; आणि त्याचें उरलेलें चरित्र तें कौतुक वृद्धिंगत करतें.

अजाचा विलाप ऐकून वृक्षसुद्धां रडूं लागले असें वर्णन कवीनें केलें आहे. त्यानंतर जवळच्या माणसांनीं इंदुमतीला त्याच्यापासून नेलें व तिचा शेवटचा संस्कार केला. त्यावेळीं राजालाही आपलें शरीर अग्नीला समर्पण करावें असें वाटलें. पण " राजा असूनसुद्धां बायकोबरोबर मेला " असें लोक दूषण देतील म्हणून त्यानें तसें केलें नाहीं. आतां जगण्यांत त्याला कांहीं आनंद वाटत नव्हता व राजेपणाचें कर्तव्य पाठीमागें नसतें तर त्यानें पत्नीबरोबर " सती " जाण्यास मागेंपुढें पाहिलें नसतें. दहा दिवस तो सुतकांत शहराबाहेरच राहिला व जेव्हां त्यानें राजधानींत प्रवेश केला तेव्हां सर्वांना तो अत्यंत निस्तेज असा दिसला. राजधानींतील स्त्रियांच्या मुखावरही अश्रूंनीं गर्दी करून सोडली होती. त्यानें देहत्याग जरी केला नाहीं तरी दुःखानें तो अगदीं विव्हल होऊन गेला होता. त्याला कांहीं सुचत नव्हतें. अशा प्रसंगीं त्याला बोध करण्यासाठीं त्याचा कुलगुरु वसिष्ठ यानें आपला शिष्य पाठविला व आतां शोक वाढविण्यांत अर्थ नाहीं, तुझें राज्य आहे तिकडे पहा, तुझा मुलगा आहे त्याला आतां दुसरें कोणी नाहीं वगैरे चार गोष्टी त्याच्याकडून राजाला कळविल्या. अशा प्रसंगीं योग्य असाच उपदेश

वशिष्ठानें केला. वशिष्ठ हा त्रिकालज्ञ होता त्यामुळें इंदुमतीला अकाल मृत्यु कां व कसा आला हें त्याला माहीत होतें. इंदुमती ही स्वर्गीय स्त्री होती. तिला एका ऋषीचा शाप होऊन भूलोकावर जन्म घ्यावा लागला होता; पण स्वर्गीय पुष्पांचें दर्शन होईपर्यंतच तुला भूलोकावर राहावें लागेल असा नंतर तिला उश्शाप मिळाला आणि म्हणूनच मृदु कुसुमांच्यामुळें तिला मृत्यु आला. ही कथा वशिष्ठ-शिष्यानें राजाला सांगितली व ती मृत्यु पावली नसून परत स्वर्गलोकीं आपल्या ठिकाणीं गेली असें सांगून त्याचें समाधान करण्याचा प्रयत्न केला. ती कांहीं रडून परत येणार नाहीं किंवा तिच्या पाठोपाठ जीव देऊनही तिची प्राप्ति होणार नाहीं कारण

परलोकजुषां स्वकर्मभि-
र्गतयो भिन्नपथा हि देहिनाम् ।

परलोकीं जातात त्यांना आपापल्या कर्माप्रमाणें निरनिराळी गति मिळते, तेव्हां अनुमरणापासूनही फळ नाहीं. ( हाच विचार बाणभट्टाच्या कादंबरींत महाश्वेता सहगमन करण्यास निघाली तेव्हां चंद्रापीड तिला चार गोष्टी सांगतो त्यांत आलेला आहे. कालिदास व बाण यांसारख्या दोन थोर ग्रंथकारांनीं सती जाण्याच्या किंवा मृताबरोबर मारून घेण्याच्या चालीचा निषेध करावा हें निःसंशय लक्षांत घेण्यासारखें आहे. ) आणि मरण हें तर प्रत्येकाच्या वाट्याला वाढून ठेवलेलेंच आहे.

मरणं प्रकृतिः शरीरिणां
विकृतिर्जीवितमुच्यते बुधैः ।
क्षणमप्यवतिष्ठते श्वसन्
यदि जंतुर्ननु लाभवानसौ ॥ ८–८७ ॥

ज्याला ज्याला शरीर आहे त्याला त्याला मरण येणार हें नक्की. हें जीवित म्हणजे विकृति आहे. एक क्षणभर जरी मनुष्य जगला तरी त्याला लाभ झाला असें म्हणावें, कारण क्षणाचासुद्धां भरंवसा नाहीं. याप्रमाणें बराच बोध करून शेवटीं त्यानें अजाला सांगितलें—" राजा, तूं असामान्य पुरुष आहेस. सामान्य माणसाप्रमाणें शोकाच्या झपाट्यानें अगदीं गळून जाणें तुला शोभत नाहीं. तूं स्वतःच्या इंद्रियवृत्तीवर नियमन करणारा म्हणजे वशी आहेस; तेव्हां शोकाच्या तावडींत सांपडून निर्बल होऊं नकोस. जर वाऱ्यामुळें झाडही हाललें आणि पर्वतही हालला

तर मग झाड आणि पर्वत यांत अंतर काय उरलें ? त्याप्रमाणें प्रसंग आला असतांना तुझ्यासारखा पुरुष जर खचला तर मग सामान्य माणसांत आणि थोर माणसांत अंतर काय उरलें ? " तो सर्व उपदेश अजानें ऐकला आणि गुरूच्या आज्ञेला त्यानें होय म्हटलें. पण त्या उपदेशामुळें त्याच्या अंतःकरणांत वसलेला तीव्र शोक कांहीं कमी झाला नाहीं. जसा कांहीं वशिष्ठाचा उपदेश शिष्य परत गेला त्याच्याबरोबर परत गेला! त्यानें उदासीन वृत्तीनें आणखी आठ वर्षें म्हणजे मुलगा मोठा होईपर्यंत आयुष्य कंठिलें. शोकाचा खिळा त्याच्या हृदयांत बसला होता व तें त्याचें दुःख कोणत्याही वैद्याला बरें करतां येणें शक्य नव्हतें. मुलगा मोठा झाल्यावर त्यानें सर्व राज्यकारभार त्याच्या हवालीं केला. पुत्रासंबंधीं आपल्या कर्तव्याला जागून पत्नीच्या वियोगानें झुरणीला लागलेला तो राजा अज शरयू आणि भागीरथीच्या संगमावर गेला आणि तेथें त्यानें देहत्याग केला. पत्नीवरच्या प्रेमाचें हें असें अपूर्व चित्र कालिदासानें काढून सध्यांच्या हिंदुसमाजाला मोठी आश्चर्यकारक देणगी दिलेली आहे असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं.

९. प्रौढ माणसें कशीं वागतात व त्यांनीं कसें वागावें, उत्कृष्ट आचरण कोणतें इत्यादि गोष्टी कालिदासानें केलेल्या वर्णनप्रकारावरून ठिकठिकाणीं ध्वनित होतात. उत्तमोत्तम माणसें वेळीं प्रसंगीं भावनावश होतात पण तीं भावनांच्या कह्यांत कधीं जात नाहींत; आणि जर तीं कदाचित् एकादे वेळीं गेलींच तर झालेली चुकी शक्य तितक्या लौकर दुरुस्त करण्याचें धैर्य त्यांचे ठिकाणीं असतें शंकर, दुष्यंत, रामचंद्र, रघु, अज हीं निरनिराळ्या प्रकारच्या माणसांचीं चित्रें आहेत. त्यांत आणखीही भर घालतां येईल. हे सर्व क्षत्रिय होते. आतां ब्राह्मणांचीं काढलेलीं चित्रें आपण पाहूं. कुमारसंभवांत शंकराचें लग्न जमविण्याबाबत सप्तर्षींनीं व अरुंधतीनें काय कामगिरी केली याचा उल्लेख पूर्वी आलेला आहे. रघुवंशाच्या पहिल्या सर्गांत वशिष्ठाची हकीकत आली आहे व नुकाच वर अज राजाला त्याच्या पत्नीच्या मरणानंतर वशिष्ठानें जो सांत्वनपर संदेश पाठविला तोही आपण पाहिला. पण या दोहोंपेक्षांही कालिदासवाङ्मयांत आपल्या डोळ्यांत भरणारा ब्राह्मण म्हणजे शाकुंतल नाटकांतील कण्व होय. वरतंतूचा शिष्य कौत्स याचें निर्लोभ वर्तन आपण मागें (**बालसृष्टि**) पाहिलें. तें पहातांना वरतंतूचेंही चित्र दिसलें. ज्याच्याकडे द्रव्य नाहीं त्याच्याकडून गुरुदक्षिणेचा स्वीकार करावयाचा नाहीं असा त्याचा निश्चय होता. विद्यासंपन्नता प्राप्त झाल्यावर एकाद्या संपन्न शिष्यानें

गुरुदक्षिणा म्हणून आग्रहानें देणें याचाच अर्थ विद्यार्थी शिकण्यास आला कीं तो लायक आहे एवढें पाहून त्यास विद्यादान करणें; विद्येचा विक्रय न करणें. ब्राह्मण हा सदाचारसंपन्न, संयमनशील, निर्लोभ, विद्वान् आणि आप्त म्हणजे खरें बोलणारा पाहिजे हें आर्यसंस्कृतीचें एक महत्त्वाचें तत्त्व होतें.

दिलीप राजा सपत्नीक वशिष्ठाश्रमांत गेला तेथें वशिष्ठाला "संयमी" आणि महर्षि अशीं विशेषणें दिलीं आहेत. आणि नंतर वशिष्ठाच्या आश्रमाचें वर्णन दिलेलें आहे. त्या वर्णनावरून ब्राम्हण कसे रहात, कोणत्या उपायांनीं उपजीविका करीत व कालक्षेप कसा करीत याची कल्पना येते. तो आश्रम ऋषींनीं भरला होता. राजा आश्रमांत संध्याकाळीं पोहोंचला होता. त्या वेळीं हे ऋषि निरनिराळ्या वनांत जाऊन समिधा, कुश (नांवाचें गवत), फळें वगैरे घेऊन आले होते. समिधा आणि कुश हे यज्ञक्रियेला लागतात. फळें अर्थात् उपजीविकेसाठीं आणलीं होतीं. ते आले तेव्हां यज्ञशाळांतील अदृश्य अशा अग्नींनीं त्यांना सामोरें जाऊन त्यांचें स्वागत केलें असेंही वर्णन आहे. म्हणजे यज्ञकर्मांत ते अत्यंत जागरूक होते असें सूचित केलें आहे. आश्रमाच्या द्वारांत कोवळ्या गवताचे घास घेण्यासाठीं हरिण गर्दी करून बसले होते. ते ऋषिपत्नीचेच बालक होते असें वाटे. म्हणजे रानांतील पशूंची काळजी हे ऋषि आपल्या मुलांप्रमाणें घेत. त्यांचे बहुतेकांचे विवाह झालेले असत, हेंही "ऋषिपत्नी" या शब्दावरून स्पष्ट होतें. झाडांना पाणी घातल्यानंतर तें पाणी पिण्यासाठीं पक्षी येत; त्यांनीं पूर्ण विश्वासानें यावें म्हणून पाणी घालणाऱ्या मुनिकन्या झाडांपासून दूर होत. मुनिकन्यांचा उल्लेख आहे तेव्हां या विवाहित ऋषींचे आश्रम मुलांबाळांनीं गजबजलेले असत हेंहि उघड आहे. आश्रमाच्या पुढें आंगणांत उन्हाळा संपल्यामुळें भातांच्या राशि करून ठेविलेल्या होत्या तेथें बसून हरिणें खुशाल रवंथ करीत होतीं. होम करण्यासाठीं अग्नि पेटविलेले होते आणि वाऱ्यामुळें त्यांचा धूर बाहेर येई व होमांत टाकलेल्या आहुतींचा वास त्यामुळें येऊन तो आश्रमाकडे येणाऱ्या अतिथींना पुनीत करीत असे. अशा प्रकारचें हें ऋषींच्या आश्रमांचें वर्णन आहे. कण्वाचा आश्रम पाहूनही दुष्यंत "शांतमिदमाश्रमपदं" असें वर्णन करतो. तेव्हां कसल्याही भानगडींत न पडतां वनांत मिळणाऱ्या फळमूलांवर व थोडीबहुत शेतीभाती करून हे ब्राह्मण ऋषि आपली उपजीविका करीत व विद्येचें अध्ययन आणि अध्यापन, होमहवन, आणि

जनकल्याणार्थ पुण्यसंचय करीत. राजा व राणी तेथें पोंचले तेव्हां वशिष्ठ संध्या-काळच्या जपहोम वगैरे कार्यांत गुंतला होता. तें आटोपल्यावर त्यांची गांठ त्यानें घेतली. ऋषि आपल्या धार्मिक कार्यांत असतांना त्यांना उपसर्ग द्यावयाचा नाहीं हा नियम राजासुद्धां पाळतो यावरून या निर्लोभ ब्राह्मणांबद्दल राजेलोकांनासुद्धां केवढा आदर असे तो स्पष्ट होतो. राजाराणींनीं गुरूच्या पायांवर डोकीं ठेवून नमस्कार केला व वसिष्ठ आणि त्याची पत्नी अरुंधती यांनीं त्यांच्या येण्याबद्दल गोड शब्दांनीं आपला आनंद व्यक्त केला. त्यांचें योग्य प्रकारें आतिथ्य ऋषीनें केलें आणि त्यांचा प्रवासाचा शीण याप्रमाणें नाहींसा झाल्या-वर ऋषीनें त्यांच्या कुशलतेची विचारपूस केली. राजाची योग्यताही कांहीं सामान्य नव्हती. वशिष्ठमुनीनें राज्याश्रममुनीला कुशल विचारलें असें कालिदास सांगतो. राज्य हा आश्रम आहे, तेथेंही व्रतस्थपणा लागतो हें समजून तदनुसार वागणारा तो राज्याश्रममुनि. राजा पराक्रमी होता. सर्व शत्रूंचा त्यानें पराजय केला होता आणि तो मोठा संपत्तिमान् ( अर्थपति ) होता. कोठें कसें बोलावें, काय बोलावें हेंही अर्थात् त्याला उत्तम अवगत होतें. त्या ऋषीपुढं त्यानें दिलेलें उत्तर लक्षांत ठेवण्यासारखें आहे. त्यावरूनही ब्राह्मण या शब्दांतील स्वारस्य प्रतीत होतें. राजा म्हणालाः— "राज्याचीं जीं सात अंगें आहेत त्या सर्वांचें कुशल आहे. कारण माझ्यावर कांहीं मानुषी किंवा दैवी आपत्ति आली तर ती नाहींशी करणारे आपण आहांत. आपण मला अस्त्रांचे मंत्र दिले आहेत त्यामुळें मी शत्रूंचा पराजय करतों आणि होमहवनादि विधि आपण उत्कृष्टपणें चालविले आहेत त्यामुळें वेळेवर भरपूर पर्जन्यवृष्टि होऊन जमिनींत पीक पाहिजे तेवढं येतें. माझ्या प्रजा शंभर शंभर वर्षेंपर्यंत जगतात; त्या निर्भय आहेत आणि कसल्याही दैवी आपत्ति त्यांच्यावर येत नाहींत; त्याला कारण आपलं अध्ययन, यजन हें आहे. आपल्यासारखा सतत काळजी वहाणारा गुरु असल्यामुळें माझी भरभराट अगदीं अविच्छिन्नपणें आहे." येथें स्वतःला निरापदः ( व्यसनरहितस्य ) म्हणजे संकटरहित असें विशेषण राजानें लावलेलें आहे व आपल्यासारख्या थोर गुरूला शोभण्यासारखा मी शिष्य आहें हें सूचित केलें आहे. वरील वर्णना-वरून अस्त्रविद्या ब्राह्मणांनीं उत्पन्न केली होती आणि बुद्धिजीवि अशा या मंडळीचें राजांना साहाय्य असे हें आपल्या लक्षांत येतें. सध्यां ज्याप्रमाणें शास्त्रज्ञ मंडळी ( Scientists ) युद्धाची निरनिराळी सामग्री उत्पन्न करतात, त्याचप्रमाणें त्या

वेळचे ब्राह्मण करीत असें दिसतें. ते केवळ होमहवन करणारे नसून मोठे शास्त्रज्ञ ( म्हणजे आधुनिक अर्थानें शास्त्रज्ञ ) होते असें स्पष्ट होतें. तेव्हां अशा प्रकारचें ज्यांचें आयुष्य आणि कर्तृत्व त्यांना समाजांत मोठा मान मिळूं लागला व त्यांचें वर्चस्व वाढलें. पण निलोंभता वगैरे ज्या गुणांमुळें हें वर्चस्व वाढलें त्या गुणांचा ऱ्हास होऊं लागल्यावर त्यांचें महत्त्व कमी होऊं लागलें व म्हणून त्यांनीं कर्तृत्वाच्या ऐवजीं जन्म हें ब्राह्मण्याचें निदर्शक ठेविलें असावें आणि त्या वेळेपासून वर्णव्यवस्थेचा खरा अर्थ-नष्ट होऊन आर्यसंस्कृतीच्या या महत्त्वाच्या अंगाचें स्वरूप विकृत झालें, धारणा करणारें असण्याचे ऐवजीं कलहोत्पादक झालें असें अनुमान करण्यास हरकत दिसत नाहीं.

आठव्या सर्गात अज राजा इंदुमतीच्या मरणामुळें अगदीं दुःखानें गळून गेला असतांना वशिष्ठांनीं त्याला सांत्वनपर संदेश पाठविल्याचा उल्लेख आला आहे. " विधि समाप्त होण्यापूर्वीच गुरूला तुझ्या दुःखाचें कारण कळलें, आणि विधि पुरा झाला नव्हता म्हणून ते स्वतः आले नाहींत; तथापि

प्रकृतौ स्थापयितुं पथश्च्युतम्

म्हणजे योग्य रस्ता चुकलेला असा तूं त्या तुला नीट रस्त्यावर आणण्यासाठीं, तुझें कर्तव्य काय आहे त्याची आठवण देण्यासाठीं मला पाठविलें आहे" असें वशिष्ठशिष्य राजाला सांगतो. म्हणजे योग्य व हितकारक उपदेश राजांना करणें हें ब्राम्हणांचें काम होतें. खुशामत करणें, तोंडदेखलें बोलून व वागून आपली तुंबडी भरणें या गोष्टी करणाऱ्याला ब्राह्मण ही संज्ञा लागत नसे. वशिष्ठांचा निरोप आल्याबरोबर राजा जरी दुःखांत बुडून गेला होता तरी त्याप्रमाणें वागला. असो; शाकुंतलांत रेखाटलेलें कण्वाच्या आश्रमाचें चित्रही अत्यंत मनोहर आहे. तेथील शार्ङ्गरवासारखे अल्पवयस्क ब्रह्मचारीसुद्धां कसे निर्भय आणि सत्यवादी असत याचें सविस्तर वर्णन पूर्वी आलेलें आहे. कण्वाची वृत्ति तर अत्यंत थोर होती. विशेषेंकरून शकुंतलेवर न रागवतां तिच्या गांधर्वविवाहाचें अभिनंदन करून तिला गोड शब्दांनीं गौरविणें हें वडीलपणाचें स्वरूप निदान शहाण्या ब्राह्मणांनीं तरी दाखविलें पाहिजे. तपोनिधि असा ब्राह्मण झाला तरी त्याच्या स्वाभाविक भावना नष्ट झालेल्या नसतात ( त्या त्यानें आपल्या कक्षांत ठेवलेल्या असतात ) याचें वर्णन चौथ्या अंकांत कालिदास अत्यंत चातुर्यानें करतो म्हणून तर तो अंक व त्यांतील

कण्वाच्या तोंडचे चार श्लोक हे जगतीतलावरील अखिल रसिकांना शिरोधार्य वाटतात.

१०. हे थोर ऋषि कसे असत याचें वर्णन कुमारसंभवांत ( सर्ग ६ ) पहावयास मिळतें. जेव्हां सप्तऋषि शंकरासाठीं पार्वतीला मागणी घालण्यास्तव हिमाचलाकडे गेले तेव्हां तो नगाधिराज म्हणतो:—

**न केवलं दरीसंस्थं भास्वतां दर्शनेन वः।**
**अंतर्गतमपास्तं मे रजसोपि परं तमः ॥६–६०॥**

आपल्यासारख्या तेजस्वी पुरुषांच्या दर्शनानें या दरीखोऱ्यांतून असलेला अंधकार तर नाहींसा झालाच, पण माझ्या अंतःकरणांतील रजोगुणाच्याही पलीकडच्या म्हणजे रजोगुणापेक्षां बलवत्तर अशा अज्ञानाचाही नाश झालेला आहे. म्हणजे हे ऋषि असे तेजस्वी आणि ज्ञानी असत. ऋषींनीं हिमाचलाला आपलें येण्याचें कारण सांगितलें व त्यांत आपला स्वार्थ कांहीं नाहीं हें स्पष्ट केलें. आपल्याकडे यांतलें श्रेय येणार तें इतकेंच कीं,

**श्रेयसामुपदेशात्तु वयमत्रांशभागिनः।**

तुला आणि शंकराला दोघांनाही श्रेयस्कर गोष्ट कोणती हें सांगण्यापुरता या कामांत आमचा भाग आहे. ब्राह्मणांचें, ऋषींचें कर्तव्य, श्रेयाचा उपदेश करण्याचें; प्रेयाचा म्हणजे केवळ गोड वाटणाऱ्या गोष्टींचा उपदेश करण्याचें नव्हे. श्रेयस् व प्रेयस् हे शब्द उपनिषदांतून आलेले आहेत. श्रेयस् म्हणजे चिरंतन कल्याण, प्रेयस् म्हणजे क्षणिक सुख किंवा त्या त्या वेळीं इष्ट वाटणारी गोष्ट, पण जिच्यांतून कल्याणप्राप्ति होणार नाहीं अशी. जे सज्जन आहेत, जे आप्त आहेत, जे ऋषि मुनि आहेत, जे ब्राह्मण आहेत त्यांनीं श्रेयाचाच उपदेश केला पाहिजे. केवळ लोकप्रियता मिळविण्यासाठीं लोकांना आवडणाऱ्या गोष्टी सांगणें आणि कल्याणकारक परंतु न आवडणाऱ्या गोष्टी न सांगणें हें ब्राह्मणांना, विद्वानांना, सज्जनांना, मुनींना शोभत नाहीं. केवळ खपेल तें लिहावें, वाचकाला कशामुळें गुदगुल्या होतील त्यानें आपलें लिखाण रंगवावें असे जे कोणी लेखक ते सज्जन लेखक नव्हेत, आप्त लेखक नव्हेत, ब्राह्मण लेखक नव्हेत. लोकांना खूष करण्याचें निःस्पृहांना, निर्लोभांना कारण नाहीं. आणि म्हणूनच ब्राह्मण हा निर्लोभ व निःस्पृह असला पाहिजे असा आर्य-

संस्कृतीचा दंडक आहे. केवळ जेथें जगाचें कल्याण होणार आहे तेथेंच खरा ब्राह्मण, ( कालिदासानें आपल्या काव्यांत वर्णन केलेला ब्राह्मण ) आपली भीड खर्च करतो. शिवपार्वतीविवाहानें जगाचें कल्याण साधणारें होतें म्हणून तें लग्न जमविण्याच्या यातायातींत सप्तऋषि पडले; आणि म्हणून ते हिमाचलाला म्हणाले—“ याचितार इमे वयम् ;” येथें आम्ही याचना करण्यास, तुला भीड घालण्यास आलों आहोंत; आम्ही असे भीड घालणारे खरोखर नाहीं. ही वृत्ति कोणीकडे आणि वाटेल तसलीं लग्नें जमवून आपली तुंबडी भरणारे आणि मध्यस्थाचा धंदा करून आपल्या नांवाला कालिमा आणणारे ब्राह्मणब्रुव कोणीकडे ! दोघांचा कांहींही संबंध लागत नाहीं.

आणखी एका थोर ऋषीचें दर्शन जातांजातां आपण घेऊं. रघुवंशाच्या चौदाव्या सर्गांत वाल्मीकीचें वर्णन आलें आहे. वाल्मीकि हा आदिकवि समजण्याची प्रथा आहे तेव्हां त्याचें वर्णन करतांना “ कवि ” ह्या अर्थपूर्ण शब्दाची योजना कालिदासानें केलेली आहे. पारध्यानें पक्ष्यांना बाण मारून त्याला दुखापत झाली हें पाहून वाल्मीकीच्या शोकाला श्लोकत्व आलें असें मोठें गौरवपर वर्णन या आद्यकवीचें आमचा कवि करतो. त्याचा लौकिक एवढा मोठा कीं सीतेनें लागलीच अश्रु पुसून त्याला नमस्कार केला व त्यानेंही लागलीच आश्वासन देऊन तिला सांगितलें कीं “ बाळ, कांहीं चिंता करूं नकोस. तूं आपल्या पित्याच्याच घरीं आली आहेस असें समज. तुझ्या पतीनें—जरी तो फार थोर पुरुष आहे —तुझ्या बाबतींत जो अन्याय केला आहे त्यामुळें माझा त्याच्यावर राग झालेला आहे. ” वाल्मीकि आपल्या तपोवनाचें वर्णन करतांना म्हणतो कीं हें तपोवन “ तपस्विसंसर्गविनीतसत्व ” आहे; म्हणजे तपस्विजनांच्या संसर्गानें येथील सर्व जनावरें, श्वापदें हिंस्र पशु हे कोणालाही इजा करीत नाहींत; तेव्हां येथें तूं निर्भयपणानें रहा. निर्भयपणा हा ऋषींच्या आश्रमाचा विशेष होता. ऋषींचें आचरण इतकें सत्वशील असे कीं वन्य पशूसुद्धां त्यांच्या संसर्गानें निरुपद्रवी होत. जेथें वन्य हिंस्र पशु निरुपद्रवी असावयाचे तेथें राहणाऱ्या ऋषींची वृत्ति किती समदर्शी, उपद्रवरहित, परोपकारशील असेल याची कल्पना करतां येणें कठीण नाहीं. रामचंद्राच्या वागण्याला दोष देण्याला वाल्मीकि बिलकुल कचरला नाहीं, ही गोष्ट त्याच्या ऋषिव्रताला शोभण्यासारखीच आहे. या आश्रमांत राहणारीं सर्वच माणसें मोठीं सुस्वभावी, परोपकारशील असत हें मुनिकन्यकांचीं जीं वर्णनें ठिक-

ठिकाणीं आलीं आहेत त्यांवरून स्पष्ट होतें. वाल्मीकीच्या आश्रमाचें वर्णनही वर दिलेल्या वशिष्ठाच्या आश्रमाच्या वर्णनाप्रमाणेंच आहे. आश्रमांत शिस्त फार कडक असे व सर्व कामें ठरल्याप्रमाणें वेळच्या वेळीं होत असत. सामान्यपणें हे विद्यानंदांत व ब्रह्मानंदांत गर्क असलेले ऋषि अर्थप्राप्तीच्या मागें लागलेल्या संसारी जनांच्या व्यवहारांत पडत नसत. पण जेथें लोकांच्या कल्याणाचा प्रश्न येई, जेथें जगावरचें एखादें संकट टाळण्याची आवश्यकता उत्पन्न होई तेथें ते साहाय्य करण्याला धावत. आपल्या निःस्पृहपणानें ते सर्वांना वंद्य झालेले असत. कण्वानें सांगितल्याप्रमाणें ते "संयमधन" असत. हीं सर्व वर्णनें केवळ ध्येयात्मक आहेत असें समजलें तरीसुद्धां बुद्धिजीवी लोकांनीं असेंच ध्येय आपल्यापुढें ठेविलें पाहिजे तरच सर्व समाजाला कल्याणप्राप्ति होते; आणि अशा ध्येयाची कल्पना करण्याला सुद्धां प्रत्यक्ष सृष्टींत यासारखे महात्मे कधीं कधीं भेटावे लागतात ही गोष्ट उघड आहे. ज्यांत वस्तुस्थितीचा संपर्कही नाहीं अशा ध्येयाची कल्पना अद्यापि कोणत्याही महाकवीला करतां आलेली नाहीं.

हीं सर्व वर्णनें करतांना वस्तुस्थितीचा विपर्यास करावा ही कवीची इच्छा नव्हती हें स्पष्ट दिसून येतें. दुष्यंताचें वर्णन करतांना कामुक पुरुषाचें आचरण कसें होतें हें कवीनें उत्कृष्ट रीतीनें वर्णन केलेलें आहे. सामान्य व असामान्य असे माणसांचे दोन भेद कल्पून ध्येयात्मकतेचीं चित्रें त्यानें असामान्य व्यक्तींना रेखाटतांना प्रकट केलेलीं आहेत. समाज योग्य तऱ्हेनें चालण्याला अशीं असामान्य माणसें लागतात. कालिदासानें वर्णन केलेल्या दिलीप राजासारखा, ज्यानें गाईचें रक्षण करण्यासाठीं स्वतःचा देह सिंहाला भक्ष्य म्हणून देण्याला मागें पुढें पाहिलें नाहीं ( रघुवंश २ ), प्रत्येक राजा होता असें शक्य नाहीं; पण दिलीपासारखा एकादा राजा झाला असला म्हणजे त्याचें उदाहरण स्फूर्ति देण्याला समर्थ असतें ही गोष्ट खोटी नाहीं. संसारांत जबाबदारी म्हणजे काय असते याची प्रचीति या दिलीपाच्या वागण्यावरून उत्तम प्रकारें येते. धेनुची सेवा कर म्हणजे तुला पुत्रप्राप्ति होईल असें वशिष्ठानें त्याला सांगितलें होतें. आणि त्या धेनूची सेवा त्यानें अगदीं मनोभावानें केली. त्या धेनूवर सिंहानें हल्ला केला व हा सिंह शंकराचा सेवक असल्यामुळें त्याच्यावर राजाचें शस्त्र चालेना तेव्हां धेनूला सोड आणि मला खाऊन आपली भूक भाग व अशी त्यानें सिंहाला विनंति केली. तेव्हां सिंह म्हणाला,

एकातपत्रं जगतः प्रभुत्वं ।
नवं वयं कांतमिदं वपुश्च ॥

सगळ्या जगावर तुझें एकछत्री राज्य आहे; तूं तरुण आहेस, तुझी शरीरसंपत्ति उत्तम आहे. तर या क्षुल्लक गाईसाठीं तूं आपला देह द्यायला तयार झाला आहेस तेव्हां तूं मूर्ख आहेस. राजानें सांगितलें कीं, बाबा, ही गाय तर क्षुल्लक नाहींच, पण पुढं तो काय म्हणाला तें पहा,

क्षतात्किल त्रायत इत्युदग्रः
क्षत्रस्य शब्दो भुवनेषु रूढः।
राज्येन किं तद्विपरीतवृत्तेः
प्राणैरुपक्रोशमलीमसैर्वा ॥

क्षतापासून म्हणजे नाशापासून रक्षण करतो तो क्षत्रिय असा त्या शब्दाचा मुख्य अर्थ आहे. त्या अर्थाला विरुद्ध वर्तन करून आणि त्यामुळें जीवन निंदास्पद झाल्यावर मग राज्याची तरी मोठी शिताफी काय ?

स्थातुं नियोक्तुर्न हि शक्यमग्रे
विनाश्य रक्ष्यं स्वयमक्षतेन ।

एखाद्यानें कोणा एकाचें रक्षण करण्याची कामगिरी आपल्यावर सोंपविली आणि आपण सुरक्षित राहून त्या व्यक्तीचा नाश झाला तर ही कामगिरी देणाराच्यापुढं त्याला आपलें तोंड दाखवितां येईल का ? आणि शिवाय

एकांतविध्वंसिषु मद्विधानां
पिंडेष्वनास्था खलु भौतिकेषु ।

हें शरीर आज ना उद्यां मरणार हें निश्चित आहे. तेव्हां माझ्यासारखे ( ज्ञाते ) त्याची पर्वा करीत नाहींत. तेव्हां तूं हें खुशाल खा आणि गाईला मुक्त कर.

राजावर तो प्रसंग आला नाहीं. कारण हें सर्व गाईनें त्याची परीक्षा पहाण्यासाठीं मायेनें उपस्थित केलें होतें. राजा त्या परीक्षेंत उतरला. कर्तव्याचें योग्य ज्ञान असणें आणि कर्तव्याच्या परीक्षेंत उतरणें यांत तर सारा पुरुषार्थ आहे. आणि त्या पुरुषार्थाची प्रत्यक्ष मूर्ति असा जो रघुवंशाचा पहिला ( कालिदासानें वर्णन केलेला ) राजा दिलीप या थोर कर्त्या पुरुषाच्या कथेचा येथें हा उल्लेख करून हा भाग आवरता घेण्यास हरकत नाहीं.

# भाग सहावा

## आर्यांचा समाज

किमत्र चित्रं यदि कामसूर्भू—
र्वृत्ते स्थितस्याधिपतेः प्रजानाम् ।
अचिंतनयीस्तु तव प्रभावो
मनीषितं द्यौरपि येन दुग्धा ॥ रघु० ५-३३

प्रजांचा अधिपति म्हणजे राजा हा जर योग्य प्रकारें राज्य चालवील तर भूमि कामधेनूसारखी होईल यांत नवल काय ? पण तुझा प्रतापच कांहीं अतर्क्य; आकाशांतूनसुद्धां तूं पाहिजे होतें तें मिळविलेंस. ( म्हणजे आकाशसुद्धां तुझ्या बाबतींत कामधेनूसारखें झालें. )

कालिदासाच्या ग्रंथांत वर्णाश्रमधर्मव्यवस्था प्रचलित असल्याचीं जागोजाग वर्णनें आहेत आणि त्या वर्णनांमुळें त्याच्या कालची समाजस्थिति तशी होती असें समजावयाचें कीं काय हा विचारणीय प्रश्न आहे. कालिदासाचा काल निश्चितपणें ठरलेला नाहीं त्यामुळें ऐतिहासिक दृष्ट्या त्याच्या ग्रंथांत वर्णन केलेली स्थिति बरोबर कोणत्या काळची होती हेंही निश्चितपणें सांगणें सोपें नाहीं. शिवाय बरोबर त्या काळीं सर्वथा अस्तित्वांत नसलेली पण त्याच्यापूर्वी फार दूर नव्हे अशा काळांत बऱ्याच प्रमाणांत अस्तित्वांत असलेली व कवीला इष्ट वाटणारी अशी समाजरचना त्यानें रेखाटलेली असण्याचाही संभव आहे. कसेंही झालें तरी कालिदासानें वर्णन केलेली समाजरचना म्हणजे वर्णाश्रमधर्मव्यवस्था ही आर्यांच्या समाजांत एकदां अस्तित्वांत होती याबद्दल दोन मतें होतील असें वाटत नाहीं. कालिदासाच्या विशेषेंकरून रघुवंश महाकाव्यांत या व्यवस्थेचें वर्णन वरचेवर आलें आहे; आणि अतिशूद्रांचा म्हणजे ज्यांना अस्पृश्य हें नांव मिळालें त्यांचा जरी उल्लेख त्याच्या ग्रंथांत ठळकपणानें मिळत नाहीं तरी शूद्राचा उल्लेख रघुवंशाच्या पंधराव्या सर्गांत स्पष्ट आहे. हा शूद्र, ब्राह्मण नसूनही, तपश्चर्या करीत होता आणि तसें करण्याचा त्याला अधिकार नसल्यामुळें त्याचें तपाचरण पापिष्ट

होतें आणि त्या पापाचा प्रजेवर परिणाम होऊन अकाल मृत्यु घडूं लागले व एका अकाल मृत्यूची तक्रार राजा रामचंद्राकडे आल्यावर त्यानें तो पापी माणूस शोधून काढून त्याला देहदंडाची शिक्षा दिली असें वर्णन या ठिकाणीं केलेलें आहे.

समाजांत जी वर्णाश्रमव्यवस्था चालू होती ती जन्मायत्त होती का कर्मायत्त होती या प्रश्नाचा बिनचूक निकाल पौराणिक आणि ऐतिहासिक संशोधनानें कधीं लागेल तेव्हां लागो; पण आधुनिक हिंदु समाजांत आश्रमव्यवस्था लुप्तप्राय झाली आहे व वर्णव्यवस्था जन्मायत्त आहे असें समजतात असें स्पष्टपणें म्हणणें हेंच सत्यास धरून होईल. कांहीं लोक केव्हां केव्हां चतुर्थाश्रम घेतात म्हणजे संन्याशी होतात. पण बालविवाहाचा फैलाव आपल्यांत अलीकडे कित्येक शतकें इतका आहे कीं प्रथम आश्रम म्हणजे ब्रह्मचर्याश्रम अस्तित्वांत नाहीं आणि तिसरा आश्रम म्हणजे वानप्रस्थाश्रम हाही अस्तित्वांत नाहीं; पुरुष वाटेल तेवढ्या उतार वयांत लग्न करूं शकतात हें त्याचें एक प्रमाण धरण्यास हरकत नाहीं; म्हणून आश्रमव्यवस्था कित्येक शतकें अस्तित्वांत नाहीं ही गोष्ट सिद्ध होते. वर्णव्यवस्था आज जन्मायत्त आहे; पूर्वी कशी होती हा एक चर्चेचा प्रश्न; पुढें राहिल्यास कशी असावी हा मताचा प्रश्न. पण आतांही आहे ती चातुर्वर्ण्यव्यवस्था नाहीं हें तर खास. वर्ण चार होते पण जाति शेंकड्यांनीं मोजतां येतील इतक्या आहेत; शिवाय जाति हा शब्दही वर्ण शब्दाहून निराळा आहे. जाति व जन्म यांतील मूळ धातु एक आहे आणि म्हणून जातिभेद हा धात्वर्थानेंसुद्धां (रूढार्थानें तर आहेच) जन्मायत्त आहे. त्यावरून असें म्हणण्याचा मोह होतो कीं वर्णव्यवस्था व वर्णभेद हीं जन्मायत्त नसावींत. अर्थात् तो मोह आवरला पाहिजे. कारण कालिदास प्रतिलोम विवाहाचा अप्रत्यक्ष उल्लेख ( असंशयं क्षत्रपरिग्रहक्षमा या शाकुंतलांतील श्लोकांत ) करतो व तशा विवाहाचा निषेध करतो. अनुलोम व प्रतिलोम विवाह या कल्पना वर्णभेदाचें जातिभेदांत म्हणजे जन्मायत्त जातिव्यवस्थेंत रूपांतर झाल्यावर येतात हें स्पष्ट आहे. म्हणून जरी कालिदासीय वाङ्मयांत जाति हा शब्द आलेला नाहीं व वर्णव्यवस्थेचाच सर्वत्र उल्लेख आहे तरी त्यावेळीं जन्मायत्त जातिभेद प्रत्यक्ष अस्तित्वांत असावा असें म्हणण्याला पुष्कळ जागा आहे. पण त्यामुळें वर्णव्यवस्था ही मूळ स्वरूपांत जन्मायत्त व्यवस्था म्हणजे जातिव्यवस्था नव्हती तर फक्त कर्मव्यवस्था होती असें जें वर अनुमान केलें आहे त्याला बाध येत नाहीं. परशुरामाच्या कथेचा रघुवंशांत उल्लेख आहे. परशुरामाचा क्षत्रियांशीं तंटा हाही जन्मायत्त जातिभेदा-

मुळें संभवतो, एरवीं संभवत नाहीं, असेंही म्हणतां येईल. या केवळ आनुमानिक चर्चेला येथें याहून अधिक स्थळ देण्याची आवश्यकता नाहीं हें उघड आहे.

तेव्हां समाजाची रचना प्रथम वर्णाश्रमव्यवस्थेला अनुसरून होती, आणि त्यांत अमुक वर्ण श्रेष्ठ किंवा कनिष्ठ हा विचार पुढें पुष्कळ काळानें शिरला असें दिसतें. ब्राह्मण आणि क्षत्रिय यांचीं वर्णनें कालिदासानें केलेलीं आहेत त्यांत एक वरिष्ठ व एक कनिष्ठ असा प्रकार आढळत नाहीं. अज राजाला गुरूनें यथाविधि अभिषेक केला; म्हणजे गुरूची कृपा त्याच्यावर उत्तम होती असें लिहितांना

पवनाग्निसमागमो ह्ययं
सहितं ब्रह्म यदस्त्रतेजसा ॥ रघु० ८–४

म्हणजे ब्राह्मण्याचें ( विद्येचें ) तेज आणि क्षत्रियांचें तेज म्हणजे अस्त्रतेज यांचा हा समागम, संयोग, पवन आणि अग्नि यांच्या संयोगासारखा आहे असें कवि सांगतो. म्हणजे या दोन शक्ति परस्परांना पूरक होत्या, विरोध करणाऱ्या नव्हत्या हें स्पष्ट होतें. आणि ही परस्परपूरकता ( हिलाच इंग्रजींत Solidarity असें नांव आहे ) ही समाजांत जेव्हां नांदते तेव्हांच समाज बलिष्ठ व सुखी असतो. परस्परपूरकतेशिवाय समाजाचें चालणार नाहीं. जन्मायत्त जातिभेदाची कल्पना दुष्ट आहे यांत शंका नाहीं; पण जन्मायत्त परिस्थितीला अधिक महत्त्व देण्याचा प्रघात जगांत सर्वत्र आहे व त्याच्या मुळाशीं मनुष्याचा जबरदस्त अहंकार आहे यांतही शंका नाहीं. मी काय तो उत्तम, बाकी कोणी कितीही चांगले असले तरी माझ्या मानानें ते सामान्य, ही भावना मनुष्यमात्रांत अत्यंत प्रबळ आहे व तिच्यांतूनच भेदाभेदाचा सारा पसारा निर्माण झाला आहे. हिंदु समाजांत त्या पसाऱ्यानें घेतलेलें विशिष्ट स्वरूप त्या समाजाला अत्यंत घातुक झालें आहे, पण त्याचें कोणतें ना कोणतें तरी स्वरूप प्रत्येक समाजांत वावरत आहे ही गोष्ट विसरून चालणार नाहीं. समाजांत फक्त एक वर्ण ठेवावयाचा ही कल्पना मोठी सुंदर आहे; ती साध्य होण्याला प्रत्येक माणसांत एकूण एक सर्व गुणांचें सन्निधान राहिलें पाहिजे. तसें तें नाहीं आणि तें उत्पन्न करणें हें मनुष्याच्या शक्तीपलिकडचें आहे. आणि म्हणूनच एकविधतेच्या अभावीं परस्परपूरकता माणसांना पतकारावी लागते. ज्या रशिया देशांत वर्णशून्यता म्हणजे एकवर्णता झाली आहे असें सांगतात तेथें देखील विचार करण्याचें, निर्णय करण्याचें, राज्य करण्याचें काम एका विशिष्ट

वर्गाकडेच आहे व या वर्गाच्या सत्तेला अणुरेणूइतका धक्का पोंचल्याचा नुसता संशय जरी आला तरी तो ज्यांच्याबद्दल आला त्यांना प्राणाला मुकावें लागतें. अशा समाजरचनेला कितीही मोठ्या आवाजानें एकवर्णी समाज म्हटलें तरी त्यावर कोणाचाही विश्वास बसणें शक्य नाहीं. जर्मनींत व इटलींत समाजावर एका विशिष्ट वर्गाची अशीच जबरदस्त सत्ता आहे व रशिया आणि जर्मनी या दोहोंतही एक विशिष्ट वर्गाच्या जबरदस्तीचें भयंकर साम्राज्य आहे. जन्मायत्त जातिभेदापेक्षां ही वर्गायत्त जबरदस्ती अत्यंत हिंस्र आणि भयप्रद आहे ही गोष्ट उघड आहे. परस्परपूरकतेची कल्पना या सर्वांहून सर्व प्रकारें सुंदर आहे व तींत जन्मायत्त अहंकाराचें विष कालविलें नाहीं तर तिच्या उत्तमपणाला बाधा होण्याचें कारण नाहीं.

ब्राह्मण आणि क्षत्रिय मिळून समाजांतील विद्यार्जन व शासन आणि रक्षण यांचें कार्य करीत. अस्त्रविद्या देखील विद्याच होती व ती शिकण्यासाठीं क्षत्रियांना ब्राह्मणाकडे जावें लागे हें वर्णन महाभारतांत आढळतें. कसेंही असलें, तरी समाजांत या दोन वर्णांत परस्परांना साहाय्य करण्याची व दोघांनीं मिळून समाजसुधारणा चालू ठेवण्याची प्रथा होती. वैश्यांचा किंवा शूद्रांचा विशेष उल्लेख म्हणजे डोळ्यांत भरण्यासारखा उल्लेख कालिदासीय वाङ्मयांत मिळत नाहीं; तथापि बाजारहाटांचे उल्लेख मिळतात व लोक संपन्न होते, सुखी होते, आरोग्यवान् होते असे उल्लेख आढळनात. गेल्या कित्येक शतकांत विशेषेंकरून गेल्या दीड शतकांत वणिग्वृत्तीचें जें नूतन स्वरूप जगभर प्रसृत झालें व ज्यामुळें "पैशा" ला अपरंपार महत्त्व आलें आहे आणि ज्या पैशाच्या अतिरिक्त लोभामुळें या नवीन जगाचा विध्वंस होणार अशीं चिन्हें दिसत आहेत त्या स्वरूपाचें अस्तित्व जुन्यापुराण्या जगांत नव्हतें. खरी संपत्ति म्हणजे मालमत्ता व हिच्या देवघेवीसाठीं कांहीं तरी सर्वांना जमेल असें साधन जुन्याही जगांत देशपरत्वें होतें. नाण्याचा उल्लेख कालिदास वरचेवर करतो. पण नाण्याला म्हणजे नाणें किंवा कागदी पैसा यांना जें अपूर्व महत्त्व चालू जगांत आहे व पैशाखेरीज कांहींही मिळणार नाहीं ही जी सध्यांच्या जगाच्या "सुधारले" पणाची मोठी निशाणी आहे ती त्या जगांत नव्हती हें खास. पुष्कळशा वस्तूंची पैदास, प्राप्ति आणि देवघेव ही ज्याला आपण अलिकडच्या काळांत अर्थशास्त्राच्या भाषेंत "पैसा" म्हणतों त्याच्या मध्यस्थीशिवाय होत असे. धनसंचय करणारे लोक होते पण त्यांच्या तत्कालीन स्वरूपांत आणि

आणि आजकालच्या धनिकांत ( Financiers ) फारच अंतर होतें. समाज हा केवळ पैशावर तर रचलेला नव्हताच पण त्यांत धनापेक्षां पराक्रम आणि विद्या यांची मान्यता अधिक होती. विद्या आणि पराक्रम हीं धनाच्या स्वाधीन नव्हतीं व केवळ धनानें प्राप्त होत नसत हा त्या काळचा विशेष दिसतो.

२. कालिदासीय वाङ्मयांत ब्राह्मणक्षत्रियांत विवाह होत नव्हते असें वरचेवर वर्णन आहे आणि त्यावरून जन्मायत्तता वर्णभेदांत शिरली होती असें अनुमान करतां येतें असें वर म्हटलें आहे. पण विद्येची मालकी फक्त ब्राह्मणांची आणि क्षत्रिय अगदीं अक्षरशून्य, विद्येसंबंधीं उदास अशी जी स्थिति पुढें केव्हां तरी झाली ती मात्र तेव्हां नव्हती. क्षत्रियांना शिक्षण ब्राह्मण देत, पण क्षत्रिय पुष्कळशा विद्या व कला यांचा अभ्यास करीत आणि प्रत्येक राजकुमाराला कित्येक वर्षें अध्ययन करावें लागे. रघुवंशांत तिसऱ्या सर्गांत रघूच्या शिक्षणाचें वर्णन आहे.

लिपेर्यथावद्ग्रहणेन वाङ्मयं
नदीमुखेनेव समुद्रमाविशत् ॥ रघु० ३–२८॥

लिपि योग्य प्रकारें शिकून, ज्याप्रमाणें नदीच्या मुखानें म्हणजे संगमानें समुद्रांत शिरतात त्याप्रमाणें त्या लिपीच्या साहाय्यानें त्यानें वाङ्मयांत प्रवेश केला. म्हणजे क्षत्रियांना वाङ्मयशिक्षण घ्यावें लागत असे; तें केवळ ब्राह्मणांनाच मिळावयाचें असें नव्हतें. निरक्षरता म्हणजे शूर पुरुषाची खूण समाजांत केव्हां उपलब्ध झाली तें निश्चित सांगतां येणें कठीण आहे. बहुधा विद्या ही पराक्रमापुढें हतबल झाली तेव्हां निरक्षरता हा शूरांचा सद्गुण ठरला असावा. पण ज्या वाङ्मयांत वर्णिलेल्या समाजाची आपण चर्चा चालविली आहे त्यांत तरी तशी परिस्थिति नव्हती. ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या त्रैवर्णिकांचे उपनयनादि संस्कार सर्वसामान्य होते हें प्रसिद्ध आहे. आणि उपनयन झाल्यावर अर्थात् ब्रह्मचर्याश्रम कांहीं काळ पाळावा लागे व त्या काळांत विद्यार्जन करावें लागे. ब्राह्मण ब्रह्मचारी कुलपतीच्या आश्रमांत राहून विद्यार्जन करीत. क्षत्रिय राजकुमारांना त्यांचे गुरु त्यांच्या राजगृहांतच बहुधा शिक्षण देत. तसाच एखादा फार थोर गुरु असला तर राजकुमारांनाही त्याच्या आश्रमांत जाऊन विद्या संपादावी लागत असे. रघूला ज्यांनीं शिक्षण दिलें त्यांचा "गुरवः" असा बहुवचनी उल्लेख केला आहे त्यावरून निरनिराळ्या विषयांत

प्रवीण असे पुष्कळ शिक्षक त्याला शिकवीत होते असें स्पष्ट होतें. हे सर्व गुरु मोठे विद्वान् होते असाही वर्णनांत निश्चित उल्लेख आहे. उपनयन त्रैवर्णिकांना सामान्य होतें, फक्त तें केव्हां करावें या बाबतींत कालविचार थोडा भिन्न भिन्न होता. मनुस्मृतींत यासंबंधीं सांगितलें आहे त्याप्रमाणें गर्भधारणेपासून आठव्या वर्षी ब्राह्मण मुलाची मुंज करावी, अकराव्या वर्षी क्षत्रियाची मुंज करावी आणि बाराव्या वर्षी वैश्याची मुंज करावी असा या बाबतींत शास्त्रार्थ होता. ब्राह्मणानंतर तीन किंवा चार वर्षांनीं क्षत्रिय किंवा वैश्य यांच्या ब्रह्मचर्याश्रमाची सुरवात करण्याचा हेतु काय असावा यासंबधीं अनुमान करतां येणें कठीण नाहीं. ब्राह्मणाला विद्यार्जनच करावयाचें असे पण क्षत्रियाला आणि वैश्याला आपापल्या परिस्थितीला अनुसरून आणखीही कांहीं गोष्टींत तयारी करावी लागावी हें साहजिक होतें व त्यामुळें त्यांच्या प्रथमाश्रमाला सुरवात थोडीशी उशीरानें होत असावी. पण जरी याप्रमाणें थोडासा भेद असला आणि जरी बऱ्याच क्षत्रियांचें शिक्षण आश्रमांत न होतां घरीं होत असलें तरी क्षत्रिय विद्यार्थ्यांच्या आंगीं जे गुण असावे लागत ते ब्राह्मणांहून कांहीं निराळे किंवा कमी नव्हते. बुद्धीच्या सर्व गुणांच्या साहाय्यानेंच रघु सर्व चौदा विद्या शिकला असें वर्णन आहे. हेही बुद्धिगुण काय होते हें लक्षांत ठेवणें उपयुक्त आहे. मल्लीनाथ आपल्या टीकेंत कामंदकाच्या आधारें त्या गुणांना स्पष्ट करतो :—

शुश्रूषा श्रवणं चैव ग्रहणं धारणं तथा ।
ऊहापोऽहोर्थविज्ञानं तत्त्वज्ञानं च धीगुणाः ॥

आणि हे सर्व गुण विद्यार्थ्यांना, मग तो ब्राह्मण असो कीं क्षत्रिय असो कीं वैश्य असो, प्राप्त होणें आवश्यक होते. शुश्रूषा म्हणजे गुरूची शुश्रूषा; म्हणजे गुरूचा योग्य मान ठेवणें व त्याची कृपा संपादन करणें. श्रवण म्हणजे गुरु सांगेल तें लक्षपूर्वक ऐकणें. सध्याच्या काळांतील वाचनाचा समावेश त्या काळच्या श्रवणांत होतो हें सांगावयास नकोच. छापण्याची कला अस्तित्वांत नसल्यामुळें गुरुमुख हा ज्ञानसंपादनाचा त्या काळचा प्रधान मार्ग होता व कित्येक गोष्टी अद्यापिही अशा आहेत कीं त्यांना गुरुमुख लागतेंच, केवळ पुस्तकें वाचून त्या समजत नाहींत. ग्रहण म्हणजे जें ऐकलें तें कळलें पाहिजे व धारण म्हणजे तें कायमचें लक्षांत राहील अशा प्रकारें आत्मसात् केलें पाहिजे. ऊहापोह म्हणजे चर्चा करण्याची शक्ति आंगीं पाहिजे;

तिच्या साहाय्यानें पूर्वपक्ष उत्तरपक्षांचा विचार करतां येऊन अर्थाचें बरोबर ज्ञान झालें पाहिजे. आणि नुसता अर्थ कळून भागत नाहीं; त्या सर्व गोष्टींचें तत्त्व काय हें पटण्याची शक्ति असली पाहिजे. पुष्कळांना तांत्रिक पद्धतीनें अर्थ कळतो पण तत्त्व कळत नाहीं. तेव्हां या सर्व गुणांना बुद्धीचे गुण म्हणतात व त्यांच्या साहाय्यानें बौद्धिक शिक्षण घेतां येतें. क्षत्रियांनाही हें बौद्धिक शिक्षण या समाजांत घ्यावें लागत असे.

याप्रमाणें बौद्धिक शिक्षण हें ब्राह्मणेतर द्विजांनाही घ्यावें लागत असे. त्यानंतर जो विशेष अभ्यास होई तो अर्थात् ज्याच्या त्याच्या संसारांतील स्थानाला व परिस्थितीला अनुसरून होत असे. वर्णाश्रमधर्मांच्या परिपालनाचें कार्य राजाकडे व परंपरेनें क्षत्रियांकडे असे. या काळीं समाजाचा शास्ता राजा होता; तो शिष्टांना मान्य होईल अशा प्रकारें बहुधा राज्यकारभार चालवी; परंतु कोणत्याही प्रकारची प्रजासत्ताक राज्यपद्धति कालिदासीय वाङ्मयांत उल्लेखिलेली नाहीं. प्रजांचें रंजन करणारा तो राजा; पण प्रजानुरंजनासाठीं त्यानें, सर्व प्रजेनें किंवा त्यांतील कित्येकांनीं निवडलेले प्रतिनिधि सल्लामसलत देण्यासाठीं बोलाविले पाहिजेत असा कांहीं प्रकार नव्हता; किंवा राजाची सत्ता कोणत्याही तांत्रिक पद्धतीनें नियंत्रित नव्हती. उत्तम राजांचीं जीं वर्णनें आलीं आहेत तीं बरींचशीं ध्येयात्मक व प्रसंगविशेषीं वास्तविक असावींत. पण अराजकता ही लोकांना पसंत नसे. जशी त्या वेळीं प्रजासत्ताक राज्यपद्धति नव्हती त्याचप्रमाणें ज्याला आपण सध्यां नोकरशाही असें नांव देतों ( Bureaucracy ) तीहि नव्हती. कदाचित् असेंही म्हणतां येईल कीं नोकरशाहीचा जन्म राजाची सत्ता नियंत्रित व्हावयास लागली व प्रातिनिधिक तत्त्व अमलांत येऊं लागलें म्हणजे होतो. प्रजेच्या सुखदुःखाला राजा सर्वस्वीं कारणीभूत धरला जात असे; व प्रजेवर जर कांहीं सुलतानी संकट आलें तर त्यापासून तिचें रक्षण करणें हें जसें राजाचें कर्तव्य असे त्याचप्रमाणें तिच्यावर कांहीं अस्मानी संकट आलें तरीही त्याची जबाबदारी राजावर असे. “ राजाच्या हातून कसलाही अपराध होत नाहीं ” आणि “ नोकरशाहींतील अमुक एक व्यक्ति अपराधी म्हणून सांगतां येणें शक्य नसतें ” हीं जीं आधुनिक नियंत्रित राज्यपद्धतीचीं किंवा सनदशीर राज्यपद्धतीचीं तत्त्वें तीं यावेळीं अस्तित्वांत नव्हतीं. राजा हा प्रजेचा पिता; त्यानें प्रजेची सर्व प्रकारें जोपासना करावयाची हा दंडक होता आणि त्याला अनुसरून त्याचा अधिकार फार मोठा समजत. त्याचें

नियमन इतकें कडक असे कीं धर्मशास्त्रानें सांगितलेल्या मार्गांचें उल्लंघन केसभर-सुद्धां कोणी करीत नसत. उलट

प्रजानामेव भूत्यर्थं स ताभ्यो बलिमग्रहीत्।
सहस्रगुणमुत्स्रष्टुमादत्ते हि रसं रविः॥ रघु० १–१८॥

प्रजेपासून जो कर राजा घेई तो प्रजेच्या कल्याणासाठीं घेई आणि हें कल्याण त्या कराच्या मानानें सहस्रपट होत असे. ज्याप्रमाणें सूर्य उदक शोषतो पण पर्जन्याच्या रूपानें तें सहस्रपटीनें देतो तसेंच राजाचें वागणें असे. प्रजेला ज्या-प्रमाणें सन्मार्गावर ठेवण्याचा त्याला अधिकार असे त्याप्रमाणें त्यांच्या पोषणाची व रक्षणाचीहि जबाबदारी त्याच्यावर असे. बेकारीसारखा अनर्थ त्या काळांत उद्भवला असता तर तो नाहींसा करण्याची संपूर्ण जबाबदारी राजाला पतकरावी लागली असती. प्रजेंत अकाल मरण झाल्यासही ती चुकी राजाची समजत.

अशा प्रकारच्या राजाला उद्देशून "ना विष्णुः पृथिवीपतिः" असे उद्गार निघालेले असले पाहिजेत. कालिदासानें एके ठिकाणीं (रघु० ५–१९) "वर्णाश्र-माणां गुरवे" असें रघुराजाला उद्देशून वर्णन केलें आहे तें राजेपणाची उपरोक्त व्याख्या लक्षांत घेतली म्हणजे यथार्थ वाटतें. "वर्णानां ब्राह्मणो गुरुः" हें वचन आपण पुष्कळ वेळां ऐकलेलें आहे, पण येथें राजाला वर्णाश्रमांचा गुरु म्हटलेलें आहे. त्याचें स्पष्टीकरण करतांना मल्लीनाथ म्हणतो—"वर्णानां ब्राह्मणादीनामाश्रमाणां ब्रह्मचर्यादीनां च गुरवे नियामकाय" म्हणजे वर्ण आणि आश्रम यांचें प्रतिपालन योग्य चाललें आहे कीं नाहीं हें पाहण्याची व तें अमलांत आणण्याची नियमनशक्ति राजाजवळ असे म्हणून त्याला वर्णाश्रमांचा गुरु असें म्हटलेलें आहे. वर्णाश्रमधर्माच्या विरुद्ध आचरण म्हणजे अलिकडच्या काळांतलें बेकायदेशीर आचरण. या आश्रमाच्या बाबतींत एक महत्वाचा शास्त्रार्थ आपण लक्षांत ठेविला पाहिजे; तो शास्त्रार्थ म्हणजे आश्रमव्यवस्था ही स्त्रियांना लागू नव्हती अशा प्रकारचा आहे. हा अर्थ संपूर्णतया घेतां येत नाहीं. कारण गृहस्थाश्रम हा स्त्रीशिवाय होत नाहीं आणि वानप्रस्थांतही पतीबरोबर पत्नी घराबाहेर पडते. तेव्हां हे दोन्ही आश्रम स्त्रीशिवाय होऊं शकत नाहींत. स्त्रियांना चतुर्थाश्रम नाहीं असा या मताचा अर्थ आहे. आणि उपनयनसंस्कारपूर्वक ब्रह्मचर्याश्रमही स्त्रियांना नसे असाही त्याचा

अर्थ होतो. अर्थात्, या सर्वच विषयासंबंधीं मतभेद आहेत व त्यांचा निर्णय लावणें किंवा त्यांत शिरणें हा येथें हेतु नाहीं. या समाजांत स्त्रियांची स्थिति काय होती याचा थोडासा उल्लेख पूर्वी केला आहे व पुढेंही थोडा विस्तारानें करावयाचा आहे. पण स्त्री ही पतींतच समाविष्ट आहे असें समजण्याचा परिपाठ असल्यामुळें स्त्रियांच्याबद्दल आश्रमाचा निराळा उल्लेख नसेल असेंही शक्य आहे. पतिपत्नी एकरूप समजण्याची प्रथा इंग्रजी कायद्यांतही आहे हें सुप्रसिद्ध आहे.

३. अशा प्रकारें हा आर्यांचा समाज वर्णाश्रमधर्मव्यवस्थेवर उभारलेला आणि एक-सत्ताक म्हणजे राजसत्ताक होता. सामान्यपणें राजसत्ता वंशपरंपरेनें चालत असे व बहुपत्नीकत्व हें या समाजांत प्रचलित असल्यामुळें कोणता मुलगा गादीवर बसावा याबद्दल राजगृहांत तंटे होत ही गोष्ट दशरथाजवळ कैकयीनें जे वर मागून घेतले होते व ज्या वरांच्या जोरावर तिनें रामाला वनवासाला पाठवून आपला मुलगा भरत याला राज्यपदाचा अधिकारी केलें त्यावरून लक्षांत येण्यासारखी आहे. पण या राजेलोकांच्या वर्णनांत एक थोडीशी चमत्कारिक गोष्ट आपल्या लक्षांत येते ती ही कीं १८५७ च्या बंडाच्या सुमाराला हिंदुस्थानांतील एतद्देशीय राजेलोकांना जसा संतानप्राप्तीच्या बाबतींत मागसलेपणा आलेला दिसतो तसाच प्रकार कालिदासीय वाङ्मयांत आपणास जे राजे भेटतात त्यांच्या बाबतींत दिसतो. यांपैकीं बहुतेक राजांचीं अंतःपुरें फार मोठीं असत आणि बहुतेकांना संतानप्राप्ति फारशी होत नसे. बहुभार्यत्व आणि असंतानत्व किंवा अल्पसंतानत्व यांचें साहचर्य असावें हें काय कोडें आहे याचा पत्ता लागणें सोपें नाहीं. कदाचित् पहिलें दुसऱ्याचें कारण असावें कीं काय अशी शंका येते. रघुवंशाची सुरवात मुळीं दिलीपराजा पुत्रप्राप्त्यर्थ तपश्चर्या करण्यासाठीं सहकुटुंब वनांत गेला येथून आहे. त्याला एकच मुलगा रघु झाला, रघूला एकच मुलगा अज झाला, अजाला एकच मुलगा दशरथ झाला; दशरथाला मात्र चार मुलगे झाले पण ते मोठ्या नवसासायासांनीं झाले. पुष्कळ दिवस त्याला मूलच होत नव्हतें व कांहीं दैवी कृपेमुळें त्याला हीं चार मुलें झालीं. फक्त रामचंद्राला मात्र नवस किंवा तपश्चर्या केल्याशिवाय दोन जुळीं मुलें झालीं आणि तो एकपत्नी होता.

शाकुंतल नाटकांतील वर्णनावरून दुष्यंताच्या अंतःपुरांत पुष्कळ राण्या होत्या, पण त्याला पुत्रप्राप्ति ही केवळ शकुंतलेपासून झाली. पुष्कळ मुलेंबाळें झालीं आहेत असा उल्लेख दशरथाला तीन पत्नींपासून चार मुलें व रामाला सीते-

पासून झालेलीं दोन जुळीं मुलें सोडून दिल्यास कालिदासीय वाङ्मयांत मिळतच नाहीं; किंबहुना पुत्रप्राप्ति ही गोष्ट मोठी अवघड, तपश्चर्येनें व देवतेच्या कृपेनें होणारी अशीच तें वाङ्मय वाचून आपली समजूत होते. आर्यांच्या समाजांत पुत्रप्राप्तीचें महत्त्व अतिशय मोठें समजत व जरी अलीकडच्या हिंदु समाजांत कन्या जन्माला आली कीं तोंड आंबट करण्याची वहिवाट पुष्कळ आहे तरी कालिदासानें कन्याप्राप्तीचें खूपच कौतुकपूर्ण वर्णन केलें आहे ( कुमारसंभव १ ). हें कदाचित् स्त्रियांसंबंधीं त्याच्या उदार दृष्टीचें फळ असण्याचाही संभव आहे. कसेंही असो, ज्या आर्यसमाजाचें आपण सध्यां येथें निरीक्षण करीत आहों त्यांत माणसांची मनोवृत्तीच पुत्रप्राप्तीबद्दल अत्यंत उत्सुक दिसते. वंश चालू राहणें, व पुत्राच्या हस्तें श्राद्धादि क्रिया यथासांग होणें याला या समाजांत फार महत्त्व होतें आणि ज्यांना श्राद्धविधि करण्याला पुत्र नाहींत त्यांना परलोकीं सद्गति मिळत नाहीं अशी सामान्य समजूत होती. स्वतःच्या उत्तम आचरणानें व योग-मार्गाच्या साहाय्यानें पुत्राकडून पिंड मिळावेत अशी आशा करण्याचें कारण रहात नाहीं व मनुष्याला स्वतःच्याच बळावर उत्तम गति मिळते, असें कवीनें

न हि तेन पथा तनुत्यज-
स्तनयावर्जितपिंडकांक्षिणः ॥ रघु० ८-२६

म्हटलें आहे, पण सामान्यपणें मृत्यूनंतर सद्गति मिळण्यासाठीं पुत्र पाहिजे ही समजूत सर्वत्र होती व संतति आवश्यक आहे असें सर्व समजत. संपत्तीप्रमाणें संततीही विपुल असणें हें भाग्याचें लक्षण समजत. पुत्रजन्माचा आनंद कांहीं विलक्षण असे. दिलीपाला मुलगा झाला त्यावेळीं ती आनंदाची वार्ता सांगणाऱ्यांना त्यानें सर्व कांहीं दिलें, फक्त आपलीं राजचिन्हें मात्र दिलीं नाहींत.

अदेयमासीत्त्रयमेव भूपतेः
शशिप्रभं छत्रमुभे च चामरे ।

छत्र आणि चामरें तेवढीं दिलीं नाहींत; का तर हीं राजचिन्हें वंशपरंपरा चालाव-याचीं असतात, त्यामुळें कोणत्याही एका राजपुरुषाला तीं देऊन टाकतां येत नाहींत. तेव्हां हा आर्यांचा समाज जसा संपत्तीची, वैभवाची इच्छा करीत असे तसाच संततीविषयीं फार उत्सुक असे. दिग्विजय करणें हें राजाचें एक महत्त्वाचें कर्तव्य समजलें जाई. अश्वमेध यज्ञांतल्या घोड्याचें निमित्त करून इतर देशावर चढाई

करावयाची हें तेव्हांचें आघाडीचें धोरण ( Forward Policy ) होतें किंवा विस्ताराची पद्धति ( Expansion ) होती. समाजांत विद्येचें अध्ययन आणि वीरवृत्ति या दोहोंचेंही उत्कृष्ट वास्तव्य होतें. गायनकला आणि चित्रकला यांजकडे विशेषेंकरून क्षत्रिय मंडळींचें लक्ष होतें. काव्य उत्तम म्हणण्याची म्हणजे काव्य-गायनाची कला वाल्मीकीसारख्या ऋषीलाही अवगत होती. चित्रकलेचा उल्लेख शाकुंतलांत आणि मालविकाग्निमित्रांत आहे. त्यावरून एकंदरींत समाजांत विद्यांचा व कलांचा उत्कर्ष होता असें म्हणण्यास हरकत नाहीं. मुख्य गोष्ट ही कीं समाजांत पराक्रमाचें अस्तित्व होतें, पराक्रमाला मान होता आणि पराक्रमहीनतेबद्दल तिरस्कार होता. मरण हें मनुष्याच्या स्वाधीन नाहीं, त्यापुढें त्याचें चालत नाहीं, असें म्हणणें म्हणजे दैववाद नाहीं. प्रयत्न करण्यालाच प्रतिकूल असणें, पराक्रमाचा लोप होणें म्हणजे दैववाद. त्याला कालिदासीय सृष्टींत मान्यता नाहीं आणि म्हणून कालिदासीय वाङ्मय कर्तृत्वाची स्फूर्ति देणारें आहे.

सामान्यपणें राजांचा लोकांशीं वागतांना व्यवहार खानदानीपणाचा दिसतो. ऋषींच्या आश्रमाजवळ जातांना तपोवनाला आपल्या सैनिकांचा किंवा परिवाराचा उपसर्ग होऊं नये म्हणून ते काळजी घेत असा उल्लेख पूर्वीं आलेलाच आहे. पण इतरांशीं वागतांनाही त्यांची चालरीत चांगली असे. मालविकाग्निमित्रांत गणदास आणि हरदत्त हे दोघे नाट्यकलानिपुण, सोप्या भाषेंत बोलावयाचे म्हणजे दोघे नाटकी, भेटावयास आले असतां राजा त्यांना काय म्हणतो पहा :—

" आपलें स्वागत असो. ( नोकराकडे दृष्टि वळवून ) यांना बसण्याला आसनें द्या. ही शिष्यांना शिकविण्याची वेळ, यावेळीं आपण दोघेही आचार्य एकदम इकडे कसे आलांत ? "

यानंतर या दोन नाट्याचार्यांत स्पर्धा लागली होती तीसंबंधीं निर्णय करण्याकरितां कौशिकी नांवाची विदुषी परिव्राजिका होती तिला आणि राणीला राजानें बोलावणें पाठविलें. तेव्हां त्या दोघी आल्या. त्यांना पाहून राजा आपला मित्र विदूषक यास म्हणतो :—

मंगलालंकृता भाति कौशिक्या यतिवेषया ।
त्रयी विग्रहवत्येव सममध्यात्मविद्यया ॥ मा० १-१४

राजपत्नी धारिणी अर्थात् मंगल अलंकार घालून आलेली होती. तिच्याबरोबर

यतिवेषांत असलेली कौशिकी (ही बुद्धधर्मानुयायी भिक्षुकिणी होती) पाहून राजा पुढील उपमा देतो; विग्रहवती म्हणजे शरीरधारिणी म्हणजे मूर्तिमती अध्यात्म-विद्याच त्रयीबरोबर म्हणजे वेदत्रयीबरोबर आली. कालिदासाच्या काळीं बुद्धधर्माचा प्रसार हिंदुस्थानांत पुष्कळ ठिकाणीं झाला होता व त्या धर्माच्या प्रचारानुरूप त्यावेळीं बऱ्याच स्त्रिया परिव्राजिका होत असत व त्या विद्यावंत असत असें दिसतें. हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें स्त्रियांना संन्यास घेतां येत नाहीं. तेव्हां परिव्राजिका ही संस्था बुद्धधर्मामुळें अस्तित्वांत आली. कौशिकी ही देवी (राणीला देवी, महादेवी म्हणत) धारिणीची मैत्रीण होती व दोघींबद्दल राजानें असें कौतुकानें व आदरानें बोलावें ही गोष्ट त्याची चालरीत चांगली होती हें स्पष्ट करते. कौशिकीला राजा नमस्कार करतो व आसनावर बसावें म्हणून तिला मोठ्या नम्रपणानें सुचवितो. राणीशींहि बोलण्या-चालण्यांत त्याची खानदानी उत्तम व्यक्त होते. मालविकाग्नि-मित्रांत राजा आणखी एक पत्नी अंतःपुरांत आणण्याच्या खटपटींत होता, तेव्हां त्याच्या या गोड गोड बोलण्याला व खानदानीच्या चालीरीतीला विशेष महत्त्व देण्यांत तात्पर्य नाहीं असें कोणी म्हणेल; पण तें बरोबर होणार नाहीं. या काळांत बहुपत्नीकत्व समाजांत मान्य गणीत. श्रीमंत व संपन्न लोकांनीं एकाहून अधिक पत्नी करणें याचा कोणालाही विषाद वाटत नसे. तेव्हां वैयक्तिक मत्सराचा किंवा असंतोषाचा भाग सोडला तर बहुपत्नीकत्वाला समाजांत कोणत्याही प्रकारें दूषण देत नसत.

शुश्रूषस्व गुरून्कुरु प्रियसखीवृत्तिं सपत्नीजने

हा कण्वाचा शकुंतलेला उपदेश आणि

सामान्यप्रतिपत्तिपूर्वकमियं दारेषु दृश्या त्वया

ही त्याची दुष्यंताला विनंति यावरून बहुपत्नीकत्वाला कोणी कमीपणा समजत नव्हते हें उघड होतें. ख्रिस्तीधर्मीयांच्या शास्त्रांतील एकपत्नीकत्वाच्या संस्थेला मान्यता देणें हें इष्ट आहे असें म्हणणें निराळें आणि त्यापासून आपणांला प्राप्त झालेल्या दृष्टीनें खिस्तशकानंतरच्या पहिल्या दुसऱ्या शतकांतील किंबहुना ख्रिस्तशका-पूर्वीच्या पहिल्या दुसऱ्या शतकांतील समाजरचनेकडे पाहून ती दूषित होती हें म्हणणें निराळें. असें म्हणणें म्हणजे भलत्या काळाला भलती दृष्टि लावणें होय. असो; तेव्हां त्या वेळचे जे राजे आपणांला कालिदासीय वाङ्मयांत मिळतात त्यांची

जाहीर वागण्याची पद्धति मूर्खपणाची व आचरटपणाची नव्हती. जरी त्या राजांची सत्ता अनियंत्रित होती तरी त्यांच्या वागण्यांत शहाणपणा व जबाबदारपणा हे गुण ठळकपणें दिसून येतात. हे गुण असणें म्हणजे आंगांत कसलाहि दुर्गुण नसणें असें अर्थांतच नव्हे; पण लोकांत वागण्याच्या पद्धतीवरूनही राज्यकारभार चालविणाऱ्यांची स्वतःला लोक काय म्हणतील इकडे दृष्टि होती असें दिसतें आणि ती दृष्टि असणें म्हणजे राज्य जरी प्रजासत्ताक नसलें तरी प्रजेबद्दल राजेलोकांत बेफिकीरी नव्हती, लोकसत्ता नव्हती तरी लोकमताचें महत्त्व होतें, असें अनुमान करतां येतें.

४. विनयाधान म्हणजे नियमन, ज्याला आपण सध्यां Law and Order म्हणतों तें ( कायद्याची अंमलबजावणी आणि समाजांतील स्वस्थता ) हें जसें राजाचें काम होतें, तसेंच भरण व रक्षण हींही त्याचीं कामें होतीं. भरण म्हणजे अन्नपानादिकांच्या साहाय्यानें पोषण, आणि रक्षण म्हणजे आपत्तींचें निवारण. यांतील भरण हा शब्द जरा लक्षांत घेण्यासारखा आहे. ब्राह्मणांनीं म्हणजे विद्वानांनीं धर्मशास्त्र तयार करावें व राजांनीं त्याचा अंमल करावा ही जशी व्यवस्था होती तशी भरणासंबंधीं काय असावी ? आधुनिक अर्थशास्त्रांत संपत्तीचें उत्पादन व तिची वांटणी असे दोन महत्त्वाचे भाग आहेत. भरण या शब्दांत संपत्तीची वांटणी या विषयाचा समावेश होतो हें उघड आहे. मग संपत्तीच्या उत्पादनासंबंधीं काय व्यवस्था होती ? वैश्य हा वर्ण त्यावेळीं कृषिवाणिज्यगोरक्षण करणारा होता व शेतकी आणि व्यापार यांचा एकत्र उल्लेख आहे त्यावरून तें औद्योगिक युग नव्हतें हें स्पष्ट दिसतें. पुष्कळांचे पैसे गोळा करून म्हणजे भांडवल उभारून पुष्कळ उत्पादन होईल असें कारखाने उभे करणें हें जें आधुनिक उत्पादन त्याचा अर्थात् त्याकाळीं मागमूस नव्हता. म्हणून संपत्तीच्या वाटणीच्या बाबतींत भांडवलवाले व तदितर ही भानगड तेव्हां अस्तित्वांत नव्हती. या बाबतींत न्याय-अन्यायाची जबाबदारी राजावर होती व वणिग्जनांचा अंमल राजकारणावर नव्हता. संपत्तीला शक्ति आणि विद्या यांच्यापुढें नमून वागावें लागे, ही त्या समाजाची विशेष खूण होती. ब्राम्हण निर्लोभ होते म्हणून ते पैशानें विकत मिळत नसत व दंडाच्या बळावर पैसेवाल्याचे पैसे हस्तगत करणें हें राजाला साध्य असल्यामुळें पैसेवाल्याचा त्याच्यावर अंमल चालत नसे. रघुराजानें कुबेराकडून संपत्ति आणण्याचें ठरवितांच त्यानें आपण होऊन त्याला सोन्याची टेकडी कशी

देऊन टाकली याचा उल्लेख वरतंतुशिष्याच्या कथाप्रसंगीं ( रघु. ५ ) पूर्वी आलेला आहे.

भरणाप्रमाणें रक्षणाची जबाबदारी पूर्णपणें राजावर असे, त्यामुळें कर्तृत्व व पराक्रम हीं राजांत असावींच लागत. एखादा राजा नादान, विदूषकी थाटाचा, बायक्या, उडाणटप्पू, मूर्ख, कर्तृत्वशून्य, भितरट, पळपुटा, केवळ चंगीभंगी, निरुद्योगी, असा झालाच तर तो राज्यभ्रष्ट होण्याला वेळ लागत नसे; तेव्हां राजेपण हें त्या काळांत सोपें नव्हतें. कालिदासीय वाङ्मयांत जीं वर्णनें आपण वाचतों तीं जरी कवीनें केलेलीं आहेत, म्हणजे त्यांत जरी थोडीबहुत अतिशयोक्ति असण्याचा संभव आहे, तरी उत्तम राजांच्या वर्णनाच्या बाबतींत तीं बरींचशीं वास्तविक आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. " Uneasy lies the head that wears a crown ( मुकुट धारण करणाऱ्या मस्तकाला सुख नाहीं,)" हें आंग्लकवि शेक्सपीयरचें वाक्य या दोन हजार वर्षांपूर्वीच्या वाङ्मयांतही आपण वाचतों.

राज्ञां तु चरितार्थता दुःखोत्तरैव ॥ शा० ५

हें वाक्य या बाबतींत लक्षांत ठेवण्यासारखें आहे. राज्य करणें कसें श्रम उत्पन्न करणारें आहे याचें वर्णन, दुष्यंत पुढीलप्रमाणें करतो :—

औत्सुक्यमात्रमवसाययति प्रतिष्ठा
क्लिश्नाति लब्धपरिपालनवृत्तिरेव ।
नातिश्रमापनयनाय यथा श्रमाय
राज्यं स्वहस्तधृतदंडमिवातपत्रम् ॥ अ. शा. ५–६.

एखादी इच्छित वस्तु प्राप्त झाली कीं ती प्राप्त होणार या भावी आनंदाच्या कल्पनेनें जें सुख होतें तें नाहींसें होतें. जें मिळविलें आहे किंवा जिंकलें आहे त्याचें रक्षण करण्याचें कार्य इतकें बिकट आहे कीं त्यामुळें पुष्कळ क्लेश होतात. आणि याप्रमाणें या राज्यपदामुळें जसे श्रम होतात तसा श्रमपरिहार होत नाहीं (म्हणजे यांत सुखापेक्षां दुःख अधिक आहे ); ज्याप्रमाणें छत्री स्वतः हातांत धरली म्हणजे उन्हाचा त्रास कमी होऊन सुख व्हावें त्यापेक्षां तें ओझें हातांत धरण्याची कटकटच अधिक होते. ही उपमा अर्थात् जुन्या काळच्या ओबडधोबड छत्रीला अनुलक्षून आहे. सध्यांच्या काळींसुद्धां, जरी छत्र्या फार हलक्या मिळूं शकतात, तरी त्यांना हातांत वागवणें ही गोष्ट पुष्कळांना त्रासदायक वाटते. आणि छत्री

जड असो किंवा हलकी असो, तिचें ओझें होवो किंवा न होवो, एक हात अडून राहातो ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं. आतां राज्यपद हें चांगल्या राजालाच श्रमदायक होतें; जो कर्तव्यशून्य राजा आहे तो चार दिवस मजा मारील व पुढें नष्ट होईल किंवा अप्रतिष्ठेनें राहील. पण अशांचा येथें विचार करण्याचें कारण नाहीं. कोणत्या प्रकारच्या राजाला राज्यपद श्रमदायक वाटतें त्याचें वर्णन या शाकुंतल नाटकांत याच अंकांत भाट जेव्हां राजाची स्तुति करतात तेव्हां आपण वाचतों. ते दोन्ही श्लोक येथें आपण उद्धृत करून घेणें इष्ट होईल. पहिला श्लोक पहा :

स्वसुखनिरभिलाषः खिद्यसे लोकहेतोः
प्रतिदिनमथवा ते वृत्तिरेवंविधैव ।
अनुभवति हि मूर्ध्ना पादपस्तीव्रमुष्णम्
शमयति परितापं छायया संश्रितानाम् ॥

वृक्ष आपल्या डोक्यानें कडक ऊन्ह सोसतो, पण जे आश्रयाला आलेले आहेत त्यांना सांवली देऊन त्यांना होणारा उकाडा नाहींसा करतो. त्याप्रमाणें राजाची प्रत्येक दिवशींच्या वागण्यांत वृत्ति असते. कारण त्याला स्वतःच्या सुखाचा अभिलाष नसतो आणि तो केवळ लोकांना सुख मिळावें यासाठीं त्रास घेत असतो.

अशा वर्णनाला योग्य राजा असेल तर त्याबद्दल कोण तक्रार करील ? दुर्दैवानें मनुष्यजातीला पुष्कळ वेळां भेटणारे राजे अगदीं याच्या उलट असतात; आणि ते तसे झाले म्हणून या राजसंस्थेबद्दल तिरस्कार व द्वेष उत्पन्न होऊन समाजनियमनाचे दुसरे प्रकार उद्भवले हें उघड आहे.

आतां दुसरा श्लोक पहा :—

नियमयसि विमार्गप्रस्थितानात्तदंडः
प्रशमयसि विवादं कल्पसे रक्षणाय ।
अतनुषु विभवेषु ज्ञातयः संतु नाम
त्वयि तु परिसमाप्तं बंधुकृत्यं प्रजानाम् ॥

तूं जो हातांत दंड धारण केलेला आहेस ( शिक्षा करण्याचें साधन ) त्यायोगानें जे भलत्या मार्गावर जाण्यास निघाले आहेत त्यांना ताळ्यावर आणतोस; कोठें

तंटेबखेडे झाले तर ते मिटवून टाकतोस आणि लोकांच्या सुरक्षिततेची सर्व व्यवस्था करतोस. जेव्हां ( किंवा ज्यांना ) जवळ पुष्कळ संपत्ति असते त्यांच्या-भोंवतीं आप्तेष्ट पुष्कळ जमतात; परंतु तूं मात्र प्रजाजनांतील प्रत्येकाचा ( मग तो गरीब असो कीं श्रीमंत असो ) खरा बंधु आहेस; कारण श्रीमंताचा कैवार घेणारे पुष्कळ भेटतात, पण दीनदुबळ्यांचाहीं परामर्श घेणारा तूं आहेस. तेव्हां तुझ्या वर्तनांत बंधुकृत्य म्हणजे आप्तपणा पूर्णतेला पोहोंचलेला आहे.

ही स्तुति ऐकून आपल्याला बरें वाटलें व नवी हुषारी आली असें राजानेंच येथें म्हटलेलें आहे. तेव्हां राजदंड हें केवळ चैनीचें, दुसऱ्यावर जुलूम करण्याचें, साधन नव्हे ही गोष्ट त्या काळच्या राजांच्या मनावर पक्की बिंबलेली असे.

राजाची एकतंत्री सत्ता व्यवस्थितपणें चालण्याला अशा प्रकारच्या गुणसंपदेची आवश्यकता असावी यांत नवल नाहीं. राजाचे अमात्य निरनिराळ्या राज्यतंत्र-विभागाची व्यवस्था पहात व अमात्यांची सल्लामसलत राजेलोक घेत; त्याचप्रमाणें विद्वान् अशा थोर माणसांचीही घेत. राजाला " वर्णाश्रमाणां गुरु " म्हणणारा कालिदास केवळ ब्राह्मणांची प्रतिष्ठा वाढविण्यासाठीं कांहींही लिहीत नाहीं हें उघड आहे, किंबहुना ब्राह्मणक्षत्रियांचें ऐक्य हेंच आर्यांच्या समाजाचें धनत्तर बळ होतें हें तो स्पष्ट करतो. कालिदासाच्या लिहिण्यांत जातिविशिष्ट दृष्टि अशी मुळींच नाहीं आणि म्हणून कोणत्याही एका वर्गाचें स्तोम त्यानें कोठेंही माजवि-लेलें आपणांस दिसून येत नाहीं. अर्थात् उत्तमांना उत्तम म्हणणें आणि सामान्यांना सामान्य म्हणणें हें वस्तुकथन आहे, सामान्यपदानें उल्लेखिल्या जाणाऱ्या बहुसंख्येचा त्यांत अनादर नाहीं ही गोष्टही पटण्याइतकी ज्यांच्याजवळ प्रसन्न मनोवृत्ति नाहीं त्यांची या बाबतींत कोणी खातरी पटवून देईल हें शक्य नाहीं. बुद्धिवंत आणि बळवंत यांचें ऐक्य आणि दोघांतही सदाचरणाचें म्हणजे धर्माचरणाचें प्राबल्य यानें समाजाला नुसतें स्थैर्य येतें एवढेंच नव्हे तर प्रगमन-शीलत्वही येतें. बलिष्ठांना सदाचरणी विद्यावताबद्दल आदर आणि विद्वानांना सदाचरणी बलिष्ठांबद्दल कौतुक हें या काळच्या समाजजीवनाचें मुख्य प्रतीक दिसतें. या काळचे ब्राह्मण कसे असत याचा ऊहापोह पूर्वी झालेला आहे, तेव्हां त्याची द्विरुक्ति करण्याचें कारण नाहीं. ब्राह्मण विद्याध्ययनांत, तपश्चर्येंत, सदा-चरणांत काळ घालवीत. ते निर्लोभ असत; धनसंचय वगैरे वणिग्वृत्ति त्यांच्या ठिकाणीं नसे. शहराजवळच्या पण जनसंमर्दापासून दूर अशा वनांतून ते रहात

व तेथें थोडीफार शेतीभाती करून आणि दुभतीं जनावरें बाळगून ते आपली उपजीविका करीत व कोणाच्या भानगडींत न पडतां ते आपले धर्म संपादीत. त्यांना कोणाचाही उपसर्ग पोंचूं नये असा बंदोबस्त राजेलोक करीत. त्यांच्याकडून कर घेत नसत पण त्यांचें पुण्यकर्माचरण हीच त्यांची राज्याला मोठी देणगी असे व म्हणून त्यांच्या रक्षणाची जबाबदारी राजावर असे. वर्णाश्रमधर्म प्रतिपालनांत वानप्रस्थ व संन्यास घेतलेल्यांचें रक्षण करण्याचीही जबाबदारी राजावर येत असे. सीता वनांत गेली तेव्हां मी वनवासाचा आश्रय घेतला, तपस्विनी झालें, तेव्हां माझ्या रक्षणाची जबाबदारी तुझ्यावर असें ती रामाला पाठविलेल्या आपल्या संदेशांत म्हणते. स्त्रीनें एकटीनें तपस्विनी होणें याला हिंदुधर्मशास्त्रांत आधार दिसत नाहीं; पण कालिदासाचा काळ बुद्धोत्तर होता; त्यामुळें त्यांतील कांहीं कल्पना कालिदासीय वाङ्मयांत शिराव्यात यांत नवल नाहीं. तपश्चर्या करणाऱ्या सर्वांचें रक्षण करणें हें राजाचें कर्तव्य आहे हा सीतेच्या म्हणण्याचा अर्थ आहे.

५. हा समाज वर्णाश्रमधर्म पाळणारा असल्यामुळें तो त्या धर्माप्रमाणें कर्मप्रधान होता; वैदिक कर्ममार्गाचा आदर करणारा होता असें दिसतें. जरी बुद्धधर्माचा प्रसार कालिदासाच्या वेळीं झाला असला पाहिजे तरी त्या धर्मांतील तत्त्वांचा परिणाम त्याच्या वाङ्मयावर झालेला बहुतकरून आढळत नाहीं. ब्राह्मण आपलीं नित्य नैमित्तिक कर्में नियमितपणानें करीत असे उल्लेख आहेत व क्षत्रिय राजे यज्ञक्रिया वरचेवर व यथासांग करीत. यज्ञयागांच्या निमित्तानें राजाला ज्याप्रमाणें वैभव संपादन करण्याची ( उदाहरणार्थ, अश्वमेधयज्ञाच्या साधनानें ) संधि मिळे त्याचप्रमाणें देशांतील व बाहेरील विद्वानांना व ऋषींनाहि आपल्या घरीं बोलवण्याची संधि मिळे आणि हे यज्ञयाग म्हणजे केवळ पशुहत्येचीं स्थानें नसून विद्वत्परिषदांचींही स्थानें होतीं. जैनांचा महावीर आणि बुद्धधर्माचा प्रणेता शाक्य गौतम, हे दोघेही ख्रिस्ती शकापूर्वी सहाव्या शतकांत होऊन गेले. अहिंसातत्त्वाचें श्रेय वास्तविक यांपैकीं कोणास द्यावयाचें हा प्रश्न निश्चितपणें सुटला आहे असें म्हणतां येत नाहीं. बुद्धानें वैदिक कर्मकांडाचा त्याग केला एवढ्याच अर्थानें म्हणजे यज्ञयागांचा त्याग केला म्हणून त्यांत होणारी पशुहत्या त्यानें टाळली या अर्थानें त्याला अहिंसेचा पक्षपाती म्हणतां येईल; पण अहिंसेचें अतिरिक्त स्वरूप जैनधर्मांत प्रकट झालें असें म्हणणेंच योग्य होईल. वैदिक धर्मांत अहिंसा म्हणजे पशुहत्यानिवृत्ति ही होती असें मुळींच म्हणतां येत नाहीं; म्हणून जेथें अन्नासाठीं

पशुहत्या होत होती अशा समाजावर यज्ञयागांत पशुहत्या होत असे म्हणूनच हिंसेचा आरोप करणें बरेंचसें धाष्टर्यमूलक आहे असें म्हणावें लागतें. आतां वैदिक धर्मांत नसलेली अहिंसा हिंदुधर्मांत सुरवातीपासून आहे असें म्हणण्याचा अट्टाहास जे करतात त्यांनीं पुन: वैदिक कर्मकांडाचें स्तोम माजविणें हा प्रकार खरो-खर चमत्कारिक आणि विसंगत आहे याबद्दल मात्र शंका नाहीं. तंत्र हें प्रत्येक धर्मांत असतेंच; प्रथम हें तंत्र प्रतीकनिदर्शक असतें. पुढें त्याला तांत्रिकपणाचें स्वरूप येतें. त्याबद्दल एखाद्या विशिष्ट धर्माला दुसऱ्या धर्माच्या अनुयायांनीं किंवा अभि-मान्यांनीं हंसणें हें थोडेंसें विलक्षण आहे. कालिदास ज्या समाजाचें वर्णन करतो त्यांत कर्मतंत्र होतें; व विशेषेंकरून द्विज म्हणविणाऱ्या वर्गांतच तें विशेष होतें किंबहुना कर्माधिकार हें द्विजत्वाचें चिन्ह होतें. उपनयनादि सर्व संस्कारांचीं वर्णनें कालिदासांत आलेलीं आहेत; त्याप्रमाणें संध्यावंदनादि नित्य कर्मांचेही उल्लेख आहेत. सकाळ, दुपार, संध्याकाळ अशा तिन्ही वेळेला निरनिराळे विधि म्हणजे अनुष्ठानें सांगितलेलीं होतीं व ब्राह्मण तीं अनुष्ठानें यथाशास्त्र करीत.

विधेः सायंतनस्यांते स ददर्श तपोनिधिम्

असें रघुवंशांत ( १·५६ ) म्हटलें आहे. म्हणजे वशिष्ठाचा संध्याकाळचा विधि आटोपल्यानंतर दिलीप राजानें त्याचें दर्शन घेतलें. विधि चालू असतांना उपसर्ग करावयाचा नाहीं हा नियम होता. आणि दर्शन घ्यावयाचें, भेट घ्यावयाची, म्हणजे नमस्कार करावयाचा. पण कांहीं वेळेला द्विजाला नमस्कार करणें म्हणजे त्याला उपसर्ग देणें आहे. यासंबंधीं शास्त्रार्थ मल्लीनाथानें उद्धृत केला आहे—

समित्पुष्पकुशाग्न्यंबुमृदन्नाक्षतपाणिकः ।
जपं होमं च कुर्वाणो नाभिवाद्यो द्विजो भवेत् ॥

ज्याच्या हातांत समिधा, फुलें, कुश ( दर्भ ), अग्नि, पाणी, माती किंवा अन्न आहे किंवा जो जप अथवा होम करीत आहे अशा ब्राह्मणाला नमस्कार करा-वयाचा नसतो. म्हणजे त्यामुळें तो नमस्काराला अपात्र होतो असें समजावयाचें नाहीं, तर अशा वेळीं त्याला नमस्कार करणें म्हणजे त्याला त्रास देण्यासारखें आहे म्हणून तो करावयाचा नाहीं. या बहुतेक विधींत स्त्रिया पतीजवळ बसत. निदान कालिदास तसें वर्णन करतो. दिलीपानें वशिष्ठाचें दर्शन घेतलें तेव्हां अरुंधती त्याजवळ होती असें म्हणून सायंतन अनुष्ठानाच्या वेळींही ती त्याजवळ बसली

होती असें कवीनें दर्शविलें आहे. स्त्रियांना शास्त्राप्रमाणें आश्रमधर्म लागू नव्हता. स्त्रियांना कर्माधिकार होता कीं काय ही शंका कालिदासाच्या वर्णनावरून येते. या ठिकाणीं अरुंधती ऋषीजवळ होती एवढेंच वर्णन आहे. मल्लीनाथ म्हणतोः—

**अन्वासनं चात्र पतिव्रताधर्मत्वेनोक्तं न तु कर्मांगत्वेन**

म्हणजे पतिव्रताधर्माप्रमाणें पत्नीनें पतीला त्याच्या प्रत्येक कृत्यांत साहाय्य करावें या तत्त्वाला अनुसरून अरुंधती तेथें वशिष्ठाजवळ बसली होती; पण त्यावेळीं कसलेंही यज्ञकर्म वगैरे चाललेलें नव्हतें. कालिदास वर्णन करतो त्या समाजांत स्त्रियांना अधिक योग्यता देत किंवा खुद्द कालिदास स्त्रियांना अधिक योग्यता देतो असें त्याच्या वर्णनावरून म्हणावें लागतें. अनुष्ठानांत, यज्ञ कर्मांत स्त्रिया पतीजवळ बसत व गृहस्थाश्रमाचीं कर्में यथासांग होण्यास स्त्री जवळ असावी लागते.

यज्ञयागादिकांचा प्रचार होता म्हणजे स्वर्गलोक वगैरे गोष्टींवर समाजाचा विश्वास होता. त्याबरोबरच कर्म, पुनर्जन्म वगैरे गोष्टींवरही विश्वास होता असें दिसतें. जग हें मायिक असल्याचा उल्लेख कोठें मिळत नाहीं, पण जग नश्वर आहे अशासारखे पुष्कळ उल्लेख आहेत. आपल्या तत्त्वज्ञानांत मायावादाला विशेष स्थान देणारे शंकराचार्य हे इसवी सनाच्या आठव्या शतकांत उदयाला आले तेव्हां त्यांचा काळ कालिदासानंतर कित्येक शतकांनीं येतो. त्यामुळें त्यांच्या तत्त्वज्ञानांत ज्या विचारांना विशेष प्राधान्य मिळालें त्यांचा उल्लेख कालिदासाला करतां येणें शक्यच नव्हतें. तथापि हें शरीर नश्वर, हें जगत् नश्वर या कल्पना आर्यलोकांत फार पुरातन काळापासून आहेत व त्यांचा उल्लेख कालिदासांत ठिकठिकाणीं मिळतो.

**एकांतविध्वंसिषु मद्विधानां**
**पिंडेष्वनास्था खलु भौतिकेषु ॥ रघु० २.॥**

असें दिलीप राजा सांगतो. इंदुमतीचा मृत्यु झाल्यानंतर

**परलोकजुषां स्वकर्मभिर्गतयो भिन्नपथा हि देहिनाम् ।**

असें सांगितलें आहे. मृत्यूनंतर जीवांना कर्माप्रमाणें निरनिराळी गति मिळते. प्राण्यांची प्रकृतीच मरण आहे असेंही तेथेंच पुढें सांगितलें आहे. स्वर्गलोक इत्यादि

गोष्टीसुद्धां विनाशधर्म आहेत म्हणजे त्यांत शाश्वतता नाहीं म्हणून त्या विषया-संबंधींसुद्धां रघुराजा निःस्पृह झाला असें वर्णन आहे आणि तो जेव्हां मरण पावला तेव्हां

तमसः परमापदव्ययं पुरुषं योगसमाधिना रघुः ।

असें सांगितलें आहे. तमसः परं, तमाच्या, अज्ञानाच्या पलिकडच्या अव्यय पुरुषाची म्हणजे परमात्म्याची प्राप्ति त्याला झाली, याचा अर्थ सांगतांना तमसः परं म्हणजे मायातीतं असें मल्लीनाथ म्हणतो. अज्ञानालाच माया हें नांव विशिष्ट अर्थानें शंकराचार्यांनीं दिलें व मल्लीनाथ हा त्यांच्यानंतरचा असल्यामुळें त्याला त्या काळीं सुप्रसिद्ध असलेला तो शब्द आठवला. कालिदासाच्या काळीं मांया शब्दाचा प्रचार झालेला नव्हता.

राजेलोक अनेक यज्ञयाग करीत; त्यांत अश्वमेधाला प्राधान्य होतें. कारण हा यज्ञ अलीकडच्या भाषेंत बोलावयाचें झाल्यास पूर्ण राजकीय स्वरूपाचा होता. या यज्ञाच्या निमित्तानें जगभर स्वारी करण्याला व दुसरे देश जिंकण्याला कारण मिळे. तेव्हां अश्वमेधाचें अस्तित्व म्हणजे आक्रमणाच्या किंवा चढाईच्या धोरणाचें अस्तित्व होय. म्हणजे या समाजांत आक्रमणाची इच्छा होती. तो थंडावलेला नव्हता. बुद्धधर्माचा परिणाम ही आक्रमणशीलता घालविण्यांत झाला कीं काय अशी शंका येते. शंभर अश्वमेधांनीं स्वर्गाचें राज्य मिळतें अशी समजूत होती व शंभराव्या यज्ञाच्या वेळीं स्वर्गाचा अधिपति इंद्र हा कांहींना कांहीं तरी विघ्न उपस्थित करून तो हाणून पाडीत असे असें दिसतें. प्रत्येक राजाचा एक कुलोपाध्याय म्हणून कोणीतरी विद्वान् ब्राह्मण असे व या उपाध्यायाला बरेंच महत्त्व होतें हें स्पष्ट आहे. कण्व, वाल्मीकि वगैरेंच्या आश्रमांचे उल्लेख आले आहेत त्यांवरून हे कुलपति होते व तेथें विद्यार्थी अध्ययनासाठीं जात असें दिसतें. वरतंतु हाही मोठा कुलपति असावा असें दिसतें. यावरून तेव्हांचें उच्च शिक्षण या कुलपतींच्या आश्रमांत होत होतें हें स्पष्ट दिसतें. शाळा काढणें हें राजाच्या कर्तव्यांत येत होतें असें दिसत नाहीं. तथापि प्रत्येक द्विजाला उपनयनानंतर कांहीं तरी शिक्षण अवश्य मिळत असे व कौत्सासारखे कित्येक विद्यार्थी चौदा विद्यांचें संपूर्ण अध्ययन करीत हें उघड आहे. स्त्रियांना वाचतां येई व गायन, नृत्य, चित्र व नाट्य या कला त्यांना, निदान त्यांपैकीं कित्येकांना, शिकवीत व राजघराण्यांतील स्त्रियांनाही या कला अवगत होत्या. अज इंदुमतीचें वर्णन करतांना

प्रियशिष्या ललिते कलाविधौ ।

असें म्हणतो त्यावरून पुरुषही कलांचें अध्ययन करीत हें स्पष्ट होतें. गणदास हरदत्त या नाट्यकलाकोविदांना "आचार्य" असें म्हटलें आहे. तेव्हां नाटकाच्या धंद्याला प्रतिष्ठितपणा होता असें अनुमान करण्यास हरकत नाहीं. आतां कालिदास हा स्वतः नाटकें लिहिणारा, मग नाटकें करणाऱ्यांची अवहेलना तो कशी करील हा प्रश्न निघणार नाहीं असें नाहीं. पण अलीकडचे नाटककार नाटक्यांची चेष्टा करीत नाहींत असें नाहीं. तशी चेष्टा कालिदासाच्या नाटकांत कोठेंही केलेली नाहीं. उलट मालविकाग्निमित्रांत नाट्यकलेचें खूप गौरव केलें आहे.

देवानामिदमामनंति मुनयः शांतं क्रतुं चाक्षुषं
रुद्रेणेदमुमाकृतव्यतिकरे स्वांगे विभक्तं द्विधा ।
त्रैगुण्योद्भवमत्र लोकचरितं नानारसं दृश्यते
नाट्यं भिन्नरुचेर्जनस्य बहुधाप्येकं समाराधनम् ॥

या वर्णनावरून नाट्यकला त्यावेळीं लोकांची आवडती होती असें स्पष्ट दिसतें. तेव्हां कलेची अभिरुचि त्या काळच्या समाजांत होती असें म्हणण्यास हरकत नाहीं. सौंदर्याबद्दल मत्सर आणि कलेबद्दल द्वेष या गोष्टी हिंदु समाजांत पुढें कित्येक शतकांनीं शिरल्या; पण कालिदासीय वाङ्मयांत या दुर्गुणांना थारा नाहीं व म्हणून तत्कालीन समाजांतही तो नसावा.

६. या समाजांत स्त्रियांची स्थिति काय होती? संततीचें कौतुक फार होतें हें वर सांगितलेलें आहे. स्त्रियांच्याबद्दल कालिदासाची दृष्टि फार उदार होती याबद्दल विवेचन तिसऱ्या भागांत केलेलें आहे. पण कवीची उदार दृष्टि म्हणजे कांहीं समाजाची दृष्टि असें निश्चितपणें समजण्याचें कारण नाहीं. गृहस्थाश्रम पत्नीमुळें साध्य होतो आणि म्हणून

क्रियाणां खलु धर्म्याणां सत्पत्न्यो मूलकारणम् । कुमारसंभव, ६-१२

असें म्हटलेलें आहे. या बाबतींत प्रथम हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं या समाजांत बहुपत्नीत्व रूढ होतें. याचा अर्थ प्रत्येक पुरुषाला अनेक स्त्रिया होत्या असा नव्हे. पण अनेक स्त्रिया असण्यांत कसलेंही पाप समजत नसत. त्याचप्रमाणें या समाजांत स्वयंवर नांवाची विवाहाची पद्धति होती. स्वयंवर म्हणजे मुलीनें नवरा स्वतः पसंत करावयाचा. आतां बहुभार्यकत्व आणि स्वयंवर यांचा मेळ बसत नाहीं

असें म्हणणें अन्यायाचें होणार नाहीं. या बाबतींत आधुनिक सुधारकांचे अग्रणी गोपाळ गणेश आगरकर पुढीलप्रमाणें लिहितातः—

" ज्या देशांत किंवा जातींत खऱ्या स्वयंवराची किंवा संमतिपूर्वक विवाहाची चाल आहे किंवा होती असें म्हणतां येईल, त्या देशांत किंवा त्या जातींत बहु-भार्यत्वाची चाल असण्याचा संभव नाहीं. तरुण वधूस संमत असेल तो वर वर-ण्याची परवानगी असेल तर जो पांचचार बायका आधींच करून बसला आहे, व सहावीचें पाणिग्रहण करूं पहात आहे अशास ती कधींही वरणार नाहीं हें स्पष्ट आहे. बहुभर्तृत्व आणि बहुभार्यत्व या विवाहपद्धति ज्या देशांत बायका चोरून आणण्याचा किंवा विकत घेण्याचा प्रघात असतो त्यांत विशेष दृष्टीस पडतात. संमतितत्त्वास अनुसरून विवाह होऊं लागले म्हणजे एकपत्नीकत्वच स्थापन झालें पाहिजे. बहुभर्तृत्व आणि बहुभार्यत्व हीं स्त्रियांच्या निकृष्ट अवस्थेचीं व त्यांवर होत असलेल्या बलात्काराचीं उत्तम निदर्शक आहेत. "

[ संपूर्ण आगरकर—निबंधसंग्रह; भाग पहिला, पृष्ठ ४२ ].

कालिदासीय वाङ्मयांत बहुभर्तृकत्वाचा उल्लेख मुळींच नाहीं तेव्हां त्याचा येथें विचार करण्याचें कारण नाहीं. बहुभार्यकत्व या काळीं रूढ होतें हें वर सांगितलेलं आहे.आणि स्वयंवराचें एक मोठें भरदार वर्णन रघुवंशांत आलेलं आहे. त्यांत इंदुम-तीनें केलेलं स्वयंवर तिच्यावर कोणत्याही प्रकारची जबरदस्ती झाली म्हणून तिनें केलें नव्हतें असें वर्णन आहे. शिवाय अज-इंदुमती यांचा विवाह अत्यंत सुखकारक झाला; अजाचें आपल्या पत्नीवर अनन्यसामान्य प्रेम होतें. "त्वयि मे भावनिबंधना रतिः" असें अज म्हणतो. पण सीतास्वयंवराची जेथें हकीकत रघुवंशांत आली आहे त्या ठिकाणीं ( सर्ग ११ ) वधूच्या संमतीचा प्रश्न नव्हता हें उघड आहे. जो कोणी शिवधनूचा भंग करील त्याला सीता द्यावयाची असा जनकाचा पण होता. आणि पण लावून केलेल्या स्वयंवराला खरें स्वयंवर म्हणतां येणार नाहीं हा आक्षेप रास्त आहे. आपण जरा या सीतास्वयंवराचा विस्तारानें विचार करूं. विश्वामित्राच्या यज्ञक्रियेला राक्षस उपसर्ग करीत होते त्यांचा रामलक्ष्मणांनीं नाश केला. नंतर विश्वा-मित्र रामलक्ष्मणांना घेऊन मिथिलानगरीला गेला. त्यांना मिथिलेचा राजा जनक सामोरा गेला. शिवचापाची गोष्ट ऐकून तें पाहण्याची रामाला इच्छा झाली म्हणून त्याला आपण घेऊन आलों असें विश्वामित्रानें राजा जनकाला सांगितलें. त्या शिव-

चापाचा भंग करील त्याला सीता द्यावयाची असें जनकानें ठरविलें होतें. हें चाप-भंग करण्याचा मोठा सामुदायिक प्रसंग जनकानें घडवून आणला. तेथें चाप उच-लतां उचलतांच रावण उताणा पडला वगैरे मनोरंजक वर्णन कालिदासानें केलेलें नाहीं. कोणी राजा येत असे; चापभंगाचा प्रयत्न करी; तो साध्य झाला नाहीं म्हणजे लज्जित होऊन परत जाई असें कित्येक दिवस चाललें होतें. तेव्हां सीता-स्वयंवरांतील नाट्यप्रसंगमय मौजा ज्या मराठी वाचकांना परिचयाच्या आहेत त्यांचा उल्लेख या वर्णनांत नाहीं. येथें जें वर्णन आहे तें असें: रामचंद्राचें सुंदर शरीर पाहून आणि शिवधनुष्याचें काठिण्य लक्षांत येऊन रामाच्या हातून त्याचा भंग होईल असें जनकाला वाटेना व जरी मुलगा त्याला पसंत पडला होता तरी पण पुरा झाल्याशिवाय कन्यादान करणें शक्य नव्हतें; म्हणून आपली कन्या याला देण्याचा सुप्रसंग येईल असें त्याला वाटेना. जें कार्य मोठमोठ्या हत्तींना दुष्कर तें त्यांच्या बच्चानें करावें व त्याचे प्रयत्न फुकट जावेत अशा गोष्टीला माझ्यानें अनु-मोदन देववत नाहीं असेही उद्गार त्यानें विश्वामित्राजवळ काढले. मोठमोठ्या वीरांना तें धनुष्य वाकवितां न आल्यामुळें ते लज्जित होऊन परत गेले तेथें रामाच्या हातून काय होणार ही शंका जनकाला आली. विश्वामित्रानें सांगितलें, “जनका, रामाची शक्ति असामान्य आहे. (त्याचें शरीर सुंदर म्हणून नाजुक दिसतें त्यावरून तूं विपरीत अनुमान करूं नकोस.) तो चापभंग कसा करतो तें पहा म्हणजे तुला मी म्हणतों याचा पुरेपूर प्रत्यय येईल.” आणि रामानें त्याप्रमाणें अगदीं सहज लीलेनें धनुर्भंग करून दाखविला. आणि म्हणून आपली कन्या राघवाला जनकानें दिली. आतां या ठिकाणीं सीतेला काय वाटत होतें या प्रश्नाचा विचार खरोखर निघतच नाहीं. सुदैवानें तिला रामचंद्र पसंत पडला पण त्याचें आणि तिचें सुदैव म्हणूनच तसें झालें. रामाच्याऐवजीं दुसऱ्या कोणी धनुर्भंग केला असता तर सीतेला त्याच्या पदरीं पडावें लागलें असतें. तेव्हां अशा पण लावण्यालाही तेव्हां स्वयंवर म्हणण्याचा प्रघात होता. पण वधूची व वराची संमति विशेषत: वधूची संमति या दृष्टीनें त्याला खरें स्वयंवर म्हणतां येणार नाहीं हें खरें आहे. इंदु-मतीचें मात्र खरें स्वयंवर होतें. तिला पहावयास आलेल्या प्रत्येक राजपुत्राला किंवा राजाला ती हवी होती आणि त्यांपैकीं जो तिला रुचला तोच तिनें पसंत केला व त्याच्याशींच तिचा विवाह झाला. संमत व असंमत असे दोन प्रकारचे स्वयंवर-विधि त्यावेळीं होते असें म्हणण्यास हरकत नाहीं.

पण कोणत्याही दृष्टीनें पाहिलें तरी आधुनिक काळांत ज्याला स्त्रीस्वातंत्र्य म्हणतात तें त्या समाजांत प्रचलित नव्हतें. शाकुंतलांत शारद्वत दुष्यंताला सांगतो—

तदेषा भवतः पत्नी त्यज वैनां गृहाण वा ।
उपपन्ना हि दारेषु प्रभुता सर्वतोमुखी ॥ ५–२६ ॥

ही तुझी पत्नी आहे. तिला ठेवून घे किंवा सोडून दे. पत्नीवर (पतीची) सत्ता सर्व प्रकारची आहे. म्हणजे तिला पतीनें टाकून दिली तरी त्याबद्दल त्याला कोणास विचारतां येणार नाहीं. हें त्या वेळचें बरेंच लोकमान्य असें तत्त्व होतें असें म्हणतां येईल. पातिव्रत्य हा गुण स्त्रींत असलाच पाहिजे: पतीनें स्त्रीला "विषयार्थ" म्हणून टाकून दिलें तरी तें त्याचा निःस्पृहपणा दर्शवीत असे. हें सगळें जरी खरें असलें तरी कालिदासीय वाङ्मयांत स्त्रियांसंबधीं जीं वर्णनें आहेत त्यांवरून स्त्रियांना समाजांत आदरानें वागवीत असें दिसतें. मालविकाग्निमित्र आणि विक्रमोर्वशीय या दोन्ही नाटकांत राजे आपल्या राण्यांना फार आदरपूर्वक वागवतात असें वर्णन आहे. स्त्रीस्वातंत्र्याची कल्पना अत्यंत आधुनिक आहे हें या बाबतींत विसरून चालणार नाहीं. एवढेंच नव्हे तर व्यक्तिस्वातंत्र्याची कल्पनाही त्या समाजांत किंवा जगांतील कोणत्याच प्राचीन समाजांत रूढ नव्हती हेंहि येथें लक्षांत ठेविलें पाहिजे. अठराव्या व एकोणिसाव्या शतकांत व्यक्तिस्वातंत्र्याच्या कल्पनेला पाश्चिमात्य जगांत महत्त्व आलें व तें १९१४ सालीं सुरू झालेल्या व १९१८ सालीं संपलेल्या महायुद्धापर्यंत टिकलें. पण त्यानंतर तें युरोपांतही पुष्कळ ठिकाणीं डळमळलेलें आहे व रशिया, जर्मनी, इटली इत्यादि देशांत त्याचा पूर्ण लोप झाला आहे. कालिदासीय समाज-वर्णनांत समाजाची जबरदस्ती जरी तशी फारशी आढळत नाहीं तरी त्यांत व्यक्ति-स्वातंत्र्याचा उल्लेख मिळत नाहीं यांत नवल नाहीं. प्रत्येक माणसाचें सर्व आयुष्य वर्णाश्रमधर्माच्या नियमांनीं अगदीं बांधून टाकलेलें असे व त्यापासून कोणीही "रेखामात्र" सुद्धां ढळणार नाहीं असा बंदोबस्त करणें हें राजाचें प्रमुख काम असे.

त्या कालच्या विवाहपद्धतीचा काव्यनाटकें वाचून विचार करतांना जसा स्वयं-वर हा शब्द डोळ्यांपुढें उभा राहातो तसाच गांधर्व विवाह हाहि राहतो. वर जीं दोन प्रकारचीं स्वयंवरें सांगितलीं त्यांचा आणि गांधर्व विवाहाचा कांहींही संबंध नाहीं.

कालिदासीय वाङ्मयांत गांधर्व विवाहाचा उल्लेख विशेषतः शाकुंतलांत स्पष्टपणें आहे. तिसऱ्या अंकांत शकुंतला जेव्हां जाऊं लागते तेव्हां दुष्यंत तिचा हात धरून तिला परत फिरावयास लावतो ( बलादेनां निवर्तयति ) त्यावेळीं ती म्हणते—" पौरवराजा, विनयाचें रक्षण कर; भलत्याच प्रकारानें वागूं नकोस. जरी मी प्रेमानें अगदीं विव्हल झालें आहे तरी तूं सांगतोस तसें तुला करूं देण्याला मी माझी मालक नाहीं." म्हणजे मला माझ्या पित्याच्या आज्ञेशिवाय कांहीं करतां येणार नाहीं. पार्वतीसुद्धां "कन्यादानाचा अधिकार माझ्या पित्याचा आहे. तेव्हां आतां त्याकडे जाऊन माझ्यासाठीं मागणी घाला" असें शंकराला सांगते; पण दुष्यंत उल्लु झालेला पुरुष होता. पित्याला विचारून कन्येची प्राप्ति करून घ्यावी या सरळ मार्गावर राहाण्याइतका त्याचा स्वतःच्यावर ताबाच नव्हता. त्यानें लागलीच शकुंतलेला सांगितलें—" भित्री रे भित्री ! वडिलांचें का तुला भय वाटतें ? तें सोडून दे. तुझ्या पित्याला सर्व धर्माधर्म माहीत आहेत. तो कांहीं असें वागल्याबद्दल तुला दोष देणार नाहीं. शिवाय,

गांधर्वेण विवाहेन बहवो राजर्षिकन्यकाः ।
श्रूयंते परिणीतास्ताःपितृभिश्चाभिनंदिताः ॥

किती तरी राजकन्यांनीं गांधर्व विवाहानें आपलीं लग्नें करून घेतलीं व त्यांच्या आईबापांनीं त्यांना दोष न देतां त्यांचें अभिनंदनच केलें हें प्रसिद्ध आहे." अर्थात् ही प्रसिद्ध गोष्ट दुष्यंताला माहीत होती. बिचाऱ्या शकुंतलेला ती माहीत नव्हती. तेव्हां ती म्हणाली:—" सोड मला—माझ्या मैत्रिणींना तरी मी पुनः एकदां विचारतें." पण राजानें तिला सोडली नाहीं व तिचें चुंबन घेतलें हें वर्णन करून कवीनें बाकीच्या गोष्टी सूचित केल्या आहेत.

या गांधर्व विवाहाचे परिणाम म्हणजेच अभिज्ञानशाकुंतल नाटक होय. ही विशिष्ट विवाहपद्धति सर्रास प्रचलित होती असें म्हणण्यापेक्षां त्यावेळीं कांहीं थोड्या लोकांना कधीं कधीं सोईची वाटे अशी ही पद्धति होती असें म्हणणें अधिक योग्य होईल; आणि बहुपत्नीकत्व हें जसें स्त्रियांच्या दुःस्थितीचें लक्षण तसेंच गांधर्व विवाहाबद्दल समजलें पाहिजे. या गांधर्व विवाहाला प्रणयविवाह म्हणणेंही रास्त दिसत नाहीं; चोरून केलेला विवाह म्हणजे शरीरसंबंध, म्हणजे यथायोग्य विवाहविधीपूर्वी झालेला शरीरसंबंध असें याचें यथार्थ वर्णन

करतां येईल. बलिष्ठ आणि थोर पदवीच्या पुरुषांनीं लग्न करण्यापूर्वी स्त्रीशीं शरीर-संबंध करणें ही गोष्ट घडते; आणि या थोर पुरुषांच्या पदरांत कांहीं तरी उपायानें ती स्त्री टाकणें हाच त्या स्त्रीच्या संरक्षणाचा उपाय त्या परीस्थितींत उरतो. तो शिल्लक असावा म्हणून या अशा संबंधाला गांधर्व विवाह म्हटलें आणि त्याला विवाहाच्या पायरीला चढविलें. या विवाहांत स्त्रीचा पतीनें म्हणजे विवाहापूर्वी तिचा उपभोग घेणाऱ्यानें जाहीर स्वीकार करीपर्यंत तिची स्थिति संशयास्पद व संकटावह असते ही गोष्ट शाकुंतलांतच स्पष्ट केलेली आहे; आणि शार्ङ्गरव जें म्हणतो

अतः परीक्ष्य कर्तव्यं विशेषात्संगतं रहः ।
अज्ञातहृदयेष्वेवं वैरीभवति सौहृदम् ॥

हाच न्याय यासंबंधांत मार्गदर्शक समजला पाहिजे. " परीक्ष्य " म्हणजे सर्व बाजूंचा विचार करून हा संबंध करावा; पण सर्व बाजूंचा विचार करण्यासारखी स्थिर मनोवृत्ति नसली, म्हणजेच हा संबंध घडून येत असतो. म्हणून तो " परीक्ष्य " करणें हें बहुतेक अशक्यप्राय आहे. आणि यांत स्त्रीची स्थिति नेहमींच असहाय्य होत असल्यामुळें आणि अशा विवाहाचे सर्व दुष्परिणाम तिला सोसावे लागत असल्यामुळें त्यांनीं या भानगडींत न पडतां वर पसंत केल्यावर

दाता मे भूभृतां नाथः प्रमाणीक्रियतामिति

असें पार्वतीप्रमाणें म्हणून त्याला आपल्या वडिलांना भेटण्यास सांगावें; प्रथम शरीरसंबंध करू नये.

विवाहाचे आठ प्रकार असतात असें मनुस्मृतींत सांगितलें आहे.

ब्राह्मो दैवस्तथैवार्षः प्राजापत्यस्तथासुरः ।
गांधर्वो राक्षसश्चैव पैशाचश्चाष्टमोधमः ॥

ब्राह्म, दैव, आर्ष, प्राजापत्य, आसुर, गांधर्व, राक्षस आणि पैशाच असे आठ प्रकार विवाहाचे होते. ही प्रकारांची यादी आहे; त्यांत उत्तम कोणता हें ठरविण्याचा प्रयत्न नाहीं. समाजांत कांहीं कालखंडांत कोणत्या गोष्टी अल्प किंवा पुष्कळ प्रमाणांत प्रचलित आहेत यांची माहिती गोळा करणें म्हणजे त्या गोष्टी उत्तम आहेत किंवा समाजस्थितीच्या निदर्शक आहेत असा निर्णय करणें नव्हे. माहिती गोळा केल्यानंतर तारतम्यानें, विचारपूर्वक, त्यावरून निर्णय काढणें हें निराळें शास्त्र

आहे. द्रौपदीला पांच पति होते यावरून आर्यांच्या समाजांत बहुपतित्व सर्रास रूढ होतें असें म्हणणें रास्त नाहीं; कारण सुसंस्कृत समाजांत असलें दुसरें उदाहरण एकही नाहीं. एखाद्या ठिकाणीं एकादी गोष्ट आहे असें म्हणणें म्हणजे ती उत्तम आहे किंवा सर्वमान्य आहे असें म्हणणें नव्हे. असें म्हणणें म्हणजे मिस् मेयो या विकृत अमेरिकन लेखिकेचें तर्कशास्त्र घेणें होय. हिंदुस्थानांतील गटारें या बाईनें पाहिलीं आणि या देशांत गटारांखेरीज कांहीं नाहीं असा अभिप्राय व्यक्त केला. गटारें आहेत ही गोष्ट खरी ( आणि तीं अमेरिकेंतही आहेत ) पण त्याहून निराळ्या गोष्टीही आहेत; येथें हिंदुस्थानांत आहेत आणि अमेरिकेंतही आहेत. त्या सर्वांचा हिशेब करून निर्णय काढावयाचा असतो. तेव्हां लग्नाचे प्रकार किती होते यांची यादी तयार केली म्हणजे ते सर्व प्रकार सन्मान्य होते हा निर्णय निघत नाहीं किंवा ते सर्व मोठ्या प्रमाणांत प्रचलित होते हाही निर्णय निघत नाहीं. आतां या विवाहप्रकारांकडे आपण थोडक्यांत पाहूं. ब्राह्मविवाहाची व्याख्या याज्ञवल्क्यानें दिली आहे:—

ब्राह्मो विवाह आहूय दीयते शक्त्यलंकृता ।

पुरुषाला कन्येच्या पित्यानें बोलावून शक्तीप्रमाणें सालंकृत कन्यादान करावयाचें. यांत वरानें कसलीही किंमत म्हणून वधूपित्याला द्यावयाची नाहीं व त्याच्याकडून वाटेल तशी रक्कम त्याच्या शक्तीपलीकडे असलेली उकळण्याचा प्रयत्न करावयाचा नाहीं. हुंड्याच्या रूपानें किंवा तशाच प्रकारें जेव्हां वधूपित्याला पिळून काढण्यांत येतें तेव्हां खऱ्या शास्त्रार्थाप्रमाणें विवाह ब्राह्म होत नाहीं. दैव विवाह म्हणजे यज्ञप्रसंगीं तो यज्ञ चालविणाऱ्या ब्राह्मणाला कन्या देणें. ( मुरळ्या, देवदासी वगैरे चाली या दैव विवाहाच्या अवशेष दिसतात.) आर्ष नांवाच्या प्रकारांत वधूपिता कन्यादानापूर्वी वराकडून दोन गाई घेत असे. हा अगदीं प्राचीन काळचा प्रकार म्हणून या यादींत घातलेला दिसतो. प्राजापत्य विवाहांत वधूपिता जावयाकडून कसलीही देणगी घेत नाहीं. ही आर्ष विवाहाची सुधारणा होती असें म्हणतां येईल. बापाला पैसे देऊन मुलगी बायको करण्यासाठीं विकत घेणें याला आसुर विवाह म्हणतात. हा हिंदुस्थानांत अद्यापि प्रचलित आहे, पण याला कोणी चांगलें समजत नाहींत. गांधर्व विवाह म्हणजे आप्तेष्टांना बिलकुल विचारल्याशिवाय कसलाही संस्कार केल्याशिवाय केवळ एकमेकांच्या परस्परभावनेमुळें शरीरसंबंध घडणें. यांत तसें केल्याची कोणत्याही पक्षानें विशेषतः पुरुषानें

नाकबुली दिली तरी संकट उद्भवतें हें उघड आहे. मुलीला जबरदस्तीनें पळवून नेऊन ( मुलीच्या संमतीनें नव्हे ) जेव्हां तिच्याशीं लग्न लावतात तेव्हां तो राक्षस विवाह होय. मुलगी शुद्धीवर नसतांना किंवा तिची शुद्धि जाईल असा कांहीं तरी उपाय करून तिला जेव्हां पुरुष पळवितो व तिला आपली बायको करतो तेव्हां पैशाच विवाह होतो. तेव्हां या यादींतील ब्राह्म विवाह श्रेयस्कर दिसतो. आर्ष व प्राजापत्य हे त्यांतल्या त्यांत बरे दिसतात. दैव, आसुर, राक्षस व पैशाच हे त्याज्य दिसतात. गांधर्व विवाह विधिशून्य अतएव कबूल केला तर तो आहे, नाहींतर नाहीं अशी त्याची स्थिति आहे.

या यादींत स्वयंवर हा विवाहाचा प्रकार मुळींच सांगितलेला नाहीं हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. म्हणून ही यादी संपूर्णही नाहीं आणि निर्णायकही नाहीं असें म्हटल्यावांचून गत्यंतर नाहीं. कालिदासाच्या वाङ्मयांत परस्परानुरक्तीनें विवाह लागतात; अर्थात् हें वाङ्मय काव्यमय आहे हें खरें, पण समाजाला निदान असल्या विवाहांचें कौतुक वाटे असें समजण्यास हरकत दिसत नाहीं. ब्राह्म विवाहाचे उल्लेख प्रामुख्यानें येतात. गांधर्व विवाहाचें जें चित्र शाकुंतलांत दाखविलें आहे तें पाहून त्या विवाहांतून काय अनर्थ निपजणें शक्य आहे याची जाणीव होते. विवाहाचीं अशीं भरदारपणानें कालिदासानें दोन ठिकाणीं वर्णनें केलेलीं आहेत. एक कुमारसंभवांत शिव-पार्वती विवाहाचें; हें अत्यंत श्रेष्ठ भूमिकेवरच्या परस्परानुरक्तीचें हृदयंगम असें चित्र आहे व दुसरें अज-इंदुमती विवाहाचें; हेंही फार उत्तम अर्थानें स्वयंवर होतें. शिव-पार्वती आणि अज–इंदुमती या दोन्ही विवाहांत जसा परस्परप्रणय हें मुख्य विवाहकारण आहे तसेंच त्या दोनींतही मातापितरांची किंवा वडील माणसांची पूर्ण संमतीहि दिसून येते. आणि म्हणून कालिदासीय वर्णनावरून कांहीं निष्कर्ष काढावयाचा झाला तर तो या दोन विवाहांना अनुकूल असा निघतो. स्वयंवराचें जें मोठें तंत्र होतें आणि ज्याचें वर्णन रघुवंशाच्या सहाव्या सर्गात आहे तें केवळ एकाद्या मोठ्या राजाला सांभाळतां येण्यासारखेंच होतें आणि कधीं कधीं त्या तंत्राचें वर्चस्व झाल्यामुळें त्यांत परस्परानुरक्तीचा मागमूसही उरत नसे. तेव्हां सर्व दृष्टींनीं विचार केला म्हणजे शिव-पार्वतीविवाह या विवाहप्रकाराला कालिदास उत्कृष्ट समजतो याबद्दल शंका रहात नाहीं. तत्कालीन सुज्ञ समाजाचें मतही जवळजवळ तसेंच असावें असें अनुमान करणें धोक्याचें होईल असें वाटत नाहीं.

तेव्हां स्त्रियांच्या बाबतींत एकंदरींत असें म्हणतां येईल कीं धर्मशास्त्राच्या दृष्टीनें स्त्रियांना निराळें अस्तित्व नव्हतें, पण समाजांत त्यांचा दर्जा त्यामुळें जितका कनिष्ट असावा असें वाटतें तितका नव्हता. बहुपत्नीकत्वांतसुद्धां एक ज्येष्ठ भार्या म्हणून समजली जात असे व पतीला प्रियतर असलेल्या पत्नीला तिचा मान ठेवावा लागे. कालिदासानें वर्णन केलेलीं एकपत्नीव्रताचीं उदाहरणें म्हणजे अज, रामचंद्र, शंकर हीं बऱ्याच प्रमाणांत त्या वेळच्या समाजांत इतक्या काव्यमय स्वरूपांत नसलीं तरी बऱ्याच दृश्य स्वरूपांत पहावयास मिळत असावींत. "पातिव्रत्य" म्हणजे जुलूम आहे आणि स्त्रियांनीं पुरुषांची बरोबरी करण्याचा रास्त मार्ग म्हणजे त्यांनीं पुरुषांप्रमाणेंच उच्छृंखल व्हावें या कल्पना फार अलीकडच्या आहेत. या कल्पनांनीं प्रतीत होणारें स्वातंत्र्य हें स्वातंत्र्य समजावें का स्वैराचार समजावा याचा वाद येथें करण्याची आवश्यकता नाहीं. पण या कल्पना अतिशय अलीकडच्या असल्यामुळें तशा स्वातंत्र्याचा मागमूस कालिदासीय वाङ्मयांत आढळणार नाहीं. पण पूर्वी सांगितल्याप्रमाणें पतीकडूनसुद्धां अन्याय व मानखंडना या वाङ्मयांतील स्त्रिया सोसून घेत नाहींत हें लक्षांत ठेविलें पाहिजे. रा. गडकरी यांची "सिंधू" या वाङ्मयांत सांपडणार नाहीं. पतीशीं बरोबरीनें वागणाऱ्या, त्याच्या सुखानें सुखी व दुःखानें दुःखी होणाऱ्या आणि तो जर मूर्खपणानें वागला तर स्वाभिमानानें निराळ्या रहाणाऱ्या किंवा आपल्या मातृपदाच्या जोरावर त्याला आपली चूक सुधारावयास लावणाऱ्या अशा स्त्रिया या वाङ्मयांत आढळतात. कवीची कृति ध्येयरूप असते; कालिदासाचीहि तशी आहे; पण वास्तवतेच्या भक्कम पायावरच उत्कृष्ट कवि ध्येयाचा प्रासाद उभारतात. म्हणून अशीं सुंदर चित्रें कवीनें रंगवावींत असें भाग्य त्या काळच्या किंवा त्याहून थोड्या पूर्वीच्या समाजांत असलें पाहिजे.

७. या समाजांतील सामान्य जनतेचें एक मजेदार चित्र शाकुंतलांत सहाव्या अंकाच्या सुरवातीस पहावयास मिळतें. एका कोळ्याला शहरचा कोतवाल व त्याचे दोन शिपाई धरून आणतात व कबूलीजबाब घेण्याकरितां त्याला मार देतात. त्याच्याजवळ शकुंतलेची नाहींशी झालेली राजमुद्रा ( अंगठी ) सांपडते. तो कोळी म्हणतो—"मी चोरी करणारा माणूस नाहीं." तेव्हां शिपाई म्हणतो:—

किं बम्हणेसि कलिअ रज्ञा पडिग्गहे दिण्णे ।

काय तूं चांगला सत्पात्र ब्राह्मण असें समजून राजानें तुला ही देणगी दिली? तेव्हां तो कोळी म्हणतो :—"मी कोळी आहें आणि मासे धरून आपला व कुटुंबाचा निर्वाह करतों."

तेव्हां कोतवाल म्हणतो—"फारच उत्तम धंदा!" आपल्या धंद्याला तो हंसला हें कोळ्याला सहन झालें नाहीं. तो म्हणाला—"माझ्या धंद्याची अशी चेष्टा करूं नका. आम्हांला जन्मजात हें काम लागलेलें आहे. तें जरी निंद्य असलें तरी आम्हांला सोडतां येत नाहीं. विद्वान् ब्राह्मण दयाळु असतो पण यज्ञाच्या वेळीं पशूला मारतांना तो अगदीं निष्ठुर होतो का नाहीं? म्हणजे, जरी तो ब्राह्मण यज्ञपशु मारतांना कितीही क्रूर झाला तरी त्याच्या दयाळुपणाला बाध येत नाहीं (तो वाईट ठरत नाहीं) त्याप्रमाणें जरी मी मासे पकडण्याचा धंदा केला (ब्राह्मणाला पशु मारावा लागतो, मी मासे धरतों) तर त्यामुळें मीही कांहीं वाईट ठरत नाहीं." हा वरच्या वर्गांना दिलेला टोमणा जरा लक्षांत ठेवण्यासारखा आहे यांत शंका नाहीं. वास्तविक आपल्याला करावा लागतो तो व्यवसाय उत्तम प्रकारें करणें हें श्रेयस्कर, तो व्यवसाय कसा का असेना; तो उत्तम प्रकारें न करणें हें पाप; त्या व्यवसायांत असणें हें पाप नव्हे; हा नियम त्या बिचाऱ्या कोळ्याची चेष्टा करणारा विसरला; पण कोळी स्वस्थ बसला नाहीं; त्यानें त्याचीच फजिती केली. येथें कोतवालाला किंवा फौजदाराला श्याल म्हटलें आहे; व त्यावरून राजाचा मेहुणा या कामावर असावा असें दिसतें. पण हा जर राजाचा मेहुणा असेल तर जरा चमत्कारिक वागतो. राजा त्या कोळ्याला सोडून देण्याचा हुकूम करतो व अंगठीच्या किंमतीइतकें त्याला बक्षीसही देतो. यांतील अर्धा भाग तो कोळी त्या श्यालाला व शिपायांना देतो आणि मग श्याल त्या कोळ्याला आपला दोस्त समजतो आणि सर्वजण दारूच्या गुत्यांत दारू पिऊन आपली मैत्री दृढ करावी म्हणून जातात. राजाला राण्या पुष्कळ होत्या; पण हा श्याल जर त्यांपैकीं एकादीचा भाऊ असेल तर अगदींच हलका माणूस दिसतो. शिपाई आणि हा श्याल यांत फारसें अंतर दिसतच नाहीं. त्यावरून शहरच्या रक्षक अधिकाऱ्याला श्याल म्हणण्याची वहिवाट असावी, तो राजशालक असावाच असा कांहीं नियम नव्हता असें अनुमान करणें अधिक सयुक्तिक होईल असें वाटतें.

ज्या वेळीं वाहतुकीचीं साधनें कमी होतीं आणि जलद प्रवासाच्या सोई नव्हत्या, त्यावेळीं पावसाळ्याच्या मोसमाला उद्योगासाठीं किंवा स्वारी लढाईसाठीं बाहेर गेलेले लोक घरीं परत येत व पावसाळाभर ते घरीं राहून नंतर हिंवाळ्याच्या सुरवातीला बाहेर पडत. म्हणून पावसाळ्यांत सर्व मंडळी घरीं असत; प्रिय जनांच्या गांठी पडत; आप्तइष्ट एकत्र येत. मेघदूत हें नितांतसुंदर काव्य जरी अक्षरशः स्वर्गीय वातावरणांतलें आहे तरी तें वाचून वरील गोष्टी ध्यानांत येऊन तत्कालीन समाजाच्या कित्येक गोष्टींसंबंधीं उलगडा होतो. पावसाळ्याचें हें कौतुक या आगगाडीच्या दिवसांत राहिलें नाहीं. अद्यापिसुद्धां कोंकणच्या आगबोटी बंद झाल्या म्हणजे देश व कोंकण या दरम्यान रहदारी पुष्कळ कमी होते व या पूर्वकालीन गोष्टीची निदान कल्पना येणें सोपें होतें. मेघदूतांतल्या बिचाऱ्या यक्षाला पावसाळ्यांतसुद्धां घरीं जातां येत नाहीं याबद्दल मोठी चुटपुट लागून राहिली होती. आणि म्हणून आषाढ महिन्याच्या अगदीं पहिल्या प्रतिपदेला जो मेघ दृष्टिपथांत आला त्याला त्यानें हाक मारून आपला पत्नीकडे संदेश घेऊन जाणारा दूत होण्याची विनंति केली.

मेघालोके भवति सुखिनोप्यन्यथावृत्ति चेतः
कंठाश्लेषप्रणयिनि जने किं पुनर्दूरसंस्थे ।

मेघ दृष्टीला पडला कीं सुखी माणसाच्या चित्तवृत्तींतसुद्धां फरक होतो मग अत्यंत प्रिय अशी पत्नी दूर असतांना मेघ पाहिल्यावर त्या विरही पतीची वृत्ति कां नाहीं बदलणार? खरेंच आहे. त्या कृषिप्रधान काळांत ( आणि सध्यां तरी काय तेंच आहे ) वेळचे वेळीं पाऊस पडण्याचीं चिन्हें दिसलीं कीं माणसांना बरें वाटे. आणि येथें तर पत्नीसाठीं विरहानें तळमळत बसणारा यक्ष पावसाळ्यांत-सुद्धां घरीं जातां येणार नाहीं या दुःखानें अगदीं बावरून गेला होता. मेघ पहातांच घरीं असण्याचें स्मरण होऊन त्याला अत्यंत खिन्नता प्राप्त झाली.

कवीनें उपयोजिलेल्या कित्येक सुभाषितांवरूनही तत्कालीन लोकस्थितीविषयीं अनुमानें काढतां येतात. मेघदूतांतीलच आपण दोनचार सुभाषितें घेऊं आणि त्यांचा विचार करूं,

कामार्ता हि प्रकृतिकृपणाश्चेतनाचेतनेषु ॥

जे कामातुर झाले आहेत ते कोणाच्या पाया पडतील त्याचा नियम नाहीं. मग

तो जिवंत आहे का अचेतन आहे याचाही ते विचार करीत नाहींत. कामांधांना विचार रहात नाहीं हें प्रसिद्ध आहे.

**याच्ञा मोघा वरमधिगुणे नाधमे लब्धकामा ।**

याचना तरी चांगल्या माणसापाशीं करावी; त्यानें नाहीं म्हटलें तरी बिघडणार नाहीं. पण हलकट माणसानें जरी होय म्हटलें तरी त्याच्या दारीं जाऊं नये! बिचारा कालिदास! तो या पैशाच्या युगांत असता तर हे उद्गार त्यानें काढले असते कीं नाहीं कोणास ठाऊक! पण त्याचें युग पैशाचें युग नव्हतें येवढें खरें म्हणून याचना करणाऱ्यांनासुद्धां पात्रापात्रविचार करण्याचें धाडस होत होतें! आणि असें करणें हें मोठें उत्तम पण मोठें धाडसच;

**रिक्तः सर्वो भवति हि लघुः पूर्णता गौरवाय ।**

कारण, ज्याच्याजवळ कांहीं नाहीं त्याला जगांत कमीपणा येतो. ज्याच्याजवळ गडगंच भरलेलें आहे त्याला मोठेपणा येतो.

**कस्यात्यंतं सुखमुपनतं दुःखमेकांततो वा**
**नीचैर्गच्छत्युपरि च दशा चक्रनेमिक्रमेण ।**

हा श्लोकार्ध तर प्रसिद्ध आहे. अगदीं केवळ सुख किंवा अगदीं केवळ दुःख असें कोणाला कधीं प्राप्त होतें काय? (नाहीं.) कधीं खालीं तर कधीं वर असें रथाच्या चाकासारखें (म्हणजे रहाटगाडग्यासारखें) जगांत सारखें चाललेलें आहे. या वाक्यांत निराशावाद किंवा दैववाद आहे असें म्हणतां येणार नाहीं. जगांतील परिस्थितीचें अवलोकन करून हा काढलेला निष्कर्ष आहे व तो सत्यावर आधारलेला आहे. म्हणून उच्च पदावर गेले आहेत त्यांनीं मस्तीला येऊं नये व दुर्दैवानें जे अवनत झाले आहेत त्यांनीं निराश होऊं नये असा त्याचा अर्थ आहे.

सामाजिक कल्पना ज्यांत प्रतीत होतात अशीं सुभाषितें अन्यत्रही पुष्कळ आहेत. क्वचित्-प्रसंगीं उपमालंकारानेंही समाजाच्या समजुती कळावयास साहाय्य होतें. उदाहरणार्थ—

**श्रुतेरिवार्थं स्मृतिरन्वगच्छत् ।**

स्मृति ही श्रुतीच्या म्हणजे वेद आणि उपनिषदें यांच्या अर्थाला धरून असते. म्हणजे स्मृति ही नेहमीं श्रुतीचा अर्थ विशद करणारी अशी आर्यांच्या समा-

जांत समजूत होती. जेथें स्मृति आणि श्रुति यांत विरोध येईल तेथें श्रुति ग्राह्य व स्मृति त्याज्य असा शास्त्राचा नियम आहे. तो तेव्हांही लोकसंमत होता.

श्रद्धेव साक्षाद्विधिनोपपन्ना ।

श्रद्धा आणि विधि यांचें साहचर्य पाहिजे. श्रद्धा नसतांना विधि करणें म्हणजे ढोंग आहे. आणि विधि तर करावयाचा नाहीं, पण श्रद्धा आहे म्हणून मिरवावयाचें हेंही ढोंगच आहे. जुन्या काळांत श्रद्धेचें विशेष माहात्म्य होतें आणि त्याचाच उल्लेख येथें आहे.

दिलीपसूनुर्मणिराकरोद्भवः
प्रयुक्तसंस्कार इवाधिकं बभौ ।

दिलीपाच्या मुलाला जेव्हां सर्व शास्त्रोक्त संस्कार केले तेव्हां त्याचें तेज अधिकच वाढलें; ज्याप्रमाणें खाणींतून काढलेल्या मण्याला ( रत्नाला ) संस्कार झाले म्हणजे तो अधिक शोभतो. म्हणजे या वेळच्या समाजाला हिरेमाणकें वगैरे रत्नें खाणींतून काढण्याच्या व्यवसायाचा परिचय होता हें लक्षांत येतें. येथें आणखी एका गोष्टीचा जातांजातां उल्लेख करण्यास हरकत नाहीं. विक्रमोर्वशीयांत राजा व विदूषक यांच्या संभाषणांत दुपारच्या भोजनाचा उल्लेख आहे. दुपारीं मध्यान्हीनंतर हें भोजन होई व त्यापूर्वी स्नान करण्याची पद्धति असे. अर्थात् पहांटे उठून स्नानसंध्या करण्याचाही प्रघात होता; पण संसारी माणसें भोजनाच्या पूर्वी थोडा वेळ स्नान करीत व खेड्यापाड्यांतून हाच प्रकार अद्यापिही दृष्टीस पडतो.

लोकांची सामान्य प्रवृत्ति उत्सवप्रिय असते याचा केवळ तात्त्विक उल्लेख कालिदासानें केलेला नाहीं तर त्याच्या वर्णनांतही या प्रवृत्तीचीं उदाहरणें आहेत. अज आणि इंदुमती यांच्या विवाहाच्या वेळीं त्यांना पहाण्याबद्दल लोकांची उत्सुकता किती होती याचें वर्णन रघुवंशाच्या सातव्या सर्गांत आलेलें आहे. त्यावरून आणि अशाच इतर वर्णनांवरून मनुष्यस्वभावाचा बराचसा मोठा भाग सर्व स्थळांत आणि सर्व काळांत सारखाच असतो, त्याच्या मुख्य घटकांत कांहीं फरक पडत नाहीं, फक्त त्याच्या स्वरूपांत फार तर फरक पडतो असें कळून येतें; स्त्रियांना अलंकार घालून नटणें आवडतें. नटण्याचे किंवा अलंकाराचे प्रकार स्थलकालानुरूप निराळे असतील. कुलपतीच्या आश्रमांत राहणारी शकुंतला

पुष्पांनीं आणि पल्लवांनीं आपलें शरीर सुशोभित करीत असेल तर राजगृहांत राहणारी राजकन्या रत्नमाणिकांनीं स्वतःला भूषवीत असेल आणि अलीकडे भूषणाचे निराळे प्रकार आले असतील. पण भूषणधारणाची स्त्रियांची हौस ही त्रिकालाबाधित दिसते. त्याचप्रमाणें पुरुषस्वभावाच्या घटकांचें स्वरूप कालप्रसंगानें बदललें तरी मूळचे घटक मात्र बदलत नाहींत. कालिदासाच्या काळचा किंवा त्यानें वर्णन केलेला समाज कृषिप्रधान होता तरी त्या वेळीं शहरें होतीं, बऱ्याच सुधारणा अस्तित्वांत होत्या आणि त्यामुळें म्हणा किंवा दुसरें कांहींही कारण असो तो आपणांला अगदीं परका असें वाटत नाहीं.

या समाजाची रचना जशी एका बाजूनें एका विशिष्ट प्रकारच्या राजसंस्थेवर झाली होती तशी दुसऱ्या बाजूनें कुटुंबसंस्थेवर म्हणजे विवाहसंस्थेवर झाली होती. वर्णाश्रमव्यवस्था अंमलांत होती पण तिला धक्के बसून तिचें रूपांतर जातिसंस्थेंत होऊं लागलें होतें. कुटुंबांत पतिपत्नीचें नातें मुख्य होतें व कालिदासीय वाङ्मयांत या नात्याचें केलेलें वर्णन सर्वत्र भरदारपणाचें आहे. विवाहाचा सर्वसामान्य प्रचिलित प्रकार विधियुक्त असे आणि विधिशून्य विवाह समाजाला मान्य नव्हते असें स्पष्ट दिसतें. विद्याव्यासंगी ब्राह्मण सहकुटुंब शहराजवळील अरण्यांत राहत व त्यांपैकीं जे विद्यादानाचें कार्य करीत त्यांच्याकडे शेंकडों विद्यार्थी असत. कुटुंबामध्यें धाकट्यांनीं वडीलांना आदरानें वागवावें व थोरांनीं धाकट्यांना प्रेमानें वागवावें असा दंडक होता. मुलांनीं कांहीं कर्तृत्वाचा हट्ट घेतला तर त्याला वडील मंडळी आड येत नसत आणि मुलें कर्तृत्वशील व्हावींत याबद्दल प्रत्यक्ष प्रयत्न करीत असत. एक तऱ्हेची पराक्रमाची इच्छा, कर्तव्यनिष्ठा, सुदृढतेची आवड, सदाचरणाचा अभिमान अशा गोष्टी मुलाबाळांच्या मनावर ठसवीत असत. कुटुंबांत बहुपत्नीकत्वामुळें सख्या सावत्र भावांचे भांडण्याचे प्रसंग येत अशी कल्पना करणें चुकीचें होणार नाहीं. पण कालिदासानें वर्णन केलेला रामाचा सावत्र भाऊ भरत ( लक्ष्मणसुद्धां रामाचा सावत्र भाऊच होता ) हा इतका उदार दाखविला आहे कीं सावत्रपणाचा वारा आपणांला हें वाङ्मय वाचतांना बाधतच नाहीं असें म्हटलें तरी चालेल. समाजांतील धुरीणांत, राजांत आणि थोर लोकांत, कर्तव्याची जाणीव फार तीव्र होती हें दिलीप व नंदिनी या कथेवरून (रघु. २) स्पष्ट होतें आणि त्यामुळें सर्व समाजांतच कर्तव्यासंबंधीं पूर्ण जागरूकता राहणें सुलभ होई.

या ठिकाणीं जी एक महत्त्वाची गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे ती ही कीं काव्य वाचून बांधलेलीं अनुमानें म्हणजे प्रत्यक्ष इतिहास नव्हे. इतिहासाचीं साधनें म्हणून ज्यांना आपण समजतों त्या गोष्टीसुद्धां कित्येक वेळां इतक्या दूषित व विकृत असतात कीं त्यांत सत्य किती आहे हें कळणें दुरापास्त होतें. १९१४ सालीं सुरू झालेल्या महायुद्धापासून तो नुकत्याच होऊन गेलेल्या ॲबीसीनियन युद्धापर्यंत किंवा आज चालू असलेल्या जपान व चीन यांच्या लढ्यापर्यंत दोन्ही पक्ष खोट्या बातम्या किती हुषारीनें पसरवतात याचा सर्व सुज्ञांना अनुभव आलेला आहे. असले कागद-पत्र एकत्र करून त्यांवरून पुढच्या काळीं आजचा इतिहास निष्पन्न होणार. इतिहासाच्या साधनांत सत्य किती व प्रचार म्हणजे Propaganda किती याची निवड करणें आजकाल तर दुर्घट झालें आहे. तेव्हां ज्याला इतिहास म्हणतात त्यांत सत्य किती हें कोणी त्रिकालज्ञ योगी असतील त्यांनाच समजणें शक्य आहे. तेव्हां इतिहास वाचूनसुद्धां सत्यान्वेषण करावें लागतें व त्यासाठीं माणसांना आपल्या तर्कशक्तीचा उपयोग करावा लागतो. कवीची सृष्टि तर बोलून चालून त्याच्या प्रतिभाशक्तीचें फळ. त्या सृष्टींत वावरून एखाद्या काळासंबंधीं किंवा समाजस्थितीसंबंधीं जीं अनुमानें काढावयाचीं तीं अर्थात् अत्यंत स्थूल स्वरूपाचीं असणार हें उघड आहे. अशीं अनुमानें काढणें हा इतिहासाचे धागे जमविण्याचा एक उपाय आहे, हें आतां सर्व विद्वानांना मान्य झालेलें आहे. मात्र ते धागे जुळवितांना पराकाष्ठेची सावधगिरी ठेविली पाहिजे नाहींतर भल-भलते प्रमाद होण्याचा संभव आहे. अर्थात् असे प्रमाद जर जाणून बुजून केले नसतील तर ते ग्राह्य ठरणार नाहींतच पण अक्षम्य ठरण्याचें कारण नाहीं.

८. या समाजासंबंधीं आणखी एक गोष्ट सांगितली पाहिजे. हा आर्यांचा समाज लहान लहान शेंकडों राज्यांत विभागलेला होता. अश्वमेध यज्ञाच्या निमित्तानें कधीं कधीं तांत्रिक एकछत्री राज्य त्यांतील कांहीं भागावर निर्माण होऊन तें कांहीं अल्प काळ टिकत असेल, पण सामान्यपणें भरतखंडांत लहान लहान राज्यें सर्वत्र पसरलेलीं होतीं. यांतील कांहीं मोठीं होतीं व त्यांच्या अंमलाखालीं बरेच मांडलिक असत. पण या सर्व राज्यांत मिळून कांहीं एकतानता, एकराष्ट्रता होती असें दिसत नाहीं. कालिदासाच्या वाङ्मयांत हिमाचलापासून रामेश्वरापर्यंत उल्लेख आलेले आहेत; इंदुमतीच्या लग्नाला जमलेले राजे निरनिराळ्या देशांतून आलेले होते; आणि रघूनें जो दिग्विजय केला त्यांत पुष्कळच देशांचीं नांवें आलेलीं

आहेत. म्हणजे ज्याला आपण आज हिंदुस्थान म्हणतों त्याच विस्ताराचा—निदान जवळजवळ त्या विस्ताराचा देश, या वर्णनांतून दृग्गोचर होतो. या सर्व देशांत राज्यें निरनिराळीं असल्यामुळें सामान्य राजसत्तेमुळें उत्पन्न होणारी एकतानता, किंवा एकराष्ट्रीयत्व नव्हतें; पण हीं सर्व राज्यें आर्यसंस्कृतीनें, वर्णाश्रम-धर्मानें, सामान्य धर्म, शास्त्र व पुराणग्रंथांनीं एकत्र बांधलीं होतीं असें म्हणतां येईल. या सर्वांत निरनिराळ्या कला व विद्या उदय पावल्या; पण सर्वांनीं मिळून आपण सर्व एक आहोंत या बुद्धीनें आत्मसंरक्षणाचा कांहीं मार्ग रेखून ठेविला नव्हता. कदाचित् त्या जुन्या जगांत तसा तो रेखण्याचें कारणही नसेल किंवा तसें करण्याची आवश्यकता कोणास वाटली नसेल. पण अन्य देशांची व संस्कृतींची टोळधाड या देशावर आली तेव्हां हा एकतानतेचा अभाव, एकीकृत सामर्थ्याचा अभाव, आम्हांस नडला व नानात्वाच्या दोषाचा अतिरेक होऊन वेदांताच्या भाषेंत बोलावयाचें म्हणजे आपणाला बद्ध अवस्था प्राप्त झाली.

रघुराजानें जो दिग्विजय केला त्यांत प्रथम तो पूर्वेकडे गेला व पूर्व समुद्रापर्यंत त्यानें आपली सेना नेली असें वर्णन आहे; व तसें करतांना समुद्राच्या कांठीं ताडांचीं मोठमोठालीं अरण्यें होतीं असें सांगून वंगाचा म्हणजे बंगालचा उल्लेख आहे. नंतर तो कलिंगाकडे वळला. तिकडे माडापासून काढलेली दारू प्यावयास मिळत असे असें वर्णन केलेलें आहे, व ते विड्याच्या पानांतून पीत असत. तिकडून तो दक्षिणेकडे वळला व तोहि समुद्राच्या कांठाकांठानें गेला म्हणजे ओढ्या प्रांतांतून, तैलंगणांतून खालीं गेला व कावेरीनदीपर्यंत पोंचला म्हणजे तामिल देशांत गेला व मलयागिरीपर्यंत त्यानें मजल मारली. तिकडे पांडवराजाबरोबर त्याचें युद्ध झालें आणि मग तो सह्याद्रि पर्वताकडे आला. त्याच्या या स्वारींत केरल म्हणजे मलबार प्रांताचाही उल्लेख आहे; नंतर तो स्थलमार्गानें पारसीकांना जिंकण्यास गेला. या ठिकाणीं तो जलमार्गानें गेला नाहीं; कारण जलमार्ग निषिद्ध आहे असें मल्लीनाथ म्हणतो. हा निषेध कालिदासाच्या कालींही होता कीं काय हा प्रश्न चिंतनीय आहे. मलबारांतून तो वर पश्चिम हिंदुस्थानांत वळला असें म्हणतां येईल. हे पारसीक म्हणजे यवन होते असें कालिदास म्हणतो. त्या वेळीं आर्य-संस्कृतीच्या बाहेर असणाऱ्या सर्वांनाच यवन किंवा म्लेंच्छ म्हणण्याचा परिपाठ होता. पण हे पारसीक म्हणजे सध्याचे पारशी असें म्हणण्यास ऐतिहासिक आधार दिसत नाहीं. पश्चिमेकडून तो उत्तरेकडे वळला. तिकडे त्यानें हूण, कांबोज,

वगैरे लोकांशीं युद्ध केलें. तिकडून त्यानें हिमालयांत प्रवेश केला. तेथें राहणाऱ्या लोकांशींहि त्यानें युद्ध केलें आणि शेवटीं कामरूप म्हणजे आसाम देशावर तो गेला. म्हणजे पूर्व समुद्राच्या कांठानें दक्षिणेंत जाऊन केरल प्रातांत शिरून पश्चिम समुद्राच्या कांठानें रघु वर हिमालयांत पायरस्त्यानें गेला आणि उत्तरेला याप्रमाणें जाऊन पुनः पूर्वेकडे वळून आसामाला जिंकून तो परत आपल्या राजधानीला आला. तेव्हां रघूनें सर्व देश पादाक्रांत केला होता; पण सर्व देशभर एक राज्य करण्याची कल्पना तेव्हां नव्हती म्हणून त्यानें तसें केलें नाहीं.

याप्रमाणें त्या काळासंबंधीं कल्पना करण्याचा हा प्रयत्न केलेला आहे. तसें करतांना कवि हा आपल्या प्रतिभाशाली वर्णनांतसुद्धां आपल्या कालाहून किंवा त्या काळाशीं संलग्न असलेल्या कालाहून विशेष दूर जाऊं शकत नाहीं या तत्त्वाचा आश्रय केलेला आहे. ज्या विशिष्ट ठिकाणांचीं वर्णनें कवीनें केलीं आहेत त्याहून दूर असलेल्या प्रांतांत चालीरीति काय होत्या याचे फारसे उल्लेख सांपडत नाहींत. उदाहरणार्थ, बुद्धधर्माचें प्राबल्य कोठें होतें हें कांहीं कालिदासीय वाङ्मय वाचून कळत नाहीं. यावरून कदाचित् या धर्मांतरामुळें अत्यंत भिन्नता आली असें मानण्याचा प्रघात तेव्हां नसेल; कसेंही असो; आर्यांचे पराक्रम आणि कर्तृत्व यांचें उत्तम स्मरण जेव्हां सर्वत्र होत होतें, आर्यसंस्कृतीचें रमणीय स्वरूप जेव्हां लोक विसरले नव्हते अशा काळचा समाज आपणांला या वाङ्मयांत भेटतो असें म्हणणें चुकीचें होणार नाहीं. कालिदासाच्या वाङ्मयांतून आर्यसंस्कृति हा पदार्थ कोणता सिद्ध होतो हें पाहण्याचा प्रयत्न आपणांस करावयाचा आहे. त सेंकरण्यापूर्वी त्याच्या काव्यसंपत्तीकडे कांहीं वेळ लक्ष देऊन तिच्या बाह्य व अंतःस्वरूपाचा थोडाबहुत परिचय करून घेण्याचा विषय आपण पुढील भागांवर सोंपवूं.

# भाग सातवा

## कालिदासाचें काव्यसौंदर्य

अर्थान्केचिदुपासते कृपणवत्केचित्त्वलंकुर्वते
वेश्यावत्खलु धातुवादिन इवोद्ध्मन्ति केचिद्रसान् ।
अर्थालंकृतिसद्रसद्रवमुचां वाचां प्रशस्तिस्पृशां
कर्तारः कवयो भवंति कतिचित्पुण्यैरगण्यैरिह ॥

या विनोदगर्भ सुभाषितांत उत्तमोत्तम कवींचें वर्णन मोठ्या चातुर्यानें केलेलं आहे. काव्यांत ध्वनि मुख्य आहे का गौण आहे ( आणि ध्वनि हा अर्थाचा अतिशय चतुर प्रकार आहे ) का मुळीं नाहींच या दृष्टीनें काव्यप्रकाशकारांनीं काव्याचे उत्तम, मध्यम आणि अधम असे भेद कल्पिलेले आहेत. ज्यांची काव्यरचना ऐकून प्रत्यक्ष सरस्वती तल्लीन होत असे अशा जगन्नाथपंडितांनीं आपल्या रसगंगाधर या ग्रंथांत काव्याचा उत्तमोत्तम म्हणून एक सर्वांत श्रेष्ठ प्रकार कल्पिलेला आहे. शब्द आणि अर्थ हे तर उत्कृष्ट असावयाचेच पण त्याही पलीकडे ( अत्यंत रमणीय शब्द-रचना व ध्वन्यर्थ याही पलीकडे ) कांहींतरी अनिर्वचनीय चमत्कृति ज्यांत आहे, आनंद ज्यांत आहे, उज्वलता ज्यांत आहे, प्रभाव ज्यांत आहे, त्याला उत्तमोत्तम काव्य म्हणावें असा या उत्कृष्ट कवीचा व महापंडिताचा आशय दिसतो. ज्या-प्रमाणें मागें आम्ही संसारांत पडलेल्या माणसांतील थोरांची धीरोदात्तता ही निराळी आणि भगवान् शंकरासारख्या जितेंद्रिय योगिराजाची धीरोदात्तता निराळी असें म्हटलें त्याप्रमाणें उत्कृष्ट कवि म्हणून ज्यांची ख्याति त्यांच्याही पलीकडे कांहीं विलक्षण अर्थव्यक्ति करणारे, त्या अर्थव्यक्तीमुळें उत्कृष्ट शब्दरचना आणि चेतोहर व्यंजना यांनाही मागें टाकणारे, गौणता देणारे असे उत्तमोत्तम कवि असतात आणि अशा उत्तमोत्तम असामान्य कवींत कालिदासाची गणना करण्यास बिलकुल प्रत्यवाय दिसत नाहीं. वर दिलेल्या सुभाषितांत तरी अशाच कवींचें थोडेंसें निराळ्या प्रकारानें वर्णन आहे. या सुभाषिताचा अर्थ खरो-खर लक्षांत ठेवण्यासारखा आहे. त्या अर्थाला श्लेषाच्या साहाय्यानें सुभा-षितकारानें रमणीयता आणली आहे. कांहीं कवि कृपण म्हणजे कवडीचुंबक माणसा-

प्रमाणें फक्त अर्थाचीच ( पैशाची ) उपासना करतात; म्हणजे या कवींचें सारें लक्ष अर्थावर, इतर काव्यगुणाकडे नसतें. दुसरे कांहीं कवि आहेत त्यांची वेश्येप्रमाणें अलंकारावर ( नटण्यावर ) भर; त्यांच्या कवितेंत अलंकार मुबलक, पण अर्थाचें सौंदर्य नाहीं का रसाचा ओलावा नाहीं. आणखी कांहीं कवि आहेत ते धातुवादी म्हणजे खनिज पदार्थांच्या ज्ञात्याप्रमाणें फक्त रसांची ( रासायनिक पदार्थांची ) सिद्धता करतात; अर्थ किंवा अलंकार यांची त्यांच्या ठिकाणीं सिद्धता नसते. अशा प्रकारचा एकेक उत्तम गुण असूनही इतर गुण नसल्यामुळें हे असले कवि त्यांना दिलेल्या उपमानांप्रमाणें ( कृपण, वेश्या आणि धातुवादी या तीन्हीही उपमानांचा उपयोग येथें निंदा करण्यासाठीं केला आहे ) दूषणीय होतात पण कधीं कधीं अतिशय पुण्याईमुळें कांहीं कवि असे निपजातात कीं त्यांची वाणी, काव्यरचना, ही मनोरम अर्थानें भरलेली, सुंदर अलंकारांनीं नटलेली आणि अंतःकरणाला हालवून सोडणाऱ्या रसांनीं थबथबलेली अशी असते आणि त्यामुळें प्रत्येक रसिक तिची प्रशंसा मुक्तकंठानें करीत असतो. अशी काव्यरचना करणारा कवि निपजण्याला अगणित पुण्य लागतें. आणि आपल्या भरतखंडाचें पुण्य खरोखर अगणित म्हणून अर्थ, अलंकार, रस, शब्दरचना म्हणजे रीति या सर्व गोष्टींत उत्तमोत्तम असा महाकवि कालिदास येथें निपजला. त्यानें आम्हांला दिलेलं वैभव शाश्वत आणि कोंणी कितीही लुटलें तरी न संपणारें म्हणून अनंत असें आहे.

शब्द, अर्थ, अलंकार आणि रस या सर्व दृष्टींनीं कालिदासाचें काव्य अत्यंत हृदयंगम आहे यांत शंका नाहीं. या ग्रंथाच्या सुरवातीला " अनामिका सार्थवती बभूव " हा कालिदासाच्या बाबतींत जुन्या काळच्या मंडळींचा अभिप्राय दिलेला आहे. कालिदासाच्या काव्यासंबधीं आणखी एकदोन सुभाषितें उद्धृत केलीं म्हणजे त्याची कीर्ति कशी अढळ आहे हें लक्षांत येतें. कालिदासाच्या बहुतेक काव्यग्रंथावर व्याख्या लिहिणारा मल्लीनाथ म्हणतो :—

**कालिदासगिरां सारं कालिदासः सरस्वती ।**
**चतुर्मुखोथवा साक्षाद्विदुर्नान्ये तु मादृशाः ॥**

" कालिदासाच्या वाणीचें, काव्याचें सार काय, त्याचा आंतील अर्थ काय हें एक प्रत्यक्ष कालिदासाला पूर्णपणें माहीत, किंवा सरस्वतीला किंवा साक्षात् चतुर्मुख ब्रह्मदेवाला. माझ्यासारख्या इतरांना तें कळणार नाहीं. " आणि " नान्ये तु

मादृशाः" म्हणणारा हा मल्लीनाथ म्हणजे कांहीं सामान्य प्रकरण नव्हतें. तो स्वतः उत्कृष्ट विद्वान् पंडित आणि रसिक कवि होता. तसेंच पुढील सुभाषित पहा :—

**निर्गतामलवाक्यस्य कालिदासस्य सूक्तिषु ।**
**प्रीतिर्मधुरसार्द्रासु मंजरीष्विव जायते ॥**

गोड आणि रसरशीत अशा मोहराबद्दल जशी आपल्याला गोडी वाटते तशी गोडी ज्याच्या ( लेखणींतून ) निर्मळ वाक्यें बाहेर पडतात अशा कालिदासाच्या सुंदर काव्याबद्दल वाटतें.

किंवा हें आणखी एक सुभाषित पहा :—

**साकूतमधुरकोमलविलासिनीकंठकूजितप्राये ।**
**शिक्षासमयेपि मुदे रतलीलाकालिदासोक्ती ॥**

त्याचप्रमाणें कालिदासाच्या काव्याला द्राक्षारसपाक असें नांव पंडितांनीं दिलें आहे. प्रसाद आणि माधुर्य हे गुण त्यांत अतिशय आहेत आणि शब्दरचना गोड असल्यामुळें काबुली द्राक्षासारखी ती म्हणतां म्हणतां कंठांत विरघळते. तसेंच कालिदासाच्या उपमाचातुर्याचीही प्रशंसा रसिकांनीं फार केलेली आहे.

संस्कृत साहित्यशास्त्रांत शब्दरचनेच्या रीति अनेक सांगितल्या आहेत. पण शब्दांचे तीन गुण प्रसाद, माधुर्य आणि ओज यांना अनुसरून मुख्यत्वेंकरून तीन रीति ( यालाच इंग्रजींत Style म्हणतात ) प्राह्य धरणें सोईस्कर होईल. आतां हे जे गुण ते बाह्यतः शब्दांवरून आपण पहातों; पण हे गुण वास्तविक रसांतूनच प्रत्ययाला येतात म्हणजे शब्दरचनेंत रस असल्याशिवाय हे गुण आहेत असें म्हणतां येणार नाहीं. शौर्य हा गुण जसा मनुष्याचा म्हणजे मनुष्याच्या आकाराचा नव्हे तर त्याच्या आत्म्याचा, त्याचप्रमाणें उपरोक्त गुण हे शब्दांचे, म्हणजे शब्द हे रसप्रकाशक आहेत म्हणून त्यांचे; एरव्हीं काव्याचा आत्मा जो रस त्यांतूनच हे प्रतीत होतात. रसशून्य शब्दरचना कितीही चमत्कृतियुक्त असली तरी तिला काव्य म्हणतां येत नाहीं; इतकेंच नव्हे तर केवळ अर्थचमत्कृति आहे तर तेथेंही रसाची सिद्धि असल्याशिवाय काव्य आहे असें म्हणतां येत नाहीं. तेव्हां या बाबतींत काव्यप्रकाशकर्त्याचें मत

**आत्मन एव हि यथा शौर्यादयो नाकारस्य**
**तथा रसस्यैव माधुर्यादयो गुणा न वर्णानाम् ।**

हेंच ग्राह्य धरावें हें इष्ट आहे. आतां या तीन गुणांमुळें शब्दरचनेचे म्हणजे रीतीचे तीन प्रकार मुख्यत्वेंकरून होतात. त्यांत तीनींतही वैदर्भी आणि गौडी या दोन रीति विशेष प्रसिद्ध आहेत. माधुर्यगुणयुक्त शब्दरचनेला वैदर्भी किंवा उपनागरिका रीति म्हणतात. ओजोगुणयुक्त शब्दरचनेना गौडी किंवा परुषा ( कठोर ) रीति म्हणतात. प्रसादगुणयुक्त शब्दरचनेला कोमला किंवा पांचाली रीति म्हणतात. काव्यप्रकाशकार पुढें सांगतात कीं कोमला रीतीला कोणी ग्राम्या रीति म्हणतात. हिला ग्राम्या किंवा गांवढळ म्हणण्याचें कारण ही साधी, सरळ असते व हिच्यांत कांहीं ढंग नसतो. आणि काव्यांत कांहीं तरी ढंग, ऐट, विशेष मजा ही असली पाहिजे. शिवाय प्रसादगुण म्हणजे स्वच्छपणाचा गुण म्हणजे शब्दांचा अर्थ शब्दरचनेंत सरळपणें, विशेष क्लेश न होतां, स्पष्ट होण्याचा गुण हा सर्वच शब्दरचनेंत असावा हें इष्ट आहे. हा गुण सर्वसामान्य आहे. माधुर्य किंवा ओजस् या गुणांबरोबर देखील प्रसाद हा लागतोच. ( प्रसाद म्हणजे देवाचा, गुरूचा वगैरे प्रसाद, आशीर्वाद व त्यामुळें झालेलें काव्य तें प्रासादिक हा मराठींत प्रचलित असलेला आश्चर्यकारक अर्थ साहित्यशास्त्राच्या कोणत्याही ग्रंथांत मिळणार नाहीं. ) तेव्हां अंगदीं सुबोध अशा वाक्यरचनेला पांचाली, कोमला, किंवा ग्राम्य म्हणजे साधी रीति म्हणतां येईल. तेव्हां अर्थात् वैदर्भी व गौडी या रीतींचा उल्लेख विशेषेंकरून संस्कृत ग्रंथांत आढळतो. शब्दरचनेंत विशेषतः माधुर्य असलें म्हणजे वैदर्भी व विशेषतः ओज असलें म्हणजे गौडी. या दृष्टीनें विचार करतां कालिदासाची रीति वैदर्भी आहे असें आपल्या सहज लक्षांत येईल. कालिदासाचें काव्य प्रसादयुक्त तर आहेच म्हणून त्याच्या रचनेंत पांचाली रीति आहे असेंही म्हणतां येईल. पण प्रसाद हा स्वभावगुण उत्तम काव्यांत पाहिजेच. त्याच्या पार्श्वभूमिकेवर माधुर्यगुणाचा उठाव झालेला कालिदासीय काव्यांत दिसून येतो. भवभूति हा गौडी रीतीचा बहुधा आश्रय करतो असें म्हणण्यास हरकत नाहीं. या वैदर्भी रीतींत जयदेव व जगन्नाथ हे पुष्कळ वेळां कालिदासावरही मात करतात असें म्हणण्यास हरकत नाहीं. असो. रीतीसंबंधीं याहून अधिक विवेचनाची आवश्यकता नाहीं. तेव्हां आतां आपण रस, अर्थ, अलंकार इत्यादि प्रकारांत कालिदास कसा श्रीमान् आहे हें पाहूं.

२. कालिदासाच्या काव्यांतील रससंपत्तीकडे आतां वळावयाचें. त्याच्यापूर्वी रसासंबंधीं अगदीं थोडक्यांत कां होईना, पण आपणांस माहिती पाहिजे. जिचा प्रवाह अविच्छिन्न आहे, अखंड आहे, म्हणजे जिच्यांत स्थैर्य आहे, चांचल्य नाहीं अशी जी भावना म्हणजे अंतःकरणवृत्ति तिला स्थायी भाव अशी संज्ञा आहे. हे स्थायी भाव निरनिराळे आठ किंवा नऊ आहेत. कोणी त्याहून कमीअधिक कल्पितात. हा स्थायी भाव जेव्हां काव्यांत व नाटकांत वगैरे त्या स्थायी भावाला कारणीभूत होणारे विभाव, त्याचें कार्यरूप म्हणजे परिणामरूप असणारे अनुभाव व त्याला ( स्थायी भावाला ) साहाय्य करणारे, त्याचें पोषण करणारे व्यभिचारी भाव यांच्या योगानें ( हे प्रकट झाल्यामुळें ) व्यक्त होतो तेव्हां त्या स्थायी भावावर उभारलेला रस निर्माण झाला असें म्हणतात, म्हणजे त्या स्थायी भावालाच अशा प्रकारें तो व्यक्त झाला म्हणजे रस असें म्हणतात. या बाबतींत नाट्यशास्त्राचा प्रणेता भरत याचें सूत्र लक्षांत ठेवण्यासारखें आहे—

विभावानुभावव्यभिचारिसंयोगाद्रसनिष्पत्तिः ।

म्हणजे विभाव, अनुभाव आणि व्यभिचारि भाव यांचा संयोग झाला म्हणजे रस उत्पन्न होतो. उदाहरणार्थ, आपण पहिला रस शृंगार हा घेऊं. हा रति म्हणजे परस्परांची उपभोगेच्छा किंवा परस्परांचें अत्यंत प्रेम ( एकत्र असण्याची तीव्र इच्छा ) या स्थायी भावावर उभारलेला आहे. एखादी सुंदर स्त्री एखाद्या रम्य उद्यानांत संध्याकाळच्या वेळीं दृष्टीस पडते. या ठिकाणीं स्त्री हा आलंबनविभाव आहे व आलंबनविभावाबद्दल भावना उद्दीपित करण्याला तें त्या वेळचें उद्यान साहाय्यभूत होतें म्हणून त्याला उद्दीपनविभाव असें नांव दिलें आहे. आतां आलंबनविभाव हें उद्दीपनविभावापेक्षांही प्रेम ही भावना उत्पन्न होण्याला अधिक कारणीभूत आहे किंबहुना ती उत्पन्न होण्याला स्त्री प्रधान कारण आहे व उद्यान हें गौण कारण आहे असें म्हणतां येईल. पण वास्तविक आलंबन ( स्त्री ) व उद्दीपन ( उद्यान ) मिळून रति या भावाचें संपूर्ण कारण होतात असेंच म्हणणें युक्त होईल. अतिशय सुंदर स्त्रीसुद्धां सकाळच्या वेळीं ओकाऱ्या काढीत बसलेली किंवा कोळशाच्या पोत्यांतून कोळसे काढीत असलेली दिसली तर भावना उत्पन्न करीलच असें नाहीं. म्हणून आलंबन व उद्दीपन मिळून स्थायीभावाचें कारण समजावें. केवळ उद्दीपन हें कारण आलंबन जर नसेल तर होऊंच शकणार नाहीं; म्हणून आलंबनविभावाला प्रधानत्व देतां येईल. आतां उद्यानस्थ स्त्रीकडे पाहून नायकाच्या मनांत प्रेमभावना ( रति )

उत्पन्न झाली; ती जेव्हां अविच्छिन्न प्रवाहाच्या स्वरूपाची म्हणजे स्थिर अशा स्वरूपाची होईल तेव्हांच तेथें रस निर्माण झाला असें म्हणतां येईल. तो झाला किंवा नाहीं हें परिणामावरून ओळखावयाचें. या परिणामांना अनुभाव म्हणतात. आतां ती स्त्री पाहून कटाक्षक्षेप, भुजाक्षेप किंवा अलीकडच्या थोडक्या विनोदी भाषेंत बोलायचें म्हणजे काव्यरचना, गुडघे टेकून विनवणी वगैरे क्रिया होतील तेव्हां ही रतिभावना निर्माण झाली असें प्रत्ययाला येतें. त्याचप्रमाणें ही स्त्री मिळेल का नाहीं अशी शंका येऊन सगळें जग शून्य वाटावयास लागणें वगैरे सहकारी म्हणजे व्यभिचारी भावही उत्पन्न होतात. नायकाला हीं लक्षणें झालेलीं दिसूं लागलीं म्हणजे त्याच्या अंतःकरणांत शृंगाररसाचा उदय झाला आहे असें समजावें. इतर रसाच्या बाबतींतही कांहीं कारणामुळें (विभावामुळें) रस निष्पन्न होतो व तो निष्पन्न झाला आहे असें कांहीं कार्यामुळें, परिणामामुळें (अनुभवामुळें) आणि तीं कार्यें स्पष्ट करणाऱ्या कांहीं गोष्टींमुळें (म्हणजे व्यभिचारी भावामुळें) आपल्यास समजतें.

हे रस नऊ आहेत असें समजतात. पहिला शृंगार; त्याचा स्थायी भाव रति हा आहे. दुसरा हास्य, याचा स्थायी भाव हास (गंमत वाटणें) हा आहे; तिसरा करुण, याचा स्थायीभाव शोक हा आहे; चौथा रौद्र, याचा स्थायीभाव क्रोध; पांचवा वीर, याचा स्थायी भाव उत्साह; (क्रोधाचें भाषण किंवा दणदणीत आणि सणसणीत शब्दरचना म्हणजे वीररस नव्हे हें यावरून स्पष्ट होईल); सहावा भयानक, याचा स्थायी भाव भीति वाटणें; सातवा बीभत्स, याचा स्थायी भाव जुगुप्सा म्हणजे चिळस येणें; आठवा अद्भुत, याचा स्थायीभाव विस्मय वाटणें, आश्चर्य वाटणें हा आहे आणि शेवटचा शांतरस हा नववा; याचा स्थायी भाव निर्वेद म्हणजे वैराग्य उत्पन्न होणें हा आहे. काव्यनाटकाच्या प्रपंचांत निर्वेदाला— शांत रसाला प्रथम मान्यता नव्हती; पण आतां शांत रस हा सर्वमान्य झालेला आहे. शृंगाराचे दोन प्रकार कल्पिलेले आहेत. एक नायक-नायिका सन्निध असतांना निष्पन्न होणारा तो संभोग शृंगार आणि एक त्यांचा विरह झाला म्हणजे निष्पन्न होतो तो विप्रलंभ शृंगार. शाकुंतलांत पहिल्या व तिसऱ्या अंकांत संभोग शृंगार हा रस आहे; मेघदूतांत आणि विक्रमोर्वशीयांत विप्रलंभ शृंगार आहे. काव्यरचनेंत पुष्पमालेंत जसें सूत्र तसा रस खेळत असला पाहिजे. शृंगार रसावर बहुतेक कवींचा भर आहे यांत नवल नाहीं. कारण स्त्रीपुरुषांची परस्पर प्रेमभावना ही या

जगतांतील अत्यंत साहाजिक आणि महत्त्वाची गोष्ट आहे. शाकुंतलाच्या पहिल्या अंकांत शृंगार रसाचा कसा उदय झाला हें लक्षपूर्वक पहाण्यासारखें आहे. मृगया करीत असतांना अरण्याच्या तपोभूमींत दुष्यंत राजा प्रवेश करतो व तेथें

न खलु न बाणः संनिपात्योयमस्मिन्
मृदुनि मृगशरीरे पुष्पराशाविवाग्निः।

"छे! छे! हरणाच्या त्या कोमल शरीरावर तुझ्या बाणांचा मारा करूं नकोस. फुलांच्या राशींत अग्नि सोडावा तसें तुझें करणें होईल" अशी आश्रमवासी तापसाची हांक त्याला ऐकूं येते. एकदम मृगयेचें, शस्त्रयोजनेचें, वातावरण बदललें असें वाटतें आणि मृदुमृगशरीर आणि पुष्पराशि या शब्दांनींच शृंगार रसाचा उद्दीपन विभाव सिद्ध होत आहे असें वाटतें. पुढें तो तापसी त्याला सांगतो:—

"आपली कन्या शकुंतला हिची अतिथिसत्कारासाठीं योजना करून म्हणजे कोणी आलें गेलें तर त्याची व्यवस्था ठेव असें तिला सांगून कुलपति कण्व सोमतीर्थाला गेले आहेत."

म्हणजे शकुंतलेसारखें सौंदर्यनिधान कन्यारत्न तेथें आहे व ती आश्रमांत एकटीच आहे हें राजाला कळलें. त्यामुळें उद्दीपन विभावांत आणखी भर पडते. येथें कवीनें एक चातुर्य लढविलें आहे. कण्व सोमतीर्थाला कशासाठीं गेला आहे तर शकुंतलेवर कांहीं संकट येणार आहे त्याचें कांहीं जपजाप्य करून शमन करावें यासाठीं, असें तो तापसी म्हणतो. म्हणजे नाटकाच्या संपूर्ण कथानकाची ही पूर्वसूचना कवि अगदीं थोडक्यांत देतो व ती सूक्ष्मदृक् आणि ध्वनि ग्रहण करणाऱ्या वाचकाला पटते; शकुंतलेचें प्रतिकूळ दैव प्रत्यक्ष दुष्यंताच्या रूपानें तेथें उभें होतें. राजा म्हणतो—"हरकत नाहीं. कुलपति नसले तरी मी शकुंतलेला भेटतों; म्हणजे माझी कण्वासंबंधीं केवढी भक्ति आहे ती तीच त्यांना सांगेल." आश्रमांतील शांत वातावरण पाहून राजा प्रसन्न होतो. नंतर तो रथांतून उतरून आपलें धनुष्यबाण सारथ्याच्या हवालीं करतो व मग एकटाच आश्रमाकडे जातो. शकुंतला आश्रमांत एकटी ही त्याची समजूत; व हाही एकटा; अशा प्रकारें उद्दीपन विभावाची आणखी अधिक सिद्धता होते. नंतर आश्रमाजवळच्या उद्यानांत त्याला ऋषिकन्यका दिसतात व प्रथम त्या सर्वांना पाहून तो खूष होतो आणि म्हणतो "अहो मधुरमासां दर्शनम्"—काय गोड दिसतात या मुली!

या दर्शनमाधुर्यांत शृंगार रस उत्पन्न होण्याचें पूर्वचिन्ह आहे हें उघड आहे. पुढें तो म्हणतो कीं अंतःपुरांतील स्त्रियांपेक्षांही या मुली सुंदर आहेत आणि अशा प्रकारें सहकारी ( व्यभिचारी ) भाव उत्पन्न होऊं लागले. आणि नंतर शकुंतला त्याच्या दृष्टीस पडते. तिची सखी तिची चेष्टा करीत आहे. ती म्हणते—"तुझ्या पित्याला हे आश्रमांतले वृक्षच तुझ्याहून अधिक प्रिय आहेत. नाहीं तर तुझ्या-सारख्या नाजूक मुलीला त्यांनीं झाडांच्या आळ्यांत पाणी घालण्याचें कठीण काम सांगितलें नसतें." तेव्हां शकुंतला उत्तर देते—"बाबांनीं सांगितलें आहे म्हणूनच कांहीं मी पाणी घालीत नाहीं; मला कीं नाहीं हे सारे वृक्ष भावंडासारखे वाटतात." अगोदरच शकुंतलेच्या लावण्यानें चीत झालेला राजा हें संभाषण ऐकून स्वतःची परिस्थिति विसरतो आणि येथून रतिभाव स्पष्टपणें उत्पन्न झालेला आहे. शकुंतलेला काम सांगणाऱ्या कण्वाचा त्याला राग येतो हा त्या भाव-नेचा परिणाम होय. म्हणजे येथें विभाव, अनुभाव, सहकारी भाव सर्व प्रकार आले आणि त्यामुळें रतिभावाची प्रचीति आली. नंतर राजा हळूहळू शकुंतलेच्या शरीराचें बारकाईनें निरक्षण करून त्याचें वर्णन करूं लागतो आणि वल्कलें नेस-लेलीं ती होती तरी अतिशय सुंदर दिसते असें म्हणून तो पुढील सर्वमान्य तत्त्व सांगतो :—

**किमिव हि मधुराणां मंडनं नाकृतीनाम् ।**

जेथें आकृति, स्वरूप गोड आहे तेथें कोणताही पदार्थ अलंकाररूपच होतो. ( जातीच्या सुंदरांना कांहींही शोभतें ). यावेळीं शकुंतला व तिच्या मैत्रिणी यांचें जें संभाषण होतें तेंहि स्थायी भाव पुष्ट करण्याजोगेंच असतें आणि अशा प्रकारें राजाच्या अंतःकरणांत उत्पन्न झालेली भावना बळावत जाते व तिच्या लालबुंद ओंठांचें वगैरे तो कवीसारखा वर्णन करूं लागतो आणि हिची आप-णांस प्राप्ति झाली पाहिजे असा अभिलाष त्याच्या मनांत उत्पन्न होतो.

या वेळीं असा चमत्कार होतो कीं एक भुंगा फुलावरून उठून शकुंतलेच्या मुखाभोंवतीं गुणगुण करावयास लागतो. त्यावेळीं राजाला (तो आतां पूर्णपणें कामी बनलेला असतो ) वाटतें कीं आपण हा भ्रमर असतों तर काय मौज झाली असती ! या वेळीं त्यानें म्हटलेला श्लोक संभोग शृंगार या रसाचा उत्कर्ष दाखवितो.

चलापांगां दृष्टिं स्पृशसि बहुशो वेपथुमतीं
रहस्याख्यायीव स्वनसि मृदु कर्णान्तिकचरः ।
करं व्याधुन्वत्याः पिबसि रतिसर्वस्वमधरं
वयं तत्वान्वेषान्मधुकर हतास्त्वं खलु कृती ॥

"ज्यांच्यांत कंप भरलेला आहे अशा तिच्या नेत्रांना तूं वरचेवर स्पर्श करीत आहेस; जशी कांहीं अगदीं गुप्त गोष्ट तिला सांगायची म्हणून तिच्या कानांत जाऊन गुणगुणतो आहेस; ती जरी हातांनीं तुला दूर करण्याचा प्रयत्न करीत आहे तरी तिच्या अत्यंत गोड अशा ओंठांचें चुंबन तूं घेतो आहेस. ती कोण हें हुडकण्यांत आम्ही मात्र स्वस्थ बसून फुकट गेलों. तूं धन्य खरा!" शाकुंतलाच्या तिसऱ्या अंकांतही हाच रस प्रमुख आहे. विक्रमोर्वशीय व मालविकाग्निमित्र या नाटकांतही हाच रस प्रमुख आहे. विक्रमोर्वशीयांत आणि मेघदूतांत विप्रलंभ शृंगार आहे. कुमारसंभवांतही शिवपार्वतीचें लग्न झाल्यावर आठव्या सर्गांत संभोग शृंगाराचेंच प्रामुख्य आहे व तेथें उत्तानपणा इतका आहे कीं त्यावर अश्लीलत्वाचा आरोप कित्येक लोक करतात याचा पूर्वी उल्लेख केलेलाच आहे. रघुवंशांत उत्तान स्वरूपांत शृंगार असा कोठें नाहीं, किंबहुना या काव्यांत शृंगार रसाला फारसें प्राधान्य कोठेंही नाहीं. परंतु सहाव्या सर्गांत इंदुमतीच्या स्वयंवरप्रसंगीं आलेल्या राजेलोकांनीं विविध शृंगारचेष्टा केल्या असें वर्णन आहे. निरनिराळ्या खाणाखुणांनीं आपणांलाच माळ घालावी असें त्यांनीं सुचविलें. हें सर्व वर्णन शृंगारगर्भ आहे. त्यांपैकीं कांहीं भाग येथें देण्यास हरकत नाहीं. आणि या शृंगारचेष्टा करणारे राजे नापसंत कां झाले हेंही कवीनें जातां जातां ध्वनित केलें आहे.

कश्चित्कराभ्यां उपगूढनाल–
मालोलपत्राभिहतद्विरेफम् ।
रजोभिरंतःपरिवेषबंधि
लीलारविंदं भ्रमयांचकार ॥ ६–१·३ ॥

एका राजानें ज्याला नाल आलेला आहे, आणि ज्याच्या हलणाऱ्या पानांमुळें (त्यावर जमलेल्या) भ्रमरांना तडाखे बसत होते आणि परागामुळें ज्याच्या आंत वर्तुळाकार मंडळ बनलें होतें असें खेळण्याचें कमळ फिरविण्याला सुरवात केली.

त्याचा आशय हा कीं हातांतल्या या कमळाप्रमाणें तूं मला वाटेल तशी फिरवूं शकशील, मी सर्वस्वीं तुझ्या स्वाधीन, आज्ञेंत राहीन. पण उगाच सारखे हात फिरवीत बसणें हें अपलक्षण समजलें आहे; तेव्हां हा आपला पति होण्याला योग्य नाहीं हें त्या हस्तघूर्णनावरून इंदुमतीनें ठरविलें.

दुसरा एक फाकडोजीराव राजा होता. त्यानें

**विस्रस्तमंसादपरो विलासी**
**रत्नानुविद्धांगदकोटिलग्नम्।**
**प्रालंबमुत्कृष्य यथावकाशं**
**निनाय साचीकृतचारुवक्त्रः॥ ६-१४**

रत्नखचित केयूराच्या टोकाला अडकलेली आणि खांद्यांवरून गळून पडलेली माळ हळूहळू उचलली आणि आपला गोंडस चेहरा वाकडा करून ती जेथल्या तेथें ठेविली. आंगावरचें वस्त्र उचलण्याच्या निमित्तानें मी तुला याप्रमाणें आलिंगन देईन असें त्या राजानें सुचविलें. पण हें आंगाचें वस्त्र नीटनेटकें करण्याची धांदल पाहून ( माळ जेथल्या तेथें ठेवतांना झालेली ) याला कांहींतरी लपवून ठेवावयाचें आहे म्हणून इंदुमतीनें त्याच्याकडून दृष्टि फिरविली. असल्या फाजिलपणाच्या खाणाखुणा करून कुलकन्यका गळ्यांत माळ घालीत नसतात हेंहि कवीनें सुचविलेलें दिसतें. तिसऱ्या एका राजानें ज्या सिंहासनावर तो बसला होता त्याच्या डाव्या बाजूला हात जरा उंच ठेवला आणि अशा प्रकारें त्याचा डावा खांदा उंच झाला आणि आपली पाठ त्या बाजूला थोडी वळवून तो आपल्या मित्राबरोबर बोलूं लागला. त्याचा आशय हा कीं पत्नी ही वामांगी; तेव्हां तिच्याबरोबर मी असा बोलत राहीन. पण इंदुमतीला सर्व लक्षणें कळत होतीं. तिनें पाहिलें कीं याला अशी तोंड फिरविण्याची, पाठ फिरवण्याची संवय; याच्या हातून कांहीं कार्य व्हावयाचें नाहीं; आणि म्हणून त्याला तिनें नापसंत केलें. अशा तऱ्हेनें कोणी कांहीं कोणी कांहीं युक्त्या करून आपला अभिप्राय तिला कळावा असा प्रयत्न करीत होता आणि तिला ते सर्व शृंगारचेष्टा करणारे राजे पोरकट आणि अवलक्षणी वाटले असें थोडेंसें सूचितार्थानें वर्णन करून कवीनें त्यांच्या शृंगारचेष्टांची शुद्ध मराठींत सांगावयाचें म्हणजे चेष्टा केली आहे.

२ शृंगाराचा दुसरा प्रकार म्हणजे विप्रलंभ शृंगार होय. प्रियकराचा किंवा प्रियकरिणीचा विरह होऊन परस्परांच्याबद्दल जी अत्युत्कट रतिभावना उत्पन्न होते तिला विप्रलंभ शृंगार म्हणावयाचें. हा विरह आत्यंतिक म्हणजे मृत्यूच्या स्वरूपाचा किंवा तशाचसारखा असून चालत नाहीं. तसा असल्यास त्याची करुण रसांत गणना होते. आणि अशा प्रकारें कधीं कधीं विप्रलंभ शृंगार आणि करुण यांबद्दल घोटाळा उत्पन्न होण्याचा संभव असतो. उत्तररामचरितांत सीता जीवमान आहे, पण रामचंद्राचें आणि तिचें नातें सर्वथा संपलेलें होतें; म्हणून त्या नाटकांत उत्पन्न झालेला रस विप्रलंभ शृंगार नसून करुण आहे, व आपल्या नाटकांत करुण रसाचाच आविष्कार आहे हें भवभूतीनेंही स्पष्टपणें सांगितलेलें आहे. कुमारसंभवांतील रतिविलाप व रघुवंशांतील अजविलाप हीं करुणरसाचीं फार मनोरम स्थानें आहेत. विप्रलंभ शृंगार विक्रमोर्वशीयाच्या चौथ्या अंकांत आणि मेघदूत या खंडकाव्यांत उत्कृष्ट प्रकारें प्रकट झालेला आहे. मागें व्यभिचारी भाव सांगितले. शृंगार रसाच्या अनेक व्यभिचारी भावांपैकीं उन्माद हा आहे. हा संभोग आणि विप्रलंभ या दोन्ही प्रकारांत संभवतो. विक्रमोर्वशीयांत पुरूरव्याला उन्माद झाला होता, ऊर्वशीच्या विरहानें त्याचें डोकें हलकें झालें होतें असें तेथें स्पष्टपणेंच सांगितलें आहे. (इति प्रविशत्याकाशबद्धलक्ष्यः सोन्मादो राजा ।—आकाशाकडे टक लावून पहाणारा ज्याला उन्माद झाला आहे असा राजा प्रवेश करतो.) या राजाला उन्माद म्हणजे भलताच झाला होता. तो जनावरांशीं बोलत काय होता, झाडा-झुडपांना मिठ्या काय मारीत होता, मध्येंच नाचत होता तर मध्येंच बेशुद्ध पडत होता, एकदां संस्कृतांत श्लोक म्हणे तर एकदां प्राकृतांतच ताना मारी; अशी बिचाऱ्याची मोठी कठीण अवस्था झाली होती. आणि शेवटीं नाचत बागडत गात असतांना त्याला नशीबानें संगमनीय मणि मिळाला. तो घेऊन त्यानें एका लतेला मिठी मारली आणि तेथें ऊर्वशी प्रकट झाली अशी कथा आहे. या विप्रलंभ शृंगारांत जिचा विरह झाला आहे तीच स्त्री आलंबन विभाव असते व तिचें तीव्र-पणानें स्मरण करून देणारी परिस्थिति, पदार्थ आणि प्राणी, हे उद्दीपन विभाव होतात. ऊर्वशीला राक्षसानें पळवून नेली ही गोष्ट राजाच्या मनांत घोळत होती आणि जरी त्याचें डोकें फिरल्यासारखें झालें होतें तरी ती गोष्ट त्यांतून अर्थात् गेली नव्हती. त्या स्थितींत तो भ्रांतिष्ट झाला होता असें म्हणण्यास हरकत नाहीं.

या भ्रांतिष्ट स्थितींत भ्रांतिमान् अलंकाराचा उपयोग विप्रलंभ शृंगाराच्या पार्श्व-भूमीवर कवीनें फारच मनोरम रीतीनें साधला आहे.

नवजलधरः सन्नद्धोऽयं न दृप्तनिशाचरः ।
सुरधनुरिदं दूराकृष्टं न नाम शरासनम् ॥
अयमपि पटुर्धारासारो न बाणपरंपरा ।
कनकनिकषस्निग्धा विद्युत्प्रिया न ममोर्वशी ॥ विक्रमः ४–७

राजाला तो राक्षस क्षणमात्र दिसल्याचा भास झाला व त्याच्याजवळ आपली प्रिया ऊर्वशी आहे असें त्याला वाटलें. पण तें वाटणें केवळ भ्रांतिमय होतें. त्याला दिसला तो गर्विष्ठ राक्षस दिसला नाहीं; तो नवा मेघ होता. त्या राक्षसानें लढाई करण्यासाठीं धनुष्य ओढलें आहे असें त्याला वाटलें होतें; पण नाहीं, तें इंद्र-धनुष्य होतें आणि तें लांबपर्यंत पसरलेलें होतें. त्या धनुष्यांतून बाणांचा वर्षाव होत आहे असें तो समजत होता; पण नाहीं, त्या पावसाच्या सरीवर सरी येत होत्या; आणि सुवर्णपुंजासारखी तळपणारी आणि सुंदर दिसणारी ती ऊर्वशी नव्हती; ती त्यावेळीं चमकणारी वीज होती! उन्माद अवस्थेंतील भ्रांतीचें हें उदाहरण मोठें सुंदर आहे यांत शंका नाहीं. त्या अरण्यांत राजा ऊर्वशीला भ्रमिष्ट-पणानें शोधीत भटकतो. एकदां त्याला नूपुरांचा आवाज ऐकूं आल्यासारखें वाटून ऊर्वशी जवळच असावी असें वाटलें. पण तसें नव्हतें.

मेघश्यामा दिशो दृष्ट्वा मानसोत्सुकचेतसा
कूजितं राजहंसेन नेदं नूपुरशिंजितम् ॥

मेघांनीं भरून गेल्यामुळें दिशा काळ्याकुट्ट झाल्या तेव्हां मानस सरोवराला पाण्यासाठीं उत्सुक झालेल्या राजहंसानें कूजन करण्यास सुरवात केली. त्याचा हा गोड आवाज आहे; ही नूपुरांची रुमझुम नव्हे.

पण राजाला काय? हा राजहंस मानस सरोवराकडे चाललेला आहेना? तर तो जाण्यापूर्वी त्याला आपल्या प्रियेची कांहीं हकीकत कळली आहे का म्हणून विचारावें असें त्यानें ठरविलें. तो म्हणाला, ‘हे विहंगमराजा, तूं आतां मानस सरोवराला जाणार; तेव्हां तुला बरोबर फराळाचें घेतलें पाहिजे. त्यासाठीं कमळांतील पराग मग गोळा कर. प्रथम माझ्या दयितेची कांहीं हकीकत सांगून मला

यातनांतून सोडीव. सज्जनांना स्वार्थापेक्षां प्रणयी माणसांला साहाय्य करणेंच श्रेष्ठ वाटतें. राजाची ही विनवणी त्या हंसानें अर्थात् ऐकिली नाहीं. तेव्हां राजा म्हणतो—या बेट्याला मानस सरोवराकडे जाण्याची फारच घाई झालेली आहे. माझे शब्द यानें ऐकलेसुद्धां नाहींत. मग तो रागानें त्या राजहंसाला म्हणतो, माझी प्रिया या सरोवराच्या कांठावर जर तुझ्या दृष्टीस पडली नाहीं म्हणतोस तर तिचें तें डौलानें आणि गोडपणानें पाऊल टाकणें हें तूं कोठें शिकलास? हंसा, माझी कांता मला दे. तिची चालण्याची ढब तूं घेतलेली आहेस. तेव्हां ती कोठें आहे तें तुला माहीत असलेंच पाहिजे. आणि अशा प्रकारें राजाची ती भ्रमिष्ट स्थिति विप्रलंभ शृंगाराचा परिपोष करिते.

विप्रलंभ शृंगार रसाचें सुंदर उदाहरण म्हणजे मेघदूत होय. कोणा एका यक्षाचें आपल्या कामाकडे दुर्लक्ष झालें, तेव्हां त्याला त्याच्या धन्यानें म्हणजे धनपतीनें ( कुबेरानें ) शाप दिला म्हणजे शिक्षा केली. त्या शापामुळें त्याचा मोठेपणा सारा नाहींसा झाला ( ज्या पदवीवर तो होता ती गेली ) आणि एक वर्षभर कुबेरनगरींतून त्याला बाहेर जावें लागलें आणि अशा प्रकारें एक वर्षभर पत्नी-वियोग सहन करणें त्याच्या कपाळीं आलें. तेव्हां त्यानें रामगिरीवर म्हणजे चित्रकूट नांवाच्या डोंगरावर त्या वर्षभर वसति केली. चित्रकूटावर रामलक्ष्मण-सीता यांनीं वनवासांतील कांहीं दिवस काढले होते म्हणून त्या रामगिरीजवळची नदी मंदाकिनी आणि तेथील सर्व वृक्ष वगैरे हे पवित्र झालेले होते. येथें मूळांत "रामगिर्याश्रमेषु" असें म्हटलें आहे म्हणजे त्या यक्षानें रामगिरीवर निरनिराळ्या आश्रमांत वस्ती केली. त्यावरून त्याचा पाय आणि म्हणून त्याचें चित्त एका ठिकाणीं ठरत नव्हतें; म्हणजे त्याचें चित्त ठिकाणावर नव्हतें; म्हणजे त्याला उन्माद झाला होता असें मल्लीनाथानें

**अत्र रसो विप्रलंभाख्यः शृंगारः । तत्राप्युन्मादावस्था ।**
**अतएव एकत्र अनवस्थानं सूचितं आश्रमेषु इति बहुवचनेन ।**

असें आपल्या व्याख्येंत स्पष्ट केलें आहे. या यक्षाला पावसाळा आला तेव्हां घरीं पत्नीजवळ असावें अशी उत्सुकता उत्पन्न झाली. आषाढ महिन्याच्या सुरवा-तीच्या दिवशीं त्याला मेघ दिसला आणि त्या मेघाबरोबर त्यानें आपल्या प्रिय पत्नीला संदेश पाठविला. या अत्यंत लहान अशा कथानकावर कालिदासानें या

अत्यंत मधुर अशा खंडकाव्याची रचना केली आहे. येथें अर्थात् यक्षपत्नी ही आलंबनविभाव आहे आणि वर्षाकाळाचें आगमन, मेघाचें दर्शन वगैरे उद्दीपन-विभाव आहेत. मेघाला पाहून त्याच्या बरोबर संदेश पाठविण्याला उद्युक्त झालेला हा यक्ष उन्मादावस्थेंत होता हें स्पष्टच आहे. कारण, कवि म्हणतो,—

धूमज्योतिः सलिलमरुतां संनिपातः क्व मेघः
संदेशार्थाः क्व पटुकरणैः प्राणिभिः प्रापणीयाः ।
इत्यौत्सुक्यादपरिगणयन्गुह्यकस्तं ययाचे
कामार्ता हि प्रकृतिकृपणाश्चेतनाचेतनेषु ॥

धूर, तेज, पाणी आणि वारा यांच्या संयोगानें झालेला मेघ कोणीकडे आणि चांगलीं हुषार इंद्रियें असणाऱ्या माणसांनीं पोंचवावयाचे निरोप कोणीकडे ? ( तेव्हां असे निरोप मेघाकडून पाठविण्याची कल्पना ठिकाणावर असलेल्या माण-सांची नव्हे. ) पण त्या यक्षानें आपल्या प्रियेला संदेश पाठविण्याच्या उत्सुकतेच्या भरांत या कोणत्याही गोष्टीचा विचार न करतां मेघाजवळ याचना केली; कारण कामार्त जीं माणसें आहेत त्यांना सचेतन व अचेतन यांतील अंतरसुद्धां कळत नाहीं. मेघदूताविषयीं पुनः आपल्याला एकदां विचार करावयाचा आहे. सध्यां त्यांत विप्रलंभ शृंगाराचा कसा परिपोष झालेला आहे एवढेंच पहाण्याची आपली दृष्टि आहे.

यक्ष मेघाला म्हणतो—तूं माझ्या पत्नीला जाऊन भेट. जरी ती माझ्या विरहानें पोळलेली आहे तरी एका वर्षानंतर मी परत येणार या आशेनें ती जीव धरून राहिलेली आहे.

तां चावश्यं दिवसगणनातत्परामेकपत्नी—
मव्यापन्नामविहतगतिर्द्रक्ष्यसि भ्रातृजायाम् ।
आशाबंधःकुसुमसदृशं प्रायशो ह्यंगनानां
सद्यःपाति प्रणयि हृदयं विप्रयोगे रुणद्धि ॥

या श्लोकाचें कृष्णशास्त्री चिपळूणकरांनीं केलेलें भाषांतर-

देखशील ती अपुली वहिनी दीन बहुत विरहानें ।
बसतां मोजित एक एक दिन अति उत्सुक हृदयानें ॥

नश्वर कोमल फुलाहुनीही होय हृदय वनितांचें ।
वियोगकालीं केवळ आशा रक्षण करी तयांचें ॥

यांत मूळांतील "अव्यापन्नाम्" आणि "एकपत्नीम्" या शब्दाचा प्रत्यक्ष अर्थ तेवढा आलेला नाहीं. अव्यापन्ना म्हणजे अमृता, जिवंत असलेली आणि जिवंत आहे याचें कारण पति परत येण्याची आशा. ती आशा नसती तर ती एकपत्नी—(पतिव्रता) जिवंतसुद्धां राहणें शक्य नव्हतें. असो. यानंतर चित्रकूटापासून यक्षांची नगरी अलकावती तेथपर्यंत जाण्याचा मार्ग यक्षानें मेघाला सांगितला. अलकावतींत आपलें घर कोठें आहे त्याचा त्यानें बरोबर पत्ता दिला. ज्या घराला आणि तेथील सुखांना तो वर्षभर कां होईना पण पारखा झाला होता त्याची आठवण होऊन यक्षाचें अंतःकरण भरून आलें. त्या घराचें केलेलें वर्णनही शृंगार रसाचाच परिपोष करितें. तें येथें मूळांत न देतां कृष्णशास्त्री यांनीं केलेल्या भाषांतरांत दिलें आहे :—

त्या नगरींत धनेशगृहाच्या उत्तरेस दिसतें जें ।
दूरुनि सुंदर मंदिर मोठें, तेंच जाण घर माझें ॥
नाना रत्नीं खचित जयाचें द्वार उंच बहु साजे ।
अपूर्व शोभा पाहुनि ज्याची इंद्रचापही लाजे ॥
असे जवळ त्या एक नवीनचि कल्पवृक्ष सुकुमार ।
थोर फुलांचे गुच्छ येउनी जो लवलासे फार ॥
प्रिया करांनीं नित्य घालुनी पाणी सायंकाळीं ।
अति कनवाळूपणें जयाला मुलासारिखा पाळी ॥

आणि तेथें राहाणाऱ्या आपल्या प्रियेचें तो वर्णन करतो. त्या वर्णनांतला पहिला श्लोक प्रथम मुळांतच देणें आवश्यक वाटतें :—

तन्वी श्यामा शिखरिदशना पक्वबिंबाधरोष्ठी
मध्ये क्षामा चकितहरिणीप्रेक्षणा निम्ननाभिः ।
श्रोणीभारादलसगमना स्तोकनम्रा स्तनाभ्यां
या तत्र स्याद्युवतिविषये सृष्टिराद्येव धातुः ॥

याचेंच कृष्णशास्त्र्यांनीं केलेलें मराठी :—

अंग जयेचें पातळ रंगहि चंपकफुलासमान ।
दंतपंक्ति कीं कुंदकळ्यांपरि दिसते विराजमान ॥

जेविं तोंडलें पिकलें तेवीं ओंठ खालचा लाल।
विरहें असती शुभ्र जाहले जीचे नाजुक गाल ॥

विशाळ चंचल काळे डोळे जे का विलासखाणी ।
मनांत झुरती हरिणबालकें बघुनि जयाचें पाणी ॥

कंबर बारीक असे, उरावरी कुचही लकुचाकार ।
जेवि शोभती कनकलतेला पुष्पगुच्छ सुकुमार ॥

मत्त गजापरि मंद चालणें, उणें न कोठें कांहीं ।
विधिच्या हातुनि दुसरें ऐसें रूप उतरलें नाहीं ॥

हें भाषांतर अक्षरशः नसून भावार्थरूप आहे हें सुज्ञांच्या लक्षांत येईलच. आतां मुळांत " श्यामा " हा शब्द आहे त्यावरून यक्षपत्नी काळी सावळी होती असें कोणास वाटेल. पण श्यामा या शब्दाचा अर्थ यौवनाच्या भरांत असलेली, तारुण्यानें मुसमुसलेली युवति असाही आहे व तोच येथें अभिप्रेत आहे. आतां तिच्या वर्णनांतल्या विप्रलंभ शृंगार रसाचा उत्कृष्ट परिपोष करणाऱ्या आणखी कांहीं साक्या येथें देण्यास हरकत नाहीं:—

भाषण जीचें परिमित मंजुळ सरस आणि हितकारी।
मी नसल्यानें जवळ एकटी पडुनि झुरे जी भारी ॥

वर्षाकाळीं मज आठवुनी क्षणोक्षणीं दुःखानें ।
वाळुनि गेली असेल जी बहु, नलिनी जेविं हिमानें ॥

रडुनि रडुनिया सुजले डोळे असतिल खचित तियेचे ।
उष्ण श्वासें कोमल ओंठहि सुकले असतिल साचे ॥

गाल टेकुनी हस्ततलावरि जी चिंतातुर बैसे ।
अलक लोंबती मुखावरी ते, कमलीं मधुकर जैसे ॥

किंवा तूंची घना ! झांकिशी जेंवीं शशिबिंबाला ।
तीच साजते बरवी उपमा म्लान तिच्या वदनाला ॥

पहाशील तूं तिला कदाचित् देवातें पुजितांना ।
किंवा ध्याउनि माझी मूर्ती चित्रपटीं लिहितांना ॥

असेल अथवा पिंजऱ्यापाशीं उभी पुसत मैनेला ।
" कां गे आठवतो तुजला तो प्राणसखा रंगेला " ॥
घेउनि हातीं सारंगी वा काळक्रमण कराया ।
स्वयें रचियलीं मजविषयींचीं लागे गीतें गाया ॥
तैं डोळयांतुनि गळुनि अश्रुजळ जाई भिजुनी तार ।
स्वयें घेतला मधेंच विसरे अलाफ वारंवार ॥
किती लोटले विरह दिवस हे कळावयाकरितां जीं ।
ठेवियलेलीं फुलें प्रतिदिनीं पुनः पुनः ती मोजी ॥
किंवा ध्यानीं मजला आणुनि माझा मानससंग ।
अनुभवुनी त्या परमानंदीं झाली असेल दंग ॥
गृहकृत्याच्या योगें लोटिल कशी तरी दिवसास ।
परि रात्रीं मम विरह तियेला करिल बहुत आयास ॥
गवाक्षमार्गें स्वच्छ चंद्रिका येतां पूर्ण शशीची ।
वळेल तिकडे दृष्टि सुखाच्या पूर्वानुभवें तीची ॥

पण हे उतारे कितीही घेतले तरी त्यांचा उपयोग मूळ संपूर्ण वाचावें ही स्फूर्ति देण्यांत व्हावयाचा असतो. मेघदूतांत विप्रलंभ शृंगाराचा परिपोष फारच हृदयंगम झालेला आहे व त्याची कल्पना यावरून येण्यासारखी आहे. विक्रमोर्वशीय व मेघदूत यांत विप्रलंभाची याप्रमाणें कवीनें उभारणी केलेली आहे. शाकुंतलाच्या सहाव्या अंकांतही विप्रलंभ शृंगार आहे, नाहीं असें नाहीं. पण त्याचें स्वरूप स्पष्ट नाहीं व शृंगार रसाची खरी सिद्धि तेथें झालेली नाहीं असें मत आम्ही मागें दिलेलें आहे. विभावविषयांची फारशी तीव्रता त्या ठिकाणीं दृष्टोपत्तीस येत नाहीं म्हणून रसाचा व्हावा तसा परिपोष झालेला नाहीं. अर्थात् हें मत सर्वांना मान्य होईलच असें नाहीं व दुसरा आणि तिसरा अंक हे शाकुंतलांत ज्याप्रमाणें संभोग शृंगार पुष्ट करितात, त्याचप्रमाणें सहावा अंक विप्रलंभ शृंगार पुष्ट करतो असें कित्येकांचें मत आहे व जरी आम्हांला तें मान्य करवत नाहीं तरी त्याचा उल्लेख करणें आवश्यक आहे. आतां शृंगाराचा येथें निरोप घेऊन करुण रसाकडे वळूं; नंतर वीर रस व नंतर हास्य रस असा क्रम ठेवणें सोयीचें होईल.

४. करुण रसाचा स्थायी भाव शोक, दुःख हा आहे. कालिदासीय वाङ्मयांत कुमारसंभवांत रतिविलाप आणि रघुवंशांत अजविलाप हीं करुण रसानें ओथंबलेलीं आहेत याचा उल्लेख यापूर्वी अनेक वेळां या ग्रंथांत झालेला आहे. कवीच्या तीन्ही नाटकांत मृत्यु किंवा चिरवियोग यांचा संबंध येत नसल्यानें या रसाला कारण होणारें अतिशयित दुःख हें त्याच्या एकाही नाटकांत प्रकट होत नाहीं आणि म्हणून त्याच्या काव्यांतच करुण रसाचीं उदाहरणें आपणांस मिळतात. रतिविलाप कुमार-संभवाच्या चौथ्या सर्गांत आहे. भगवान् शंकराच्या तपश्चर्येला विघ्न करण्यासाठीं इंद्राच्या अनुज्ञेनें मदन गेला होता; त्याबरोबर त्याची पत्नी रति पण गेली होती. मदन केवढ्या थाटानें या कामगिरीवर गेला होता! निघण्याच्या वेळीं इंद्रानें त्याचा केवढा गौरव केलेला होता :—

**तथेति शेषामिव भर्तुराज्ञामादाय मूर्ध्ना मदनः प्रतस्थे ॥**
**ऐरावतास्फलितकर्कशेन हस्तेन पस्पर्श तदंगमिंद्रः ॥ कुमार ३–२२**

आपल्या धन्याची आज्ञा जशी काय प्रसाद म्हणून दिलेली माळच अशा भावनेनें मदनानें वंदनपूर्वक स्वीकारली आणि तो जावयास निघाला. ऐरावताला तडाखे देऊन कर्कश झालेल्या आपल्या हातानें जाण्याच्यापूर्वी मदनाच्या ( सुकुमार ) अंगाला इंद्रानें स्पर्श केला म्हणजे जातां जातां त्याच्या पाठीवर शाबासकी दिली. रति त्याच्याबरोबर गेली पण आमचा सूक्ष्मदर्शी कवि म्हणतो—

**रत्या च साशंकमनुप्रयातः ।**

रतीच्या अंतःकरणांत हें सगळें कसें काय पार पडणार याबद्दल शंका होती. "अतिस्नेहःपापशंकी" हेंही त्या काळजीचें कारण असूं शकेल. पण शंकराच्या तपश्चर्येला विघ्न करणें ही गोष्ट शक्यतेच्या कोटींतील नाहीं हें जरी इंद्रसभेंत झालेल्या टाळ्यांच्या कडकडाटांत मदन विसरला तरी आपल्या पतीच्या जीविताला जपणारी रति विसरली नव्हती हीच गोष्ट येथें घातलेल्या "साशंकम्" या शब्दानें प्रतीत होते. मदन त्या अरण्यांत आल्याबरोबर सर्वत्र शृंगार रसाचें वातावरण निर्माण झालें. तरीसुद्धां शंकराच्या समाधीचा निश्चलपणा पाहून मदन त्याला न कळतच गडबडला. महादेवाच्या त्या विलक्षण स्वरूपाला पाहून आपल्या हातून चापसुद्धां गळून पडलें, हेंही त्याच्या लक्षांत आलें नाहीं. तथापि कोणत्या कामासाठीं आपण आलों

आहों हें तो विसरला नाहीं. पार्वती येऊन शंकरापुढें पूजनाला बसली असतांना मदनानें त्याच्यावर बाण मारण्याची तयारी केली, आणि ज्यावेळीं शंकर "किंचित्परिलुप्तधैर्य" झाला आणि त्याला कोण कारण म्हणून चोहोंकडे पाहूं लागला तेव्हां आपल्यावर बाण सोडण्यास उद्युक्त झालेला मदन त्याला दिसला आणि त्याबरोबर त्याच्या तृतीय नेत्रांतून अग्नि बाहेर पडून त्या सुंदर मदनाचा स्वाहाकार झाला. देवकार्यही झालें नाहीं; पार्वतीचें सौंदर्य व्यर्थ झालें; केनापि कामेन तपश्चचार अशा शंकराचेंही उद्दिष्ट सिद्ध झालें नाहीं. या सर्वांच्या धांदलींत मदनाचा बळी पडला आणि त्याच्या निरपराध पत्नीवर—रतीवर—आकाशांतून जसा काय वज्राघात झाला. पतिवियोगासारखें पतिव्रता स्त्रीला महद्‌दुःख नाहीं आणि तें दुःख रतीच्या वांट्याला आलें. ज्या विलक्षण रीतीनें मदनाला मृत्यु आला त्यामुळें तर तिच्या शोकाला पारावार उरला नाहीं. मदनानें जसें काय तें मरण ओढवूनच घेतलें होतें. "मी जातों" म्हणून तो गेला आणि विजयप्राप्ति न होतां सरळ मृत्यूच्या जबड्यांत सांपडला! शंकर म्हणजे प्रत्यक्ष विनाशकर्त्री देवता; तिच्या वाटेला कोणी शहाणा माणूस जाणार नाहीं; पण अभिनिवेशाच्या भरांत व इंद्राच्या प्रोत्साहनानें जें शहाण्यानें करूं नये तें मदनानें केलें आणि तें सर्व त्याच्या आंगलट आलें! अशा प्रकारें रतीच्या करुणविलापाला परिस्थिति निर्माण झाली. बिचारी रति त्या भयंकर प्रसंगीं मूर्च्छीत पडली!

तीव्राभिषंगप्रभवेण वृत्तिं
मोहेन संस्तंभयतेंद्रियाणाम् ।
अज्ञातभर्तृव्यसना मुहूर्तं
कृतोपकारेव रतिर्बभूव ॥ कुमार. ३-७३

सहन करण्याला अत्यंत कठीण असा जो पतीचा पराभव झाला त्यामुळें तिला मूर्च्छा आली. त्या मूर्च्छेमुळें इंद्रियांच्या सर्व वृत्ति थांबल्या. पण एका प्रकारें त्या मूर्च्छेनें रतीवर उपकारच केला; कारण क्षणभर तरी पतीवर केवढें संकट आलें आहे हें तिला कळलें नाहीं. कांहीं वेळानें ती मूर्च्छा ओसरली आणि अगदीं दीन अशी झालेली ती कामवधू भानावर आली आणि आपल्या कपाळीं ब्रम्हदेवानें ज्यांतील दुःख असह्य आहे असें वैधव्य लिहिलेलें आहे हें तिला कळून चुकलें.

त्या पतीच्या देहाकडे पाहतांना तिच्या डोळ्यांची तृप्ति होईना आणि त्याचा आपणाला आत्यंतिक वियोग झाला आहे हेंसुद्धां ती क्षणमात्र विसरली आणि मोठ्यानें टाहो फोडून "प्राणनाथा, जिवंत आहेस ना ?" असें विचारूं लागली; आणि मग तिच्या लक्षांत आलें कीं समोर आपल्या पतीचें शरीर नाहीं तर शंकराच्या कोपानें भस्म झालेली त्या शरीराची आकृति मात्र आहे. तें पाहून तिला पुनः दुःखाचा कड आला आणि ती जमिनीवर गडबडां लोळूं लागली; तिचे सर्व केस अस्ताव्यस्त झाले आणि तिच्या रडण्यानें तो सर्व प्रदेश शोकमय होऊन गेला. हंबरडा फोडून ती म्हणाली :—"विलासी लोकांच्या शरीराला सौंदर्याचें वर्णन करण्यासाठीं तुझी उपमा देतात. असें तुझें अत्यंत सुंदर शरीर त्याची ही का दशा व्हावी ! आणि ही असली तुझी झालेली दशा डोळ्यांनीं पाहून माझी छाती फाटून जात नाहीं, मीं जिवंत आहें ! खरोखर, स्त्रियांना कठोर म्हणतात तें खरेंच ! माझें जीवित सर्व तुझ्या हातांत आणि तूं तर एका क्षणांत सर्व प्रेम विसरून कोठें नाहींसा झालास; पण मला कोणाच्या रे पदरांत घातलीस ! एकाएकीं बंधारा फुटून सर्व पाणी नाहींसें झाल्यावर कमलिनीची जी अवस्था होते तीच माझी झाली ना रे ? आजपर्यंत तूं माझें अप्रिय कधीं केलें नाहींस; मीही तुझ्याविरुद्ध कधीं वागलें नाहीं ! मग मी धायधाय रडत असतांनासुद्धां कशासाठीं रे मला दर्शन देत नाहींस ?" 'तूं माझ्या अंतःकरणांत भरून राहिली आहेस' असें मला गोड वाटणारें नेहमीं बोलत होतास. ती तुझी सारी आतां मीं लबाडीच समजली पाहिजे. आणि तें तुझें बोलणें जर मला खूष करण्यासाठींच केवळ औपचारिक नव्हतें असें मानलें (म्हणजे मी खरोखरच तुझ्या हृदयांत भरून राहिलें होतें असें जर मानलें) तर तुझ्या शरीराचा नाश होऊनसुद्धां मी रे कशी जशीच्या तशी जिवंत आहें ? खरोखर मी तुझ्या पाठोपाठ प्राणत्याग केला पाहिजे.

शशिना सह याति कौमुदी
सह मेघेन तडित् प्रलीयते ।
प्रमदाः पतिवर्त्मगा इति
प्रतिपन्नं हि विचेतनैरपि ॥ कुमार. ४–३३ ॥

चंद्र अस्ताला गेला कीं कौमुदी नाहींशी होते. मेघाबरोबर विद्युत् अदृश्य होतें. याप्रमाणें स्त्रिया पतीबरोबर जातात, त्याच्या मागें रहात नाहींत हें अचेतन

सृष्टींतमुद्धां आपल्याला दिमून येतें. तेव्हां आतां मी तुझ्या पाठोपाठ येतें." अशा प्रकारें तिनें परोपरीनें विलाप केला. मदनाबरोबर घेतलेल्या अनेक उपभोगांचें तिला साहजिकच स्मरण झालें व मदन नाहींसा झाल्यावर सर्वत्र दुःखाचें साम्राज्य कसें पसरेल हेंही लक्षांत येऊन ती तळमळली आणि तेथें जवळ असलेल्या माधवाला ( वैशाख मासाला ) शेवटचा निरोप देऊन ती रति सती जाण्याला तयार झाली. पण इतक्यांत आकाशवाणी झाली :—

**परिणेष्यति पार्वतीं यदा**
**तपसा तत्प्रवणीकृतो हरः ।**
**उपलब्धसुखस्तदा स्मरं**
**वपुषा स्वेन नियोजयिष्यति ॥ ४–४२ ॥**

पार्वतीच्या तपश्चर्येनें प्रसन्न होऊन जेव्हां शंकर तिच्याशीं विवाह करील आणि सुखी होईल, तेव्हां तो मदनाला आपलें शरीर पुनः प्राप्त होईल अशी योजना करील. या आकाशवाणीमुळेंच रतीनें सती जाण्याचा आपला विचार सोडून दिला व आपला प्रिय पति जिवंत होण्याची म्हणजे शिवपार्वतीचा विवाह होण्याची वाट पहात राहण्याचें तिनें ठरविलें. रतिविलापांतील अगदीं थोड्या भागाचीच वर छाया दिलेली आहे. तो संपूर्ण देणें येथें शक्य नाहीं आणि तसा देण्याचें प्रयोजनही नाहीं. या विलापांत तरुण पत्नीला पतीबरोबर केलेल्या शृंगारलीला आठवून वरचेवर दुःखाचे आवेग येतात हें मनुष्यस्वभावाला अनुसरून आहे. ज्याचा वियोग झाला त्याचे गुण आठवावेत आणि त्याच्याबरोबर जीं सुखेंदुःखें आपण उपभोगिलीं त्यांचें तीव्रतेनें स्मरण व्हावें यांतूनच करुण रसाची निर्मिति आहे. मदन आणि रति म्हणजे सर्व शारीरिक सुखांच्या ओतलेल्या मूर्ति ! त्यांनीं आनंदाचाच उपभोग घेतलेला होता आणि त्या आनंदाचे शोकपूर्ण स्मरण शृंगाराच्या पार्श्वभूमिकेवर कवीनें रतिमुखानें मोठ्या नाजुकपणानें केलें आहे आणि तो करुण रस रंगवितांना त्याची वाणी कशी उत्कर्षाला पावते हें आपणांस कळतें. पत्नीनें पतीसाठीं केलेल्या शोकाचीं वर्णनें संस्कृत वाङ्मयांत फारशीं नाहींत. नाटकांतून तर नायिका या नायकाच्या मानानें फारच थोड्या बोलणाऱ्या; त्यामुळें नायकांचे करुणरव जसे कानभर ऐकूं येतात तसे नायिकांचे येत नाहीं. स्त्रिया जात्या विनम्र त्यामुळें पुरुषांप्रमाणें त्या आपलें अंतःकरण अत्यंत स्फुट करीत नाहींत असा काव्य-

तंत्राचा दंडक दिसतो. त्या दृष्टीनें रतिविलाप हा कालिदासीय काव्यांतच काय, पण मध्ययुगीन संस्कृत वाङ्मयांतील एक विशेष गोष्ट आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. आतां आपण रघुवंशाच्या आठव्या सर्गांतील अजविलापाकडे वळूं. रतिविलाप हा पतिनिधनामुळें पत्नीनें केलेला शोक आहे; अजविलाप हा पत्नीनिधनामुळें पतीनें केलेला शोक आहे व त्यांत करुण रसाचा फारच उत्कर्ष झालेला आहे.

५ अजराजाची पत्नी इंदुमती ही विक्रमोर्वशीयांतील ऊर्वशीप्रमाणें मूळची स्वर्गातील अप्सरा होती. तृणबिंदु नांवाच्या ऋषीनें घोर तपश्चर्या आरंभिली तेव्हां नेहमींप्रमाणें इंद्र गडबडला आणि त्या ऋषीच्या समाधीचा भंग करण्यासाठीं त्यानें हरिणी नांवाची अप्सरा पाठविली. तिनें त्याच्यापुढें जाऊन कामोत्पादक हावभाव करण्यास सुरवात केली; तेव्हां त्या ऋषीला संताप आला व "तूं मनुष्य-लोकांत जन्म घे" असा त्यानें तिला शाप दिला. तेव्हां ती घाबरली आणि हात जोडून ऋषीला म्हणाली :—"महाराज, मी दुसऱ्याची नौकर आहें; म्हणून हें असें आचरण माझ्या हातून झालें (स्वतःच्या बुद्धीनें मी असें केलें नसतें) तेव्हां मला क्षमा करा." ऋषि दयाळु होता; त्यानें उश्शाप दिला कीं "स्वर्गलोकांतील फुलांचें दर्शन होईपर्यंतच तुला मनुष्य-लोकांत राहावें लागेल." ती ही हरिणी क्रथकैशिक राजकुळांत जन्माला येऊन इंदुमती झाली व अजाचा तिजबरोबर स्वयंवरपद्धतीनें विवाह झाला. अर्थात् तिची ही हकीकत अजालाही माहीत नव्हती आणि तिलाही आठवत नव्हती. अजराजाबरोबर कांहीं वर्षें मोठ्या सुखानें संसार केल्यावर एक दिवस आकाशांतून चाललेल्या नारदाच्या वीणेवरची स्वर्गांतल्या फुलांची माळ वाऱ्यानें खालीं उद्यानांत इंदुमती बसली होती तेथें तिच्या आंगावर पडली आणि सुरपुष्प-दर्शन झाल्याबरोबर इहलोकांतील तिची यात्रा ताबडतोब संपली म्हणजे तिला तत्काळ मृत्यु आला. अंगावर फुलांची माळ पडून मृत्यु यावा ही गोष्ट मोठी विलक्षण यांत शंका नाहीं व इंदुमतीचें पूर्ववृत्त माहीत नसणाऱ्यांना तें मरण मोठें आश्चर्य-कारक वाटावें यांत नवल नाहीं आणि पत्नीच्या आकस्मिक मरणानें अज राजा अगदीं खचला यांतही नवल नाहीं. ती माळ तिच्या छातीवर पडली; तिच्याकडे तिनें एक क्षणभरच पाहिलें आणि ती विव्हळ झाली आणि तिनें डोळे झांकले. तो विलक्षण प्रसंग पाहून—इंदुमती मरण पावलेली आणि राजा मूर्च्छित होऊन पडलेला—राजाचे नौकर आणि राणीच्या सख्या रडूं लागल्या आणि सर्वत्र हाहाकार

उडाला. मग वारा वगैरे घालून राजा शुद्धीवर आला; पण इंदुमतीनें जे डोळे झांकले ते झांकले, ते पुनः उघडले नाहींत. कवि म्हणतो :—

प्रतिकारविधानमायुषः
सति शेषे हि फलाय कल्पते।

जर आयुष्याचा वाटा शिल्लक असेल ( जर आयुष्याची दोरी बळकट असेल ) तरच रोगाच्या प्रतिकाराचा प्रयत्न सफळ होतो. असो. तारा तुटून गेलेल्या वीणे-प्रमाणें मृत्यूमुळें जिची स्थिति झाली आहे त्या आपल्या पत्नीला अजानें मांडीवर घेतलें आणि विलाप करण्याला सुरवात केली. पुरुषांसारखा पुरुष पण त्याचें स्वाभाविक धैर्यसुद्धां गळून गेलें; त्याची छाती दुःखावेगानें भरून आली; आणि तो ढळढळा रडूं लागला. कवि म्हणतो

अभितप्तमयोपि मार्दवं
भजते कैव कथा शरीरिषु।

लोखंड येवढा कठीण पदार्थ; पण त्यालाही आंच लागली म्हणजे तें मऊ होतें; मग अज शहाणा असला, पुरुष असला म्हणून काय झालें ? तो माणूसच होता ! त्या अत्यंत थोर अशा दुःखानें तो अगदीं हताश झाला, विरघळून गेला यांत नवल काय ? फुलांच्या माळेनें आपल्या प्रियेला मृत्यु आला तेव्हां तो म्हणतोः— " फुलांनीं जर असा मृत्यु येतो तर मृत्यु कशानें येणार नाहीं ! वेळ आली, काळ उलटला, म्हणजे कशानेंही मृत्यु येईल ! कां ही माझी प्रिया सुकुमार हिला मार-ण्यासाठीं सुकुमार साधनांचाच उपयोग केला पाहिजे असें वाटून तर काळानें या पुष्पमाळेची योजना या कार्यासाठीं केली नसेल ना ? केवळ दंव पडलें म्हणजे कमलिनीला धक्का पोहोंचतो, तसाच प्रकार इंदुमतीच्या बाबतींत झाला आहे ! दुर्दैव माझें ! पण या माळेमध्यें जीव घेण्याची शक्ति आहे म्हणावें तर मी हिला छातीवर किती वेळ ठेविली आहे; पण मला कां मरण येत नाहीं ! देवाची करणी अगाध हेंच खरें ! माळ अंगावर पडतांच इंदुमतीला मृत्यु आला; मला कांहींही झालें नाहीं.—

विषमप्यमृतं क्वचिद्भवे-
दमृतं वा विषमीश्वरेच्छया।

कोठें विष अमृतासारखें गुणकारी होतें तर कोठें अमृताचाच परिणाम विषासारखा प्राणघातक होतो. सगळा ईश्वरी इच्छेचा परिणाम! किंवा माझेंच दैव फिरलें म्हणून या पुष्पमालेलाच विधात्यानें विजेंतून उत्पन्न होणाऱ्या अग्नीची दाहक शक्ति दिली असें मला वाटतें. पण तसें म्हणावें तर वीज पडून ही लता चिरडली आणि वृक्षासारखा मी पण मला मात्र धक्का लागलेला नाहीं. मी कितीतरी वेळां तुझे अपराध केले तरी तूं माझी कधीं अवज्ञा केली नाहींस; आणि आतां माझ्या-कडून कसलाही अपराध घडलेला नसतांना एकाएकीं माझ्याशीं बोलतसुद्धां नाहींस याला काय म्हणावें? ज्याअर्थी मला न विचारतां तूं येथून परलोकाला कायमची निघून गेली आहेस तेव्हां मी लबाड आहें, माझें तुजवरचें प्रेम खोटे-पणाचें आहे अशीच तुझी खात्री झाली असली पाहिजे. हा माझा करंटा प्राण तुझ्या पाठोपाठ जर गेला होता ( मूर्च्छित झाला होता ) तर तुला घेतल्याशिवाय तो परत कसा आला? त्यानें याप्रमाणें परत आल्यामुळें आपण होऊन आपल्या-वर तुझ्या वियोगाची ही आपदा ओढवून घेतली आहे आणि ती त्याला सोसल्या-शिवाय गत्यंतर नाहीं. हाय! हाय! तूं गेलीस असें वाटतसुद्धां नाहीं! आपण जो आनंद उपभोगिला त्याचीं चिन्हेंसुद्धां तुझ्या मुखावर अद्याप दिसताहेत; पण तूं मात्र नाहींशी झाली आहेस! काय हें मनुष्याचें चंचल आयुष्य! धिक्कार असो त्याला!

**मनसापि न विप्रियं मया**
**कृतपूर्वं तव किं जहासि माम्।**
**ननु शब्दपतिः क्षितेरहं**
**त्वयि मे भावनिबंधना रतिः॥ ८–५२**

मी तुला प्रिय नसलेली अशी गोष्ट कधीं मनानेंसुद्धां केली नाहीं. मग तूं मला कां टाकून गेलीस? मी पृथ्वीचा पति नांवाचा आहें. माझें प्रेम सर्वथैव तुझ्यावरच आहे. (तुझ्यापुढें मला राज्यही तुच्छ आहे). हें पहा! भांग काढून ज्यांत फुलें घातलीं आहेत ते तुझे केस वाऱ्यानें हालताहेत आणि म्हणून तूं जिवंत आहेस कीं काय अशी मला शंका येते. ज्याप्रमाणें हिमाचलाच्या गुहेंतील अंधार रात्रीच्या वेळीं औषधी वनस्पतींच्या तेजानें नाहींसा होतो त्याप्रमाणें माझी समजूत घालून माझें दुःख नाहींसें करून टाक. म्हणजे, तूं माझ्याशीं बोल मग माझें

दुःख पार नाहींसें होईल. पण तुझा वियोग मला आतां कायमचा झाला. तो मी कसा सहन करणार ! रात्र गेली तरी फिरून चंद्राला ती भेटते. चक्रवाक पक्ष्यालाही त्याची प्रिया पुनः भेटते, तेव्हां त्यांना विरह सहन करतां येतो. पण तूं मला कायमची अंतरलीस त्यामुळें मी पोळून निघालों आहें. आणखी प्रिये ! तुझें शरीर किती सुकुमार ! कोवळ्या पाल्यांचा बिछाना असला तरी तोसुद्धां तुला टोचत असे आणि आतां त्या काष्ठांच्या चितेवर हें शरीर ठेवलें म्हणजे त्याची काय अवस्था होईल ?

कलमन्यभृतासु भाषितं
कलहंसीषु मदालसं गतं
पृषतीषु विलोलमीक्षितं
पवनाधूतलतासु विभ्रमाः ॥ ८-५९

स्वर्गाला जाण्याचा निश्चय केल्यावर तुला माझी आठवण झाली आणि जातांना तुझे निरनिराळे गुण निरनिराळ्या ठिकाणीं ठेवून गेलीस. तुझें गोड भाषण कोकिलांच्या ठिकाणीं ठेविलेंस. तुझें डौलदार चालणें हंसीच्या ठिकाणीं ठेविलेंस. तुझी चंचल दृष्टि हरिणींच्या ठिकाणीं ठेविलीस आणि तुझे हावभाव वाऱ्यानें हालणाऱ्या या लतांत ठेविलेस. परंतु त्यांनीं माझें समाधान होत नाहीं. तुझा वियोग झाल्यामुळें माझ्या अंतःकरणाला जी भयंकर व्यथा झाली आहे ती नाहींशी करण्याला या सर्व वस्तु अगदीं असमर्थ आहेत." त्यानंतर राजानें तिच्या पुष्कळ गोष्टी आठवल्या. एका आम्रवृक्षाचें आणि लतेचें लग्न तिनें ठरविलें होतें. पण विवाहविधीचा समारंभ घडवून आणण्यापूर्वीच ती निघून गेली ! तिच्या चरणांचा प्रसाद ज्याला वरेचवर मिळाला होता असा तो अशोक वृक्ष तिच्या मृत्यूमुळें पुष्परूपानें अश्रु ढाळीत होता. अशा प्रकारें तिच्या त्या गोष्टी आठवतां आठवतां त्याचा शोक वाढतच गेला आणि अगदीं हताश होऊन तो म्हणालाः—

धृतिरस्तमिता रतिश्च्युता
विरतं गेयमृतुर्निरुत्सवः ।
गतमाभरणप्रयोजनं
परिशून्यं शयनीयमद्य मे ॥ ८-६६

( या श्लोकाचा अर्थ पूर्वी दिलेला आहे. ) पत्नीच्या मृत्यूनें त्याचें सर्वस्वच नाहींसें झालें होतें. कारण ती त्याची पत्नी होती तशीच मैत्रीण होती, सचिव म्हणजे सल्ला देणारी होती, आणि ललितकलांत त्याची शिष्या होती, त्याचें तिच्यावर अविरत प्रेम होतें, त्याला दुसऱ्या कशाचाही लोभ नव्हता. "मम सर्वे विषयास्त्वदाश्रयाः" त्याचे सर्व विषय म्हणजे ती इंदुमती होती. आणि म्हणून त्याचा तो कारुण्यानें भरलेला शोक ऐकून त्या ठिकाणचीं झाडेंझुडपेंसुद्धां अश्रु ढाळूं लागलीं असें वाटलें. पत्नीवर अशा एकनिष्ठ प्रेमाचा वर्षाव करणारा अज हा याप्रमाणें कालिदासीय वाङ्मयांत मोठा अद्भुत आणि उदात्त पुरुष आहे यांत शंका नाहीं.

६. वीर रसाचा स्थायी भाव उत्साह आहे. हौस असें आपण ज्याला मराठींत म्हणतों तोही उत्साहाचाच एक प्रकार आहे. कोणतेंही कार्य उत्साहाशिवाय होत नाहीं. आपल्या अंगीं उत्साह अपरंपार असला म्हणजे उदाहरणानें तो दुसऱ्याच्या अंगीं संचरतो आणि याप्रमाणें उत्साहाच्या जोरावर अवघड वाटणारीं कार्येंसुद्धां सोपीं होत. बालसृष्टीचें वर्णन करतांना इंद्राशीं झगडा करणारा रघु आणि परशु-रामाबरोबर दोन हात करण्यास सज्ज झालेला रामचंद्र किंबहुना विश्वामित्राबरोबर मोठ्या आनंदानें जावयास निघालेला रामचंद्र व लक्ष्मण यांचीं उदाहरणें दिलीं आहेत. त्यां वर्णनांत वीर रसाचाच उत्कर्ष झालेला आहे. रघुवंशाच्या सातव्या सर्गांत अजानें इंदुमतीचें पाणिग्रहण केलें असें वर्णन आहे. त्याचप्रमाणें इतर राजांशीं त्यानें मोठें युद्ध करून त्यांचा पराभव केला असेंही वीररसात्मक वर्णन आहे. वीर रसाच्या उत्कर्षासाठीं युद्ध किंवा तंटाबखेडा पाहिजेच असें कांहीं नाहीं. ज्या ज्या परिस्थितींत उत्साहाच्या अमित बलानें कार्य होतें त्या सर्वांत वीर रस निष्पन्न झाला आहे असें म्हणतां येईल. या दृष्टीनें मोठ्या उत्साहानें व तत्परतेनें तपश्चर्या करण्यास उद्युक्त झालेल्या व घोर तपश्चर्या करणाऱ्या पार्वतीचें वर्णन वाचतांना तेथें वीर रसाचें वातावरण आहे असें आपल्यास वाटतें. रघुवंशाच्या दुसऱ्या सर्गांत सिंहाला प्राण अर्पण करून गाईचें संरक्षण करण्यास उद्युक्त झालेल्या दिलीपाच्या वर्णनांत जसा विस्मयप्रधान अद्भुत रस आहे त्याप्रमाणेंच उत्साहप्रधान वीर रस आहे. हा जो उत्साह असतो तो शरणागताचें रक्षण करण्यासाठीं, भिणाऱ्यांना निर्भय करण्यासाठीं, दुष्टांचें दंडन करण्यासाठीं, त्रस्तांना सुखी करण्यासाठीं आणि दांडग्यांना चीत करून त्यांच्या मनावर आपला प्रताप बिंबवण्यासाठीं म्हणजे

परोपकाराचें आणि पराक्रमाचें कार्य सिद्ध व्हावें यासाठीं असतो. जे कार्यकर्ते आहेत, कर्तृत्ववान् आहेत त्यांच्या अंगीं उत्साह अपरंपार भरलेला असतो आणि ते दुसऱ्या कोणत्याही औदासिन्य उत्पन्न करणाऱ्या परिस्थितींत सांपडले असले तरी त्यांच्या उत्साहाला स्वाभाविकपणें भरती येईल असें कार्य उभें राहिलें म्हणजे त्या परिस्थितीला ते मागें लोटतात, विसरतात आणि कार्याला तयार होतात. आणि म्हणूनच रति किंवा शोक या भावनांचा अंमल पुरुषाला अगदीं हताश, दुर्बल, विमनस्क करण्यापर्यंत झाला म्हणजे कवि त्या ठिकाणीं वीर रसाची योजना करतात. शाकुंतलाच्या सहाव्या अंकांत, घालवून दिलेल्या पत्नीबद्दल विचार करतां करतां पश्चात्तापानें पोळलेला दुष्यंत अगदीं टेकीला येतो; पण त्याच वेळीं इंद्राकडून त्याला बोलावणें येतें आणि तो जात्या वीर असल्यामुळें त्याची ती दुःखी मनोवृत्ति नाहींशी होऊन नवा उत्साह त्याचे आंगीं संचरतो. त्या उत्साहाची सुरवातसुद्धां कवीनें मोठ्या चातुर्यानें केलेली आहे. दुःखानें, पश्चात्तापानें, विव्हलतेनें राजाची मूर्च्छित पडण्यापर्यंत पाळी येते; पण त्याच वेळीं इंद्राचा सारथि येऊन विदुषकाची मानगुटी धरतो व तो भित्रा ब्राह्मण " धावा, धावा " म्हणून ओरडतो. त्याबरोबर " घाबरूं नकोस, मी आलों " असें म्हणून दुष्यंत त्याच्या साह्यासाठीं धावतो. अशा प्रकारें औदासिन्याचें वातावरण पार बदलतें आणि मग त्याला इंद्राचा सारथि मातलि भेटतो. त्याच्यापूर्वी कांहीं वेळ मातलि भेटला असता तर त्याला राजा अश्रु ढाळीत असतांना किंवा मूर्च्छित होऊन पडलेला दिसला असता. पण आतां राजाची मनोवृत्ति बदलली होती. राजा विदूषकाच्या रक्षणासाठीं धनुष्याला बाण लावतो आणि सांगतो—"तूं मला दिसत नाहींस म्हणून ऐट करूं नकोस; हें माझें शस्त्र तुला बरोबर हुडकून काढील. हा बाण मी लावतों. तो बरोबर तुझा वध करून त्या बिचाऱ्या ब्राह्मणाचें रक्षण करील." आणि तो बाण सुटला असता तर विदूषकाला गुप्तरूपानें धरून बुक्या मारणाऱ्या मातलीचा शेवटच झाला असता; पण राजाची वीरवृत्ति जागृत करणें येवढाच त्याचा विदूषकाला धरून त्याला भिवविण्यांत हेतु होता. मातलि लागलीच प्रकट झाला आणि म्हणाला.—

**कृताः शरण्यं हरिणा तवासुराः**
**शरासनं तेषु विकृष्यतामिदम् ।**

प्रसादसौम्यानि सतां सुहृज्जने
पतंति चक्षूंषि न दारुणाः शराः ॥ ६–२९

तुझे बाण पडण्याला इंद्रानें राक्षसांची योजना केली आहे. त्यांच्यावर हा जोडलेला बाण सोड; माझ्यासारख्या मित्रांवर (तुझ्यासारख्या) सज्जनांचे दारुण बाण पडत नसतात, तर प्रसन्न आणि म्हणून सौम्य अशी दृष्टि पडत असते. म्हणजे तूं माझ्याकडे प्रसन्नतेनें आणि सदयतेनें पहा. हें ऐकल्यावर राजा मातलीचें प्रेमानें स्वागत करतो आणि आपल्याला ज्यानें बुकललें त्याचें स्वागत राजा करीत आहे हें पाहून विदूषकाला चमत्कारिक वाटतें. अर्थात् आपण विदूषकाला कां धरलें त्याचें कारण मातलि सांगतो व त्यामुळें राजाचें समाधान होतें. राजा मग राज्यव्यवस्था प्रधानावर सोंपवून इंद्रकार्य करण्याला जातो. "आमचें धनुष्य आतां दुसऱ्या कार्यात गुंतलें आहे" असें तो जातांना सांगतो आणि याप्रमाणें विप्रलंभ शृंगाराच्या छायेखालीं असलेल्या सहाव्या अंकाचा शेवट वीर रसाच्या प्रादुर्भावांत होतो. इंद्रलोकाला जाऊन दुष्यंतानें मोठाच पराक्रम केला. त्याला पृथ्वीवर परत आणून पोहोंचवितांना मातलि म्हणतोः—"दानवरूपी कंटक उपटून काढून सुखपर (चैनी) इंद्राचें कार्य दोघांनीं केलें आहे. आज तुझ्या बाणांनीं व पूर्वी नरसिंहाच्या नखांनीं." नरसिंहाची उपमा देणें मातलीला योग्य वाटलें यावरून दुष्यंताचा पराक्रम मोठाच झाला होता याबद्दल शंका रहात नाहीं. इंद्रानें त्याला आपल्या अर्धासनावर बसवून आपल्या गळ्यांतील पुष्पमाला काढून त्याच्या गळ्यांत घालून दुष्यंताचा मोठा सत्कार केला यावरूनही तें स्पष्ट होतें.

रघुवंशाच्या चौथ्या सर्गांत रघूच्या दिग्विजयाची हकीकत दिली आहे, तींतही वीर रसच प्रमुख आहे. दिग्विजयाला त्याची स्वारी निघाली त्याचें कवि वर्णन करतोः—

रजोभिःस्यंदनोद्धूतैर्गजैश्च घनसंनिभैः ।
भुवस्तलमिव व्योम कुर्वन् व्योमेव भूतलम् ॥ ४–२९

मेघासारखे हत्ती जमिनीवर चालले होते आणि रथांनीं उत्पन्न केलेली धूळ आकाशांत जाऊन तेथें मेघच जमले आहेत कीं काय असें वाटत होतें. आणि अशा प्रकारें भूमि ही आकाश झाली व आकाश भूमि झालें. (हत्ती मेघासारखे

दिसले म्हणून भूमि आकाशासारखी वाटली आणि धुरळ्यामुळें आकाश भूमीसारखें वाटलें.)

प्रतापोग्रे ततः शब्दः परागस्तदनंतरम्
ययौ पश्चाद्रथादीनि चतुःस्कंधेन सा चमूः ॥

सर्वांत पुढें प्रताप, तेजस्विता, चालली होती म्हणजे स्वारी आल्याबरोबर हिच्यापुढें आपली धडगत नाहीं असें शत्रूंना तत्काळ वाटे. नंतर शब्द ऐकूं येई म्हणजे सैनिकांचा कलकलाट ऐकूं येई. (प्रथम प्रताप आणि नंतर शब्द हा क्रमही लक्ष्यांत ठेवण्यासारखा आहे.) त्यानंतर धुरळा दिसे आणि त्यामागून चतुरंग सेना चालली होती. हें वर्णन स्फुरण, उत्साह उत्पन्न करणारें असल्यामुळें वीररसप्रधान आहे हें सांगावयास नकोच. सैन्य चाललें म्हणजे त्याला नीट रस्ता मिळावा म्हणून वाटेंत सर्व प्रकारची व्यवस्था करावी लागते.

मरुपृष्ठान्युदंभांसि नाव्याःसुप्रतरा नदीः ।
विपिनानि प्रकाशानि शक्तिमत्त्वाच्चकार सः ॥

निर्जल ठिकाणें वाटेंत लागलीं तेथें पाणी काढून पाण्याची व्यवस्था केली; ज्या नद्या उताराला कठीण होत्या तेथें नौकांची योजना करून उतार केला; आणि जेथें निबिड अरण्यें होतीं तेथें झाडें तोडून मोकळें मैदान केलें. या सर्व गोष्टी युद्धाच्या तंत्रांत कराव्या लागतात व त्या आपल्या सामर्थ्याच्या जोरावर रघूनें या स्वारींत केल्या. वंग प्रांतावर स्वारी करून त्यानें नौकांच्या साहाय्यानें युद्ध करणाऱ्या तेथील राजांचा अगदीं पाडाव करून टाकला आणि गंगेच्या कांठीं ठिकठिकाणीं आपल्या जयाचे स्तंभ उभे केले. हत्तीच्या मस्तकावर जसा अंकुश टोंचतात व त्याला ताब्यांत आणतात त्याप्रमाणें महेंद्र नांवाच्या पर्वताला त्यानें आपल्या प्रतापबलानें ताब्यांत आणला; म्हणजे तो कठीण पर्वत चढून जाऊन रघूनें त्या पर्वताला जिंकलें. दिग्विजय करावयाचा म्हणजे आपलें सामर्थ्य दुसऱ्यांच्या प्रचीतीला आणून द्यावयाचें; त्यांत दुसऱ्याच्या राज्याचा अपहार करण्याची बुद्धि नसावयाची; आणि असें असलें म्हणजेच शुद्ध वीर रसाची उभारणी होते. म्हणून या दिग्विजय करणाऱ्या रघूला कवि "धर्मविजयी" ही मोठी सुंदर संज्ञा देतो. विजय धर्मासाठीं, क्षत्रियाच्या कर्तव्यपरिपालनासाठीं; कामासाठीं किंवा अर्थासाठीं नव्हे; असें या विशेषणानें सुचविलें आहे. कलिंगाच्या

महेंद्रनाथाला रघूनें जिंकलें; त्याला धरून त्याची शोभा हरण केली; पण त्याची सुटका करून त्याचा मुलूख त्याला परत देऊन व त्याला पुन: राज्य-पदावर बसविलें. तेव्हां हा दिग्विजय दुसऱ्यांचा मुलूख घशाखालीं घालण्यासाठीं नव्हता हें उघड आहे. हिमाचलाच्या शिखरावर तो घोड्यावर बसून चढला व घोड्यांच्या खुरांनीं उत्पन्न झालेल्या धुरळ्यामुळें तीं शिखरें अधिकच उंच दिसूं लागलीं असेंही चमत्कृतियुक्त वर्णन कवीनें केलें आहे. असा मोठा विलक्षण दिग्विजय करून परत आल्यावर रघूनें विश्वजित् नांवाचा यज्ञ मोठ्या समारंभानें केला. या यज्ञाला "सर्वस्व-दक्षिण" असें नांव आहे म्हणजे या यज्ञांत आपल्याजवळ असेल नसेल तें दक्षिणा म्हणून द्यावयाचें असतें. रघु हा नुसता युद्धांतच ( शत्रूला तडाखे लगावण्याच्या कामांत) सढळ हाताचा होता असें नाहीं तर दानांतही होता आणि म्हणून त्याचें आश्चर्यकारक चरित्र हें वीर रसाचें मूर्तिमान् उदाहरण आहे असें म्हणण्यास कांहींच हरकत नाहीं.

७. शृंगार, करुण व वीर या तीन रसांचा उत्कर्ष दाखविणारीं कालिदासीय वाङ्मयांतील कांहीं स्थळें थोड्याशा विस्तारानें आतांपर्यंत दाखविलीं. हास्य रसाला प्रधानत्व असें या वाङ्मयांत कोठेंही दिलेलें नाहीं; आणि तीन्ही नाटकां-तून विदूषकांच्या पात्रांची योजना करून जें हास्य निर्माण केलेलें आहे तें एकं-दरींत तांत्रिक वाटतें यांत शंका नाहीं. मालविकाग्निमित्रांत आपली पत्नी धारिणी हिला आपलें प्रेम मालविकेवर बसलें आहे हें कळूं नये म्हणून राजाची विदूषकाच्या साहाय्यानें जी धडपड चाललेली असते ती हास्यरसोत्पादक आहे. मालविकेचें दर्शन डोळे भरून व्हावें यासाठीं हरदत्त व गणदास या दोघां नाट्याचार्यांत अस-लेल्या परस्परांबद्दलच्या असूयेचा फायदा घेऊन प्रत्यक्षनाटकप्रयोग करूनमालविकेची तयारी कशी काय आहे हें पहाण्याचा बेत विदूषक सुचवितो व राणी धारिणी त्याला नाखुषीनें कां होईना संमति देते. या नाटकांत मालविकेवरील आपलें प्रेम लपविण्याचा ( आपल्या पत्नीच्या देखत ) राजा जवळजवळ नाटकाच्या शेवटापर्यंत प्रयत्न करतो आणि त्यामुळें नाटकांत हास्य रस सर्वत्र खेळलेला आहे. शाकुंतलांतही विदूषक आहेच व तो थोडेंसें हास्य उत्पन्न करतो; पण या नाटकांत शृंगार या रसाचें प्राधान्य असल्यामुळें हास्याला त्यांत फारशी जागा नाहीं. कुमार-संभवांत बटुरूपानें शंकर येऊन पार्वतीचें मन पाहतो; त्याच्या बोलण्याचा जरी पार्वतीला राग येतो तरी वाचकाला तो कोण हें माहीत असल्यामुळें ही पार्वतीची

परीक्षा चालली आहे, गंमत चालली आहे, असें वाटून त्याला थोडेंसें हंसें येतें. रघुवंशाच्या सहाव्या सर्गांत इंदुमतीच्या स्वयंवराला जमलेल्या राजांच्या चेष्टांत व सुनंदेनें केलेल्या राजांच्या वर्णनांत हास्यगर्भता आहे हें रसिक वाचकांच्या लक्षांत येईल; पण तेथील सर्व खोचा बरोबर कळण्याला थोडासा प्रयत्न लागतो हें खरें आहे.

रौद्र रसाचा स्थायी भाव क्रोध आहे. कुमारसंभवांत मदनदहनाच्या वेळीं रौद्र रसच निष्पन्न होतो हें उघड आहे. शंकराला जो क्रोध आला त्यांत मदनाची राखरांगोळी झाली. येथें मदन हा आलंबन विभाव व त्यानें उत्पन्न केलेलें मोहक वातावरण हा उद्दीपन विभाव ( पार्वतीची या ठिकाणीं गणना उद्दीपन विभावांतच केली पाहिजे ) आहे. शाकुंतलाच्या पांचव्या अंकांत शकुंतला राजावर चिरडीला येते त्या ठिकाणीं जरी करुण रसाची छटा आहे तरी तेथें मुख्य रस रौद्र आहे. आणि शार्ङ्गरव व राजा यांच्यांत जी बोलाचाली होते त्यांत रौद्र रस तर चांगल्या प्रकारें परिपुष्ट झालेला आहे. राजानें स्त्रीजातीविषयीं अपशब्द बोलल्यापासून तों शकुंतलेला तेथें सोडून जाईपर्यंत शार्ङ्गरवाची स्वारी रागानें लालभडक होऊन गेली होती हें सहज लक्षांत येतें. तो राजाचीही किंमत ठेवीत नाहीं आणि शकुंतलेला चांगला चापतो. राजाच्या प्रश्नांला तो जीं क्षणक्षणीत उत्तरें देतो, तीं रागाच्या भरांत देतो; आणि त्या वयांत, त्या ठिकाणीं, आपल्या बहिणीच्या हातून झालेली चूक आणि तिचा होत असलेला पाणउतारा पाहून त्याचा संताप वाढतच जातो. शकुंतला जेव्हां मी तुमच्याबरोबर परत येणार असें म्हणते तेव्हां तो तिच्या अंगावर उसळून धावतो आणि तिला चूप बसण्यास सांगतो. असो. रघुवंशाच्या अकराव्या सर्गांत रौद्र, भयानक आणि वीर या तीन्ही रसांचें मोठें कुतूहलकारक वर्णन आहे. परशुराम रागारागानें आपलें धनुष्य कोणी मोडलें याची चौकशी करण्यासाठीं येतो तेव्हां दशरथ भयानें गांगरतो आणि "अर्घ्य, अर्घ्य" म्हणून ओरडूं लागतो. या प्रमाणें परशुराममिषानें रौद्र व दशरथमिषानें भयानक या परस्परविरुद्ध रसांचा उदय झाला असतांना रामाच्या वीरवृत्तीनें जसा परशुरामाचा क्रोध थंडावतो, तसेंच दशरथाचें भयही नाहींसें होतें. भयानक रसाचा स्थायी भाव घाबरणें, भयभीत होणें हा आहे हें प्रथम सांगितलें आहेच.

शृंगार, वीर, करुण हे रस कालिदासीय वाङ्मयांत जसे प्रमुखत्वानें परिपुष्ट झालेले

दिसतात तशी स्थिति हास्य, रौद्र, भयानक या रसांची नाहीं. ते केवळ अप्रधानत्वानें दृष्टीस पडतात. बीभत्स रसाचा कालिदासांत फारसा परिपोष कोठेंच दिसत नाहीं असें म्हणण्यास हरकत नाहीं. चिळस उत्पन्न होण्यासारख्या पदार्थांचें वर्णन करीत सुटणें यांत बीभत्स रस उत्पन्न होत नाहीं तर बीभत्सपणाचा, घाणेरडेपणाचा दोष उत्पन्न होतो. पण जेव्हां एखाद्या दुष्ट पदार्थाचें यथातथ्य ( म्हणून बीभत्स ) वर्णन करून त्या दुष्ट पदार्थापासून निवृत्त करण्याचा परिणाम उत्पन्न होतो तेव्हां बीभत्सतेचा दोष उत्पन्न न होतां बीभत्स हा रस निष्पन्न होतो. कालिदासानें या रसाचा उपयोग बहुधा केलेला नाहीं म्हणून त्याला त्याच्या काव्यांत हुडकत बसण्याचें कारण नाहीं. आतां महत्त्वाचे दोन रस राहिले. अद्भुत आणि शांत. कोणतीही आश्चर्यकारक, विलक्षण, अत्यंत थोर, डोळे दिपविणारी अशी गोष्ट, व्यक्ति किंवा प्रसंग पाहिला म्हणजे विस्मय उत्पन्न होतो आणि या विस्मयाच्या भावनेवर अद्भुत रसाची उभारणी होते. सोन्याचा पर्वत समोर पडला असतां राजा रघु आणि ब्राह्मणकुमार कौत्स यांनीं विलक्षण निर्लोभीपणानें आपणांस तो नको म्हणणें; पार्वतीसारखी सौंदर्याची मूर्ति समोर उभी असतांना आपल्या मनाची झालेली अत्यल्प विकृतिसुद्धां सहन न होऊन भगवान् शंकरानें मदनाचें भस्म करणें; आपल्या रूपाचें वैय्यर्थ झालें हें कळून निराशा न होतां तपःसामर्थ्यानें शंकराला आपला करून घेण्याचा निश्चय करून सुकुमार पार्वतीनें थोर तप आचरणें; पांच सहा वर्षांच्या छोट्या बालकानें निर्भयपणानें सिंहाला धरून त्याचे दांत मोजणें; अत्यंत निष्पाप अशा जानकीनें रामचंद्राच्या देखत "मी निष्पाप असेन तर धरित्रीमातेनें मला आश्रय द्यावा" असें म्हणतांच भूमातेनें रूपधारिणी होऊन तिला आपल्या मांडीवर घेणें, शकुंतलेला आतां कोठें ठेवावी याचा विचार दुष्यंताला व पुरोहिताला पडला असतां अप्सरामातेनें येऊन तिला त्या घोर प्रसंगांतून तेवढ्यापुरतें मुक्त करणें; तपश्चर्या दीर्घकाळ करतां करतां आंगावर वारुळें वाढलीं तरी त्यांची दाद नाहीं, अशा वृत्तीचे ऋषि पहावयास मिळणें; प्रत्यक्ष मृत्यूच्या जबड्यांत उडी टाकण्यास तयार झालेल्या दिलीप राजानें

**एकांतविध्वंसिषु मद्विधानां**
**पिंडेष्वनास्था खलु भौतिकेषु ॥**

असें छातीठोकपणानें, प्रसन्न व निर्भय अंतःकरणानें, सांगणें; अशा एक ना दोन कितीतरी प्रसंगीं अद्भुत रसाचा आस्वाद कालिदासीय वाङ्मयांत आपणांस चाखावयास मिळतो. त्याच्या भरांत आपण असतांना इहलोकाच्या संसाराची हीन परिस्थिति विसरून आपण नव्या आश्चर्यकारक जगांत प्रविष्ट होतों; भूमीवर चाचपडण्याच्या ऐवजीं तुंग पर्वत शिखरांच्या टोकाला जाऊन तेथून वर असलेल्या निर्मल आणि आनंदमय वातावरणाचा उपभोग घेतों. अद्भुत रसालाही कालिदासानें प्राधान्य असें कोठेंच दिलेलें नाहीं; पण त्याचें सानिध्य मात्र इतर रसांच्या आविष्कारांत आपणांस वरचेवर पहावयास मिळतें. चमत्कृति हा काव्याचा फार महत्वाचा भाग आहे आणि चमत्कृति पुष्कळ वेळेला विस्मयप्रधान असते. असामान्य वस्तूंच्या, व्यक्तींच्या, प्रसंगाच्या वर्णनानें हा विस्मय उत्पन्न होत असतो. आणि अशीं वर्णनें ( यांत सामान्याचें वर्णन करतांना त्यांतील असामान्यत्व आविष्कृत करणें याचाही समावेश होतो ) महाकवींच्या काव्यांत पुष्कळ असतातच. तशीं तीं कालिदासीय काव्यांतही सर्वत्र विखुरलेलीं आहेत हें त्याच्या काव्यसृष्टींत विहार करतांना आपल्याला पटतें.

शांत रसाचा स्थायी भाव निर्वेद आहे. सर्व संसार उत्तम प्रकारें केल्यावर निवृत्ति प्राप्त होणें, नश्वर देहाच्या पलीकडचीं तत्वें आहेत त्यांचें आकलन करण्याकरितां प्रयत्न करण्याकडे बुद्धि वळणें, संसारतापानें त्रस्त होऊन या जगाचा वीट येणें — या निरनिराळ्या कारणांनीं निर्वेद – वैराग्य – उत्पन्न होतो. प्रसंगानुसार त्याचें वर्णन कालिदासानें केलेलें आहे.

वार्धके मुनिवृत्तीनाम् ।

हें रघुवंशांतील राजांचें सामान्य वर्णन म्हणूनच त्यानें लिहून ठेविलें आहे.

अथ स विषयव्यावृत्तात्मा यथाविधि सूनवे
नृपतिककुदं दत्त्वा यूने सितातपवारणम् ।
मुनिवनतरुच्छायां देव्या तया सह शिश्रिये
गलितवयसामिक्ष्वाकूणामिदं हि कुलव्रतम् ॥

या श्लोकांत शांत रसाचा उत्तम परिपोष झालेला आहे. आठव्या सर्गांत रघुराजाचेंही वर्णन शांत रसानें परिपूर्ण असें आहे व त्याचा उल्लेख पूर्वी झालेला आहे. रघूला स्वर्गलोक देखील तुच्छ वाटूं लागला; कारण तो सुद्धां नश्वरच;

तेव्हां त्यानें परमेश्वराशीं ऐक्य होण्यासाठीं आपले प्रयत्न खर्ची घातले. शाकुंतलाच्या सातव्या अंकांत संसाराची आच लागून पोळलेली पण केवळ पुत्राकरितां राहिलेली शकुंतला शांत रसाचा परिपोष करिते.

**वसने परिधूसरे वसना**
**नियमक्षाममुखी धृतैकवेणिः ।**

असें तिचें मोठें हृद्य वर्णन कवीनें केलें आहे. रामानें टाकल्यावर सीतेनें देखील संसाराचा निरोप घेतला व मूल झाल्यावर आपण तपश्चर्या करणार म्हणून तिनें निश्चय केला. तिच्या वर्णनांतही ( रघु. १४ ) करुण रसाचा जसा प्रथम आविर्भाव होतो तसा नंतर शांत रसाचा उदय होतो. असो. महाकवींच्या रसवंतीनें रसाची गंगा निर्माण केलेली आहे. तिच्यांत जितकें डुंबावें तितकें थोडेंच आहे. तेव्हां आतां रसाकडून अर्थाकडे वळूं.

८. योग्य शब्दांची निवड करून त्यांच्या साहाय्यानें मनोरम अर्थ निर्माण करणें हें तर कवीचें मुख्य कसब आहे. हा अर्थ रसद्योतक असतो त्याचप्रमाणें ध्वनित असतो; म्हणजे जो वरवर अर्थ असतो त्याच्या आंत विचारपूर्वक गेलें म्हणजे अधिकाधिक अर्थ लक्षांत येऊं लागतो. रघुवंशांत सुरवातीच्या श्लोकाचा उहापोह पूर्वी एकदां प्रसंगानुसार केला आहे. पण द्विरुक्तीचा दोष पदरीं घेऊन सुद्धां त्याच श्लोकाचा उल्लेख पुनः करण्यास हरकत नाहीं :—

**वागर्थाविव संपृक्तौ वागर्थप्रतिपत्तये ।**
**जगतः पितरौ वंदे पार्वतीपरमेश्वरौ ॥**

वाणी आणि अर्थ यांचें पूर्ण ज्ञान व्हावें म्हणून त्या दोहींप्रमाणें निगडित असलेले जगताचे मायबाप पार्वतीपरमेश्वर यांना कवि वंदन करतो. वाणी आणि अर्थ हीं एकमेकांना बिलगलेलीं असतात. शब्दाशिवाय अर्थ नाहीं आणि ज्यांत अर्थ नाहीं त्या शब्दाला कोणी विचारीत नाहीं. शब्द आणि अर्थ एकत्रच असतात; त्यांची ताटातूट होत नसते. त्यांना पार्वतीपरमेश्वरांची कवीनें उपमा दिली. एकत्र असणें, कधींही ताटातूट न होणें हा दोहोंमधला समान धर्म. या समान धर्माच्या अस्तित्वाच्या मुशींत उपमा अलंकार तयार होतो. पार्वतीची उपमा द्यावयाची होती म्हणून "शब्द" हा शब्द न घालतां "वाक्" हा स्त्रीलिंगी शब्द घेतला. उपमा देतांना इतकी खबरदारी कवीला घ्यावी लागते. शब्द सुंदर

असावा लागतो; अर्थ गंभीर असावा लागतो. सौंदर्याचें अधिष्ठान पार्वती; गांभी-र्याचें अधिष्ठान परमेश्वर म्हणजे शंकर. "पितरौ" म्हणजे मातापितरौ; प्रथम शब्द माता म्हणून पुढचा समास पार्वतीपरमेश्वरौ असा घातला; प्रथम परमेश्वर हा शब्द घातला नाहीं. अर्थ सिद्ध होण्यासाठीं शब्दरचनेची फार कसून काळजी घ्यावी लागते. पार्वतीचें सौंदर्य वाणीमध्यें कसें आणावें आणि शंकरासारखें गांभीर्य अर्थात कसें आणावें याचें पूर्ण ज्ञान होण्यासाठीं त्या पार्वतीपरमेश्वरांचा आशी-र्वाद सुरवातीला मागितला आहे.

आतां वर्णन करण्याचा थाट पहा. रघुवंशावर काव्य लिहावयास घेतलें; कारण त्या वंशांतील राजे मोठे लोकोत्तर होऊन गेले:—

त्यागाय संभृतार्थानां सत्याय मितभाषिणाम् ।
यशसे विजिगीषूणां प्रजायै गृहमेधिनाम् ॥

सर्वच राजे संपत्तिमान् असत. यांनींही संपत्ति मुबलक मिळविली व मोठाले खजिने भरून ठेविले. पण ते कशासाठीं—स्वतःची चैन करण्यासाठीं काय ? नाहीं; तर त्यागासाठीं; दान करण्यासाठीं; गरिबांना श्रीमंत करण्यासाठीं; गरजवंतांना साहाय्य करण्यासाठीं; प्रसंग येईल त्यावेळीं उत्कृष्टपणानें विनियोग करण्यासाठीं; स्वतःसाठीं किंवा पोरांबाळांसाठीं नव्हे. हे राजे मितभाषी होते; पण ते सत्य बोलणारे होते. आतां त्या शब्दांतील खोच पहा. अघळपघळ बोलणें म्हणजे कांहीं तरी पाणी मुरत असतें. सत्य हें थोडक्यांतच सांगतां येतें. त्याच्यावर मखलाशी करावी लागत नाहीं. पुष्कळ बोललें कीं त्यांत गप्पा फार असण्याचें भय असतें. म्हणून मितभाषित्व हा गुण आहे. आणि थोडें बोलावयाचें तें सुद्धां खरें बोलावयाचें असें त्या राजांचें कुलव्रत होतें. ते दुसऱ्यांना जिंकीत—पण जयासाठीं, यशासाठीं, त्यांना लुबाडण्यासाठीं नव्हे. ते गृहस्थाश्रमांत पडत —पण मुलेंबाळें होऊन उत्तम व्यक्तींची भर समाजांत पडावी म्हणून—प्रजे-साठीं—केवळ मजेसाठीं नव्हे. अर्थात् त्यांनाही यथाकाल विषयांची आवड होती —पण केवळ मजा आणि बेजबाबदारी ही वृत्ति त्यांची नव्हती. दुसऱ्या एका ठिकाणीं (रघु. ८) अज राजाच्या गुणांचें वर्णन आहे:—

बलमार्तभयोपशांतये
विदुषां सत्कृतये बहुश्रुतम् ।

**वसु तस्य विभोर्न केवलं**
**गुणवत्तापि परप्रयोजना ॥**

याचाही अनुवाद पूर्वी एकदां येऊन गेला आहे. अशा या अत्यंत थोर राजांचें वर्णन कवि करतो व त्यांच्या थोरवीचें बीज वरील लहानशा श्लोकांत सांगतो.

शब्दांत खोंचदारपणा, मार्मिकपणा कालिदास हा फार उत्कृष्टपणें आणतो. रति मदनदहनानंतर शोक करते तेव्हां म्हणते—दारुण अशा विबुधांना तुझी ( शंकराचा समाधिभंग करण्याच्या कार्यासाठीं ) आठवण झाली. येथें विबुध हा शब्द मुद्दाम योजिला आहे. विबुध म्हणजे देव; विबुध म्हणजे विशेष शहाणे. देव जर विबुध खरोखर असते तर शंकराच्या समाधिभंगाच्या भयंकर कामगिरीवर मदनासारख्या सुकुमार व्यक्तीची योजना करण्याचा निष्ठुरपणा त्यांनीं केला नसता. येथें विबुध शब्दानें देवांची चांगलीच निर्भर्त्सना केली आहे.

**मां लोकवादश्रवणादहासीत्**
**श्रुतस्य किं तत्सदृशं कुलस्य ।**

म्हणून सीतेनें रामाला प्रश्न विचारला. मला प्रत्यक्ष अग्निदिव्य करतांना तूं पाहिलेंस आणि आतां लोकवार्ता ऐकून माझा त्याग केलास हें तुझ्या विद्येला आणि कुलाला शोभतें का? या प्रश्नांत रामाच्या विद्येला आणि कुलीनपणाला सीतेनें टोमणा मारला आहे. गोष्ट ( सीताशुद्धि ) प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिली, त्याबद्दल प्रत्यक्ष प्रमाण मिळालें, तिच्याबद्दल दुसरे ( तेथें नसलेले ) लोक शंका घेतात म्हणून जो शंका घेतो त्याला विद्वान् म्हणतां येईल का? आणि लोकांच्या कुत्सितपणापासून आपल्या पत्नीचें जो रक्षण करीत नाहीं त्याला कुलीन म्हणणें रास्त आहे का? पण याहीपेक्षां पुढील खोंचदार टोमणा पहाः—

**नृपस्य वर्णाश्रमपालनं यत्**
**स एव धर्मो मनुना प्रणीतः ।**
**निर्वासिताप्येवमतस्त्वयाहं**
**तपस्विसामान्यमवेक्षणीया ॥** १४–६७

वर्णाश्रमांचें पालन करणें हें राजाचें कर्तव्य आहे म्हणून मनूनें स्पष्ट सांगितलें आहे. तूं मला जरी अशी टाकून दिलीस ( अंगावरचा कपडा फेकून द्यावा तशी झिडकारिलीस ) तरी इतर सामान्य तपस्विजनांची जशी तशी माझ्याही संरक्षणाची

जबाबदारी तुझ्यावर आहे. राजेपणाच्या कर्तव्याच्या नांवाखालीं रामानें सीतात्याग केला होता. तेव्हां त्याला राजाचीं आणखीही कांहीं कर्तव्यें आहेत याची आठवण सीतेनें करून दिली. सीतेचा रामानें जो त्याग केला तो तिला न कळवितां, न बोलतां, न चालतां, अगदीं गुपचुप केला. त्याला वाटलें कीं अतःपर इचा संबंध येण्याची अशा युक्तीनें भीति नको. पण तपश्चर्या करणाऱ्यांचें रक्षण करणें आणि त्यांना सन्मानानें वागविणें हें राजाचें कर्तव्य होतें आणि त्याला अनुसरून मला अशी निर्माल्यवत् वागविणें हें धर्माला सोडून आहे हें तिनें सूचित केलें आणि मनूच्या धर्मशास्त्राचा उल्लेख करून राम धर्मशास्त्राला विसरला होता, आणि म्हणून तो आपल्या बाबतींत अधर्मानें वागला हेंही तिनें मोठ्या चातुर्यानें ध्वनित केलें आहे. शिवाय सीतेच्या तोंडीं धर्मशास्त्राचा उल्लेख घालून कवीनें सीता ही सामान्य स्त्री नव्हती, धर्म-अधर्म, श्रुति-स्मृति यांची तिला चांगली माहिती होती हें स्पष्ट केलें आहे व त्यामुळें वाचकाला रामानें केलेला अन्याय फार तीव्रपणानें जाणवतो.

पूर्वीं निरनिराळ्या ठिकाणीं केलेल्या विवेचनांत अर्थसौंदर्याचीं कित्येक उदाहरणें येऊन गेलीं आहेत. "अस्मान्साधु विचिंत्य संयमधनान्" यांतील संयमधन या शब्दांतील विशेष अर्थ; बटुरूपानें शंकर शंकराचें वर्णन करतो त्यांत विरूपाक्ष, दिगंबर, अलक्ष्यजन्मता, त्रिलोचन वगैरे शब्दांतील खोचा; सहाव्या सर्गाच्या शेवटीं लग्नाची उत्सुकतेनें वाट पहात बसलेल्या शंकराला पशुपति म्हणण्यांत स्पष्ट होणारी साभिप्रायता; इत्यादिकांचा उल्लेख यापूर्वी झालेला आहे. पण मार्मिकपणापेक्षां देखील ध्वनि म्हणजे अर्थ सूचित करण्याची शक्ति हिला साहित्यकारांनीं फार महत्त्वाचें स्थान दिलेलें आहे. "काव्याचा आत्मा रस" या व्याख्येप्रमाणें कालिदासाच्या काव्याची श्रेष्ठता सिद्ध होतेच. पण ज्यांत ध्वन्यर्थ प्रधान आहे तें काव्य उत्तम या व्याख्येप्रमाणेंही कालिदासाच्या काव्याचें स्थान फार उन्नत आहे. पुढील श्लोक पहा:—

**उपस्थितां पूर्वमपास्य लक्ष्मीं**
**वनं मया सार्धमसि प्रपन्नः।**
**तदास्पदं प्राप्य तयातिरोषात्**
**सोढास्मि न त्वद्भवने वसंती ॥ रघु० १४–६३**

पूर्वी ( यौवराज्याभिषेकाच्यावेळीं ) तूं राज्यलक्ष्मीचा त्याग करून मला बरोबर घेऊन वनांत गेलास; ( राज्यलक्ष्मी ही सीतेची सवत अशी कल्पना ); आतां तें स्थान म्हणजे तुझ्या राज्ञीपदाचें स्थान जेव्हां त्या राज्यलक्ष्मीला मिळालें तेव्हां तिचा जो माझ्यावर मोठा राग त्या वेळीं झाला होता तो मनांत ठेवून तुझ्या घरीं मी असलेली तिला खपलें नाहीं; म्हणून ती घरीं येतांच मला तिनें घरांतून बाहेर काढली. हा या श्लोकाचा वाच्य म्हणजे शब्दांवरून सरळ स्पष्ट होणारा अर्थही मोठा चांगला आहे; पण त्याच्या आंत आणखी अर्थ भरलेला आहे. राज्यलक्ष्मी प्राप्त झाली किंवा लक्ष्मी प्राप्त झाली म्हणजे माणसांचे डोळे फिरतात, डोकेंसुद्धां फिरतें; माणसांची पहिली स्थिति रहात नाहीं; पहिल्या ओळखी ते विसरतात; ज्यांच्यावर प्रथम प्रेम होतें, ज्यांचें त्या पहिल्या काळांत आपणांला साहाय्य झालें त्यांची ते फिकीर करीत नाहींत या गोष्टी "लक्ष्मी प्राप्त झाली" असें म्हणतांच आपल्या डोळ्यांपुढें उभ्या राहतात. राज्यलक्ष्मीचा धूर डोळ्यांवर चढल्यामुळें, अधिकाराचा मद उत्पन्न झाल्यामुळें, प्रत्यक्ष पत्नीबद्दल आपलें कर्तव्य काय आहे हें रामचंद्र विसरला असें या श्लोकांतून ध्वनित होतें हें थोड्याशा विचारानें आपल्या लक्षांत येतें. वाच्यार्थांत रामाला दोष न देतां राज्यलक्ष्मीला दोष दिला आहे. पण राज्यलक्ष्मी ही अचेतन वस्तु; तिचा परिणाम ज्याला ती प्राप्त झाली त्याच्यावर होतो. अशा दृष्टीनें राज्यलक्ष्मीचा म्हणून सांगितलेला दोष वस्तुतः रामाचा दोष होता असें स्पष्ट होतें. या प्रकारें या श्लोकांत ध्वनिरूपानें रामाला दिलेला दोष दारुण आहे यांत शंका नाहीं.

सीतेचा आपल्या अवतारसमाप्तीच्या वेळचा करुण रसानें थबथबलेला श्लोक पहाः—

**वाङ्मनःकर्मभिः पत्यौ व्यभिचारो यथा न मे**
**तथा विश्वंभरे देवि मामंतर्धातुमर्हसि ॥ १६–८१**

वाणी, मन आणि क्रिया यांपैकीं कोणत्याही मार्गानें माझ्याकडून पतीच्या बाबतींत जर व्यभिचार झाला नसेल तर हे विश्वंभरे देवि, हे भूमाते, मला आपल्या पोटांत घे. अगदीं साधें वाक्य आहे. पण विश्वंभरा या विशेषणाकडे जरा लक्षपूर्वक पाहिलें म्हणजे तेथें तोच शब्द पाहिजे, दुसरा चालणार नाहीं हें कळतें. सर्व विश्वाचा भार सहन करणारी, सर्व विश्वाला आपल्या पोटांत सांभाळून घेणारी, तिला

सीतेचा भार कांहीं अधिक नव्हता आणि ती विश्वंभरा होती, जगांत ज्यांना दुसरीकडे आधार नाहीं त्यांचें ती मायपोट होती. ज्यांचें जग तुटलें ते शेवटीं तिच्या कुशींत जातात—तिच्यांत विलीन होतात. पण सीतेला जगांत आधार नव्हता काय? तिचीं दोन सुकुमार बाळकें तेथें जवळच होतीं. पित्यांप्रमाणें तिला संकटकाळीं आश्रय देणारा आणि तिनें पुनः पतिगृहीं विराजमान व्हावें म्हणून तिला तेथें घेऊन आलेला परम कारुणिक महर्षि वाल्मीकि तेथें होता आणि लौकिकाच्या कल्पनेनें कठोर झालेला पण तिच्यावर निस्सीम प्रेम करणारा तिचा पति सर्व लोकांसमक्ष तिची पवित्रता पुनः प्रस्थापित झाली कीं तिचा स्वीकार करण्यासाठीं तेथें उत्सुकतेनें बसला होता. मग तिनें "मला पोटांत घे" अशी भूमातेची प्रार्थना कां केली? कांहींतरी बोलावें म्हणून ती तसें बोलली का? नाहीं. ती जें बोलली तें कांहींतरी नव्हतें. कारण खरोखरच तिला आतां दुसरा आधार नव्हता. तिला कोणाची अपेक्षा नव्हती आणि तिची कोणाला अपेक्षा नव्हती हें या दोन ओळींत कवीनें फार चातुर्यानें ध्वनित केलें आहे. तिचीं मुलें मोठीं झालीं होतीं. तिनें त्यांच्यासंबंधीं आपलें कर्तव्य पूर्णपणें पार पाडलें होतें. आतां तिच्याशिवाय त्यांचें चाललें असतें आणि त्यांच्याशिवाय तिचें—पण तिला मुलांकडून कांहींही मिळवावयाचें नव्हतें. माणसांच्या या संसारांत एकच संबंध असा आहे कीं ज्यांत परस्परांपासून अपेक्षा, परस्परांवर सत्ता, परस्परांचा सुखदुःखानुभव हीं पूर्ण प्रमाणांत असतात. तो संबंध पतिपत्नींचा. आईबापांनीं मुलांना द्यावयाचें असतें—त्यांपासून कांहीं घ्यावयाचें नसतें—फार तर वियोगाच्या वेळीं अश्रु आणि श्राद्धाच्या वेळीं तिलांजलि—एवढीच अपेक्षा त्यांची असते. पण त्या अपेक्षेचीही अपेक्षा सीतेला नव्हती; आणि तिचा पति—ज्या दिवशीं त्यानें तिचा अत्यंत अन्यायानें, अत्यंत निष्ठुरतेनें त्याग केला, त्याच दिवशीं तिचा प्राणेश्वर रामचंद्र तिच्या सृष्टींतून नाहींसा होऊन रामचंद्र नावाचा अयोध्येवर राज्य करणारा राजा उरला! तेव्हां त्या राजाच्या घरांत ती काय म्हणून जाण्याला उत्सुक असेल? तिला आतां जगांत आधार नव्हता. मुलांच्यासाठीं तिनें वाल्मीकीचा आधार घेतला. त्याचेंही आतां तिला प्रयोजन उरलें नाहीं आणि तिचें पावित्र्य स्वयंप्रकाश होतें—भूमातेनें तिचें स्वागत केलेलें पाहिलें कीं तेथें जमलेल्या सर्व लोकांची तिच्या पावित्र्याबद्दल खात्री होणार! आणि मग तिचे मुलगे—रामाचे मुलगे ते राजपुत्र होते—त्यांची जगांत कसलीही काळजी करण्याचें तिला कारण नव्हतें. जेथें रामचंद्राचें प्रेमसुद्धां

अशा परिणामाला आलें तेथें मुलांच्या प्रेमाची ती कशाला अपेक्षा बाळगील? रामावर तिचा हक्क होता; तो रामानें तोडला—मोडून फोडून टाकला. आतां तो दुभंगलेला सांधा केवळ लौकिकाचें समाधान करण्यासाठीं पुनः जुळणें शक्य नव्हतें! सीतेला आतां गति एकच! ज्या भूमातेच्या पोटांतून ती बाहेर आली तिच्याच प्रेमळ कुशींत ती संसारानें श्रांत झालेली तपस्विनी, मनस्विनी सीता परत शिरली; असे अनेक विचार या छोट्या अनुष्टुभ् श्लोकामुळें सुचतात.

इंदुमतीच्या विवाहांत सुनंदा प्रत्येक राजाचें वर्णन करीत होती. साध्या वर्णनांत शेवटीं ती मोठ्या चातुर्यानें एखादा महत्त्वाचा दोष ध्वनित करीत असे. इंदुमतीला अर्थात् तो ध्वनित दोष कळे. आपणाला कधीं कधीं तो समजण्यासाठीं थोडाबहुत प्रयत्न करावा लागतो. उदाहरणार्थ, मगधाच्या राजाचें मोठें उत्कृष्ट वर्णन करून त्यांत त्याचें नांव परंतप आहे असें सांगितलें. परंतप म्हणजे शत्रूला त्रास देणारा; पण ज्याला त्रास देण्याची संवय लागली, परंतप असें ज्याचें नांव पडलें, तो एकंदरींत त्रास देणारा म्हणून इंदुमतीनें त्याचा आदर केला नाहीं. "शृंगारचेष्टा" करणाऱ्या राजेलोकांचींही अवलक्षणें इंदुमतीच्या ध्यानांत आलीं याचा मागें उल्लेख आलेला आहेच. परशुरामाचें वर्णन करतांना परशुरामानें खूप आरडाओरडा केला असें सांगितलें, पण राम कांहीं न बोलतां धनुष्य घेऊन आपला पराक्रम सिद्ध करण्यास उभा राहिला. एवढी बडबड करणारा परशुराम आणि बिलकुल न बोलणारा राम हे समोरासमोर उभे राहिलेले पाहून "पौर्णिमेच्या दिवशीं—संध्याकाळच्या वेळीं सूर्य आणि चंद्र दिसतात तसे ते दिसले", असें कवीनें वर्णन केलें आहे. परशुराम सूर्य खरा पण त्याची कांति क्षीण झाली होती; त्याचा अस्तसमय प्राप्त झाला होता. रामचंद्र वयानें लहान; तेव्हां परशुरामाच्या सान्निध्यांत त्याला चंद्राची उपमा शोभते आणि परशुरामाला सूर्याची उपमा देऊन तो त्रासदायक होता हें सुचविलें व रामाला चंद्राची उपमा देऊन तो आल्हाददायक होता हें सुचविलें. साम्यामुळें अलंकार होतो, पण काव्यांत अलंकार होण्याला त्या साम्यामुळें अर्थाच्या सौंदर्यात भर पडली पाहिजे आणि अर्थ अधिक विपुल झाला पाहिजे. अशीं स्थळें कालिदासांत इतकीं आहेत कीं त्यांचा पूर्ण परिचय करून घेणें म्हणजे त्याच्या काव्याचें सुबुद्धपणें अध्ययन करणें असाच अर्थ होतो. येथें फक्त अंगुलिनिर्देश करण्याचा प्रयत्न आहे हें सांगावयास नकोच.

९. उत्तम वैद्य ज्याप्रमाणें निश्चित हितकारक किंवा इष्ट परिणाम व्हावा म्हणून औषधींची योजना करीत असतो, त्याप्रमाणें निश्चित व अभिप्रेत अर्थ निर्माण व्हावा म्हणून कवि शब्दांची योजना करीत असतो आणि अशी योजना असते तेव्हांच "इकडचा शब्द तिकडे करतां येत नाहीं." खरोखरच तो तसा करतां येऊं नये अशी रचना असणें हें उत्तम कवित्वाचें लक्षण आहे. अर्थवती शब्दरचना करून पुनः ती "श्रवणकोमलवर्णराजी" कानाला गोड लागणारी पाहिजे. कुठल्या तरी औषधी कशा तरी एकत्र करून कुणाला तरी दिल्या म्हणजे कांहीं तरी होईल ही जशी खरी वैद्यकी नव्हे तसे कसेबसे ओढूनताणून आणलेले शब्द कसे तरी मांडून कांहींतरी करणें आणि यालाच कविता म्हणा म्हणून हट्ट धरणें आणि ती जुन्या काळच्या तत्वांना धरून नसेल तर ती नवीन युगाची आहे असें समजा म्हणून वर सांगणें इत्यादि तंत्राला कवित्व म्हणत नाहींत. ज्याप्रमाणें रत्नाचा आकार लहान असला तरी त्याचें मोल सुवर्णापेक्षांही मोठें असतें, त्याप्रमाणें शब्दांच्या पूर्ण ज्ञानानें व त्यांचें निरनिराळ्या परिस्थितींत अर्थवाहकत्व काय व किती आहे हें उत्तम समजून, योग्य प्रकारें योजलेल्या थोड्याच शब्दांत अर्थ फार भरलेला असतो. आपण शृंगार रसाचीं उदाहरणें घेतांना उत्तर-मेघांतला पुढील श्लोक घेतला होताः—

तन्वी श्यामा शिखरिदशना पक्वबिंबाधरोष्ठी
मध्ये क्षामा चकितहरिणीप्रेक्षणा निम्ननाभिः।
श्रोणीभारादलसगमना स्तोकनम्रा स्तनाभ्यां
या तत्र स्याद्युवतिविषये सृष्टिराद्येव धातुः॥

या श्लोकाची मल्लीनाथानें जी चर्चा केली आहे तिकडे आपण पाहूं. यक्षानें आपल्या पत्नीचें वर्णन केलें आहे. रस शृंगार आहे तेव्हां कित्येकांच्या दृष्टीला वर्णन पूर्णपणें कळल्यावर जरा वाजवीहून ज्यास्ती म्हणजे "फाजील" आहे असें वाटेल. पण या लोकांच्या दृष्टीची दृष्ट कालिदासाला लागण्याची भीति आपणांला वाटण्याचें कारण नाहीं. चौथा चरण मोठा ध्यानांत ठेवण्यासारखा आहे. ब्रम्हदेवानें जेव्हां स्त्रिया उत्पन्न करण्याला सुरवात केली तेव्हां जवळ संपूर्णपणें सिद्ध असणाऱ्या साहित्याच्या साहाय्यानें उत्तमोत्तम स्त्रीचा नमुना म्हणून त्यानें ही यक्षपत्नी प्रथम निर्माण केली असा चौथ्या चरणाचा अर्थ आहे. ती तन्वी होती, सडपातळ अंगाची होती, स्थूल नव्हती; स्थूलपणानें स्त्रीसौंदर्याची हानि होते असें मत यांतून

निष्पन्न होतें. निदान लठ्ठपणामुळें बेढबपणा, मंदपणा वगैरे उत्पन्न होणारे दुर्गुण "तन्वी" या विशेषणामुळें निराकृत होतात हें उघड आहे. श्यामा शब्दाचा अर्थ युवति, "यौवनमध्यस्थ," यौवनभरानें मुसमुसलेली असा आहे हें वर सांगितलेंच आहे. नंतर "शिखरिदशना" ज्यांना टोक आहे असे दात जिचे आहेत अशी असें म्हटलें आहे. अणकुचीकर दात होते असें सांगण्यांत काय विशेष आहे? या प्रश्नाला मल्लीनाथाचें उत्तर

"एतेन अस्या भाग्यवत्त्वं पत्यायुष्करं च सूच्यते।

यामुळें हिची भाग्यशालिता—जिचा परिणाम पतीचें आयुष्य वृद्धिंगत होतें असा आहे—सूचित होतें. सामुद्रिक शास्त्रांत पुढीलप्रमाणें सांगितलें आहे:—

स्निग्धाः समानरूपाः सुपंक्तयः शिखरिणः श्लिष्टाः
दंता भवन्ति यासां तासां पादे जगत्सर्वम् ॥
तांबूलरसरक्तेपि स्फुटभासः समोदयाः ।
दंताः शिखरिणो यस्या दीर्घं जीवति तत्प्रियः ॥

तेव्हां या शास्त्राधारानें शिखरिदशना हें विशेषण विशेष उचित आहे असें जें मल्लीनाथाचें म्हणणें आहे तें आपण मान्य करणें रास्त होईल. सामुद्रिकावर विश्वास नसणाऱ्यांनासुद्धां कालिदासानें हें विशेषण देऊन सामुद्रिक शास्त्रांत सांगितलेलीं स्त्रियांचीं भाग्यलक्षणें सूचित केलीं हें मान्य झालेंच पाहिजे. पक्वबिंबाधरोष्ठी—जिचा खालचा ओठ पिकलेल्या तोंडल्याप्रमाणें (लाल) आहे—हें नेहमीं येणारें उपमायुक्त विशेषण आहे. मध्ये क्षामा म्हणजे कृशोदरी—कृशांगता असूनसुद्धां उदरगौरव असतें व तें उत्तम आरोग्याचें लक्षण नव्हे—उत्तम रूपाचें तर नव्हेच नव्हे—म्हणून हें दुसरें विशेषण दिलें आहे. चकितहरिणीप्रेक्षणा—भ्यालेल्या हरिणीसारखे जिचे डोळे आहेत अशी. ही हरिणनेत्रांची स्त्रीनेत्रांना द्यावयाची उपमा काव्यवाचकांच्या नेहमींच्या परिचयाची आहे. रतिशास्त्रांत स्त्रियांच्या जाति दिल्या आहेत त्यांत पद्मिनी ही अत्यंत उत्कृष्ट समजतात व पद्मिनीजातीच्या स्त्रीलक्षणांत

चकितमृगदृशाभे प्रांतरक्ते च नेत्रे।

असें सांगितलें आहे. तेव्हां हें विशिष्ट उदाहरण देण्यांत कवीचा एक प्रसिद्ध

उपमा देण्यापेक्षां अधिक हेतु होता हें आपल्या लक्षांत येतें. निम्ननाभि या विशेषणासंबंधीं मल्लीनाथ म्हणतो—

**अनेन नारीणां नाभिगांभीर्यान्मदनातिरेक इति कामसूत्रार्थः सूच्यते।**

म्हणजे हें विशेषण देतांना कामशास्त्रांतील सूत्र कवीनें लक्ष्यांत ठेवलें होतें. श्रोणी-भारामुळें ती मंदगामिनी होती–पण मंदगामिनीत्व हा कांहीं तिचा शारीरिक दोष नव्हता. इत्यादि गोष्टी लक्षांत घेतल्या म्हणजे ज्या शब्दांची योजना कवि करतो ते शब्द विशिष्ट अर्थ धारण करणारे असतात म्हणून तो ती योजना करतो, केवळ त्यांच्या बाह्य स्वरूपावरून सुचणाऱ्या म्हणजे केवळ वाच्य अर्थापुरतीच तो करीत नाहीं हें समजतें. अधम कवींना वाच्यार्थापलीकडे कांहींच माहीत नसतें. पण ज्या कवींना म्हणजे कविब्रुवांना वाच्यार्थही माहीत नसतो त्यांना अधमाधम कवि म्हणावें, दुसरें काय ?

पूर्वमेघांतल्या एका श्लोकांत अर्थचमत्कृति कौतुकास्पद आहे; त्याचा येथें थोडा विस्तरशः उल्लेख करणें युक्त होईल.

**अद्रेः शृंगं हरति पवनः किंस्विदित्युन्मुखीभिः**
**दृष्टोत्साहश्चकितचकितं मुग्धसिद्धांगनाभिः।**
**स्थानादस्मात्सरसनिचुलादुत्पतोदङ्मुखः खं**
**दिङ्नागानां पथि परिहरन्स्थूलहस्तावलेपान् ॥ १४ ॥**

या श्लोकाचें कृष्णशास्त्रीकृत भाषांतरः—

**सरस निचलतरु ज्यावरि शोभति, त्या या गिरीवरूनी।**
**वळुनि उत्तरेकडे अंबरीं चढतां तुज देखोनी ॥ ३४ ॥**
**"काय नवल हें बाई! उडतसे पहा, शिखर वाऱ्यानें।"**
**मुग्ध सुरवधू असें पतीप्रति म्हणतिल आश्चर्यानें ॥ ३५ ॥**
**पाहुनि विशाल तव देहातें, प्रचंडही वेगातें।**
**निश्चित मनिं दिङ्नाग लाजुनी सांडतील गर्वातें ॥ ३६ ॥**

चौथ्या ओळीचें अक्षरशः भाषांतर " रस्त्यांत ( नभोमार्गानें जातांना ) दिङ्नागांना जो आपल्या प्रचंड सोंडेचा गर्व आहे त्याचें तूं हरण करणारा होशील" असें होतें. तुला चित्रकूटाच्या शिखरावरून जातांना पाहिला म्हणजे सुंदर अशा सिद्धांगना अत्यंत चकित होऊन "डोंगराचें शिखर वाऱ्यामुळें उडून जात आहे काय"

असें मोठ्या आश्चर्यानें म्हणतील. आतां या ठिकाणीं दुसराही अर्थ आहे असें कित्येकांचें म्हणणें आहे व तो अर्थ श्लिष्ट पदें व ध्वनि यामुळें चांगला सिद्ध होतो. कालिदासाचा संदेश घेऊन म्हणजे काव्य घेऊन मेघ सरसनिचुल अशा स्थानापासून निघाला. चित्रकूट पर्वतावर निचुल ( वेतस ) झाडें आहेत हा वाच्यार्थ वर आलाच आहे. कालिदासाचा एक सहाध्यायी मित्र निचुल म्हणून मोठा रसिक पंडित होता. कालिदासाच्या काव्यांत कोणी दूषणें काढूं लागला तर तो त्याचा लागलीच परिहार करीत असे. तेव्हां अशा रसिक मित्रापासून कालिदासाचें काव्य घेऊन मेघ उत्तरेकडे गेला म्हणजे त्याला दिङ्नाग भेटतील. दिङ्नागाचार्य हे कालिदासाचे प्रतिस्पर्धी आणि विरोधी होते. कालिदासांत दोष आहेत असें म्हणण्याचा त्यांचा अट्टाहास असे. त्यांचा स्थूल हस्तावलेप म्हणजे लेखणीचे फटकारे—ज्यांत चातुर्यही बिलकुल नाहीं—यांचाही तूं जातां जातां परिहार करशील; म्हणजे या मेघदूताच्या ( काव्याच्या ) साहायानें त्यांच्या दुष्ट टीकेचें वैयर्थ्य सिद्ध करशील. आणि तें तसें तूं केलेंस म्हणजे ( सारस्वत ) सिद्धांच्या म्हणजे कवि म्हणून जे प्रसिद्ध आहेत त्यांच्या मुग्ध ( फारशा न बोलणाऱ्या ) स्त्रिया तुझा तो दिङ्नागाचार्यांचा पराभव करण्याचा उत्साह पाहून चकित होतील आणि " डोंगराचें शिखर वाऱ्यानें हालवून पाडून टाकलें " असें म्हणतील म्हणजे डोंगरासारखा जो प्रचंड विद्वान् दिङ्नागाचार्य त्यांचें शृंग ( प्रधानत्व, महत्व ) गेलें असें म्हणतील, त्याचें नाक खालीं झालें असें म्हणतील. कालिदासाच्या काव्यावरही कांहीं दिङ्नागांचा, त्या वेळच्या शिष्टांचा, डोळा होता ही गोष्ट यावरून सूचित होते व रघुवंशांत स्वतःचें " मंदः कवियशः प्रार्थी " असें नम्रपणें वर्णन करणारा मेघदूतांत अशा शिष्टांचें शृंग आपल्या काव्यापुढें लवलें पाहिजे अशा आत्मविश्वासानें भरलेला होता असेंही यावरून म्हणण्यास हरकत नाहीं. अर्थात् कालिदास हा उत्कृष्ट कवि होता, महाकवि होता किंवा कवींनाही स्फूर्ति देणारा कवि होता. म्हणूनच तो चिडखोर नव्हता. काव्यांत नसलेलीं दूषणें हुडकणारे कोणी दिङ्नाग जर असले तर त्यांच्या टीकेचा परिहार करण्याची त्याची तयारी होती. पण एरव्हीं आपल्या काव्यावर यथान्याय टीका कोणीहि करावी या मताचा तो होता. आपलें काव्य चांगल्या रसिक लोकांनीं लक्षपूर्वक वाचावें व त्यांनीं त्याची यथातथ्य परीक्षा करावी अशी त्याची फार इच्छा होती. परीक्षेला तो भीत नव्हता. परीक्षेला भिणें हें कवित्वाचें लक्षणच नव्हे. ज्याचें

कवित्व उत्तम आहे त्यानें परिक्षेला भिण्याचें कारणच नाहीं.

हेम्नः संलक्ष्यते ह्यग्नौ विशुद्धिःश्यामिकापि वा ।

सुवर्णाची परीक्षा अग्नि करतो व तें शुद्ध आहे का हिणकस आहे हें ठरवितो. अग्नीसारख्या प्रखर टीकेंतून शुद्ध ठरण्यासारखें ज्यांचें काव्य आहे ते टीकेला भीत नाहींत; फक्त कोणी मुद्दाम शिंताडे उडविणारे ( हस्तावलेप करणारे ) दिङ्-नाग असल्यास त्याचा समाचार वेळीं प्रसंगीं घेतात.

मेघदूतांत अवंतीचें वर्णन आलें आहे तें देखील चमत्कृतिपूर्ण आहे.

प्राप्यावंतीनुदयनकथाकोविदग्रामवृद्धान्
पूर्वोद्दिष्टामनुसर पुरीं श्रीविशालां विशालाम् ।
स्वल्पीभूते सुचरितफले स्वर्गिणां गां गतानां
शेषैः पुण्यैर्हृतमिव दिवः कांतिमत्खंडमेकम् ॥ पूर्वमेघ ३० ॥

अवंती हें जनपदाचें म्हणजे देशाचें किंवा प्रांताचें नांव होतें. त्याची श्रीविशाला (उज्जयिनी) म्हणून राजधानी होती. उदयनासंबंधीं म्हणजे वत्सराजासंबंधीं इतिहास या प्रांतांत झाल्यामुळें तेथें गांवोगांवीं वृद्ध माणसें उदयनाच्या गोष्टी सांगत. त्या उज्जयिनीचें म्हणजे श्रीविशाला नगरीचें वर्णन कवीनें मोठ्या खुबीनें केलें आहे. पुण्य कर्में करून कांहीं लोक स्वर्गलोकीं गेले; तेथें त्यांचीं पुण्यें क्षीण झाल्यावर ते मनुष्यलोकीं आले. पण त्यांचें कांहीं पुण्य शिल्लक होतेंच; त्या पुण्याईच्या जोरावर स्वर्गलोकांचा एक सुंदर भाग त्यांनीं खालीं येतांना आणला; आणि तो भाग म्हणजे श्रीविशाला नगरी; म्हणजे तिचें वैभव स्वर्गासारखें आहे.

मेघदूतांतला आणखी एक चमत्कृतिपूर्ण श्लोक पहाण्यासारखा आहे.

तस्माद्गच्छेरनुकनखलं शैलराजावतीर्णां
जन्होः कन्यां सगरतनयस्वर्गसोपानपंक्तिम् ।
गौरीवक्त्रभृकुटिरचनां या विहस्यैव फेनैः
शंभोः केशग्रहणमकरोदिंदुलग्नोर्मिहस्ता ॥ पू. मे० ५०

मेघाच्या रस्त्यावर कुरुक्षेत्र लागलें; नंतर सुप्रसिद्ध हरिद्वार क्षेत्र लागलें. हें क्षेत्र कनखल या दुसऱ्या क्षेत्राजवळ आहे व तेथून हिमालयाची सुरवात होते. या ठिकाणीं गंगा म्हणजे जान्हवी (जन्हुराजाची कन्या) अवतरली. अर्थात्

जान्हवीचा उगम येथून पहाडांत दूर—गंगोत्रीच्याहि पलीकडे—आहे. पण येथें भगीरथाच्या प्रयत्नानें सगरराजाच्या मुलांना सद्गति देण्यासाठीं ती आली व ती शंकरानें मस्तकावर धारण केली—तिच्या प्रचंड वेगानें जगांत जलप्रलय होऊं नये म्हणून शंकरानें तिला आपल्या जटेंत अडवून धरली अशी कथा आहे. त्या कथेला उद्देशून येथें म्हटलें आहे कीं पार्वती (शंकराची पत्नी) डोळे वटारून तिच्याकडे पहात होती, पण आपल्या फेनमिषानें (फेसाच्या मिषानें) ती पार्वतीला हंसली आणि शंकराच्या मस्तकावर चंद्र होता तेथपर्यंत आपले लाटारूप हात पोहोंचवून तिनें शंभूची जटा धरली—त्याचें केशग्रहण केलें. म्हणजे सवती (पार्वती) च्या रागाला न जुमानतां तिनें शंकराच्या केसांतून बोटांनीं संवाहन करण्यास कमी केलें नाहीं. इंदुलग्नोर्मिहस्ता—उर्मीरूप हातांनीं शंकराच्या कपाळावर इंदु—चंद्र होता तेथें ती पोंचली हा वाच्यार्थ सरळच आहे. पण जान्हवीच्या लाटा इतक्या उंच उडत होत्या कीं त्या आकाशस्थ चंद्रापर्यंतही पोहोंचत होत्या हाही अर्थ ध्वनित आहेच. हरिद्वारापासून बद्रीनारायण आणि गंगोत्री इकडे जातांना गंगा आणि तिला मिळणाऱ्या अलकनंदा वगैरे अत्यंत वेगयुक्त नद्या ज्यांनीं पाहिल्या आहेत त्यांना हें वर्णन अतिशयोक्तिपूर्ण न वाटतां यथार्थ वाटेल. शिवाय पार्वती रागारागानें पहात होती तरीसुद्धां जान्हवी शंकराच्या मस्तकापर्यंत गेली—त्याच्या डोक्यावर जाऊन बसली हाही अर्थ ध्वनित आहेच.

येथें दुसऱ्या विषयाकडे वळण्यापूर्वी मेघदूतांत चित्रकूटापासून यक्षांच्या अलका नगरीपर्यंत जो मार्ग यक्षानें निर्दिष्ट केला आहे तो लक्षांत ठेवण्यास हरकत नाहीं. रामगिरीवर म्हणजे चित्रकूट पर्वतावर यक्षाला मेघ भेटला. चित्रकूट अलाहाबादच्या खालीं माणिकपुराजवळ आहे. तेथून उत्तर दिशे-कडे वळण्यास यक्ष मेघाला सांगतो. मानससरोवराकडे जावयास निघालेल्या राजहंसांचाही तोच मार्ग होता असेंही कवीनें सांगितलेलें आहे. पुढें त्याला आम्रकूट डोंगर लागला. नंतर त्याला रेवा म्हणजे नर्मदा लागली. नर्मदेकडे येण्यासाठीं त्याला थोडेंसें दक्षिणेकडे आलें पाहिजे. जबलपुराकडे नर्मदा आहे व विंध्याद्रि हा चित्रकूटाच्या कांहींसा दक्षिणेस येतो. नंतर तो दशार्ण देशांत आला म्हणजे माळवा प्रांताच्या नजीक आला. भिल्सा नांवाचें सध्यांचें शिंदे राज्यांतील लहानसें शहर आहे त्यालाच विदिशा म्हणत. ती विदिशा ही या दशार्ण देशाची

राजधानी होती. तेथेंच बिटवा ( वेगवती ) ही नदी आहे. येथून उत्तरेकडे सरळ वळलें तर उज्जयिनी लागत नाहीं. मेघ विदिशेहून उज्जयिनीला जावयाचा होता. पुढें तो देवगिरीला गेला. हें ठिकाण उज्जयिनीच्या उत्तरेस असावें. नंतर त्याला चमर्ण्वती किंवा चंबळ ही नदी लागली; तेथून दशपूरनगर, तेथून गंगातटाकीं ब्रह्मावर्त, तेथून दिल्लीच्यावर कुरुक्षेत्र, तेथून हरिद्वार, नंतर हिमालयपर्वतावरचें क्रौंच नांवाचें शिखर, तेथून कैलास-पर्वत, आणखी तेथून अलका—कुबेराची नगरी असा हा मार्ग आहे. म्हणजे पूर्वेकडे चित्रकूटाहून निघून नंतर कांहींसें दक्षिणेकडे नर्मदेपर्यंत येऊन उज्जयिनीपर्यंत जाऊन तेथून वर ब्रह्मावर्त कुरुक्षेत्र हरिद्वार या मार्गानें कैलासपर्वतापर्यंत असा हा मेघमार्ग आहे. कैलासपर्वतापर्यंत यात्रेकरू जातात व कालिदासाच्या काळींही ते जात असले पाहिजेत हें उघड आहे. आणि म्हणून मेघदूतांत वर्णन केलेला हा काव्यमय रस्ता खरोखर सामान्य जनांच्या नसला तरी धाडसी यात्रेकरूंच्या व प्रवाशांच्या परिचयाचा आहे.

१०. मेघदूत या खंडकाव्याविषयीं आणखी थोडासा उल्लेख या भागाच्या शेवटीं करावयाचा आहे. सध्यां ज्याप्रमाणें अर्थसौंदर्याचे मेघदूतांतील आपण कांहीं नमुने पाहिले तसे शाकुन्तलांतील कांहीं नमुने थोडक्यांत पाहूं. शाकुंतलाच्या पहिल्या अंकांत कांहीं तपस्विकन्यांसहित शकुंतला दुष्यंताला दिसली; त्यांना पाहून राजा म्हणतो. "अहो मधुरमासां दर्शनम्" "काय यांचें गोड स्वरूप !" 'अहो' हा शब्द विस्मय दाखविणारा आहे. आणि विस्मय वाटण्याचें कारण टीकाकार राघवभट्ट म्हणतो त्याप्रमाणें "सौंदर्यातिशयदर्शन" हें होय. त्या सर्वच ऋषिकन्यका अत्यंत सुंदर होत्या. राजा पुढें म्हणतो :—

> शुद्धांतदुर्लभमिदं वपुराश्रमवासिनो यदि जनस्य ।
> दूरीकृताः खलु गुणैरुद्यानलता वनलताभिः ॥ १६ ॥

"या आश्रमांत राहणाऱ्या साध्यासुध्या माणसांचें हें सुंदर रूपयुक्त शरीर जर राजांच्या अंतःपुरांत ( राजस्त्रियांत ) मिळणें दुर्लभ तर गुणांच्या बाबतींत अरण्यांतल्या लतांनीं उद्यानांतील लतांवर मात केली असेंच म्हटलें पाहिजे" गरीब व शांत वृत्तीच्या आईबापांच्या वनांत राहणाऱ्या त्या मुलींचें सौंदर्य राजस्त्रियांपेक्षां, श्रीमंतींत वाढलेल्या, नटणाऱ्या, थटणाऱ्या, मोहिनी कशी घालावी याचा थोडाबहुत अभ्यास केलेल्या अशा स्त्रियांपेक्षां किती तरी अधिक होतें. उद्यानांत म्हणजे

बगीच्यांतही जोपासना करून वाढविलेल्या लता असतात; अगदीं त्या विषयाच्या शास्त्राप्रमाणें माळी त्यांची निगा राखतो; पण प्रत्यक्ष सृष्टीच्या खुल्या हवेंत वाढलेल्या लतांपुढें त्यांची काय मातब्बरी! या लहानशा श्लोकांत उघड्या हवेंत, रानावनांत, खेड्यापाड्यांत, साध्या राहणींत आणि शहराच्या कृत्रिम राहणींत कसें अंतर पडतें आणि साधें पण खरें सौंदर्य हें कृत्रिम उपायांनीं सिद्ध केलेल्या सौंदर्यापेक्षां किती मोहक असतें या गोष्टी कवीनें सूचित केल्या आहेत. आश्रमांत राहणाऱ्यांना " जन " हा शब्द लावलेला आहे. जन म्हणजे सामान्य जन; आणि शुद्धांत म्हणजे राजस्त्रिया म्हणजे विशेष जन; रानांतल्या लता म्हणजे ज्यांची विशेष निगा कोणी करीत नाहीं अशा; उद्यानांतल्या लता म्हणजे काळजीपूर्वक वाढविलेल्या. अशा प्रकारें निसर्गाचें सौंदर्य आणि कृत्रिम सौंदर्य, निसर्गांतील राहणी आणि शहांरतील राहणी, साधी राहणी आणि श्रीमंतीची राहणी यांतील विरोध व तारतम्य या ठिकाणीं लक्षांत येतें. त्या कन्यकांतील अमुक शकुंतला हें कळल्या-वरही तिचें शरीर " अव्याजमनोहर " आहे असें राजा म्हणतो; अव्याजमनोहर म्हणजे स्वभावसुंदर; तें सुंदर असलें तरी त्याला बाह्य कारण कांहींही नव्हतें. साधीं वल्कलें ती नेसली होती, तरी पण उंची पैठण्या आणि शालू परिधान कर-णाऱ्या स्त्रियांपेक्षां तिचें स्वरूप मधुर दिसत होतें. त्याचें कारण राजानें बरोबर ताडलें:—

**किमिव हि मधुराणां मंडनं नाकृतीनाम्।**

ज्यांचें शरीरच सुंदर त्यांना कांहींही शोभतें. तंत्राची आवश्यकता स्वाभाविक सौंदर्य नसलें म्हणजेच फार भासते आणि पुष्कळ वेळां तंत्राचा भडिमार करून-सुद्धां " तुका म्हणे तेथें पाहिजे जातीचें। येरां गबाळाचें काम नाहीं " या वचनाची आठवण होते.

शाकुंतलाचा चौथा अंक हा सौंदर्याबद्दल शतकानुशतकें प्रसिद्ध आहे. त्यांत शकुंतलेचें अंतःकरण आणि कण्वाचें अंतःकरण यांचें चित्रण कवीनें मोठ्या कुशलतेनें केलेलें आहे. " यास्यत्यद्य शकुंतलेति " अशी सुरवात होणारा काश्यपमुखांतला श्लोक सर्व रसिकांच्या तोंडीं खेळलेला आहे. " आज शकुंतला जाणार म्हणून माझें अंतःकरण उत्कंठेनें, चिंतेनें व्याकुळ झालें आहे. अद्यापि ती गेलेली नाहीं, जायालाही थोडा अवकाश आहे—पण ती जाणार या

विचारानेंच मी व्याकुळ झालों आहें. डोळ्यांतून अश्रू बाहेर पडूं पाहताहेत, पण ते दाबून ठेवल्यामुळें गळा दाटून आला आहे, धड बोलवत नाहीं, शब्द उमटत नाहीं. अंतःकरण चिंतेनें भरून गेल्यामुळें दृष्टीला कांहीं दिसत नाहींसें झालें आहे. मी अरण्यांत राहणारा, तपस्वी, योगी, जितेंद्रिय, संसाराबद्दल विरक्त, मायाममता यांचे पाश तोडून टाकलेला; अशा माझी जर शकुंतलेच्या ठिकाणीं असलेल्या स्नेहामुळें ही विव्हलता, माझी जर ही स्थिति, तर जे गृहस्थाश्रमी आहेत, पोरांबाळांसाठीं रात्रंदिवस जे खस्ता खाताहेत, जगांतला सर्व आनंद ज्यांचा त्या आपल्या मुलांबाळांत गुरफटलेला आहे, ज्यांना विशेष ज्ञान नाहीं, वैराग्याची आंच ज्यांना लागलेली नाहीं, मायाममतेमुळें जे ऐहिक विषयांत मग्न आहेत, त्यांना कन्येचा वियोग होतांना केवढें दुःख होत असेल!" अशा तऱ्हेचा केवढा तरी अर्थ त्या चार ओळींच्या श्लोकांत भरलेला आहे. कण्व धैर्यशाली होता—जितेंद्रिय होता—शरीरावर त्याचा अंमल होता—लाडक्या शकुंतलेचा वियोग होणार म्हणून त्याचे देखील डोळे पाण्यानें डबडबले—त्यानें अश्रु मागें सारले—पण जेथें अंतःकरणच प्रेमाच्या भावनेंत अपरंपार भरून गेलें तेथें नुसते अश्रु मागें सारून काय होणार—पोटांत आलेला आवेग तो कसा दाबणार—त्याला बोलावेंसें वाटत होतें—पण गळा दाटून आला—शब्द बाहेर पडेना. आणि तो जितेंद्रिय होता, साधु होता म्हणूनच थोर होता म्हणजे खरें बोलणारा होता. म्हणून अंतःकरणाची झालेली स्थिति त्यानें प्रकट केली. तो थोर होता पण माणूसच होता. कवीनें सांगितलेल्या न्यायाप्रमाणें

अभितप्तमयोपि मार्दवं
भजते कैव कथा शरीरिषु।

कितीही ज्ञानी झाला, कितीही जितेंद्रिय झाला तरी, आपल्या स्त्रियांच्या भाषेंत बोलावयाचें म्हणजे, त्यांचासुद्धां "आंतड्यावर उपाय चालत नाहीं." ज्ञानदेव समाधिस्थ होणार हें कळल्यामुळें एवढा ज्ञानी निवृत्तिनाथ, ज्ञानदेवाचा गुरु, पण तोही ढळढळां रडूं लागला आणि म्हणाला,

निवृत्तिदेव म्हणे करतां समाधान
कांहीं केल्या मन राहात नाहीं ॥

बांधल्या तळ्याचा फुटलासे पाट
ओघ बारा वाट मुरडताती ॥
बांधल्या पेंढीचा सुटलासे आळा
तृण रानोमाळा पांगलेंसें ॥
हरिणीवीण खोली पडियेली वोस
दशदिशा पाडस भ्रमताती ॥
मायबापें आम्हां त्यागियेलें जेव्हां
ऐसें संकट तेव्हां झालें नाहीं ॥
नामा म्हणे देवा पेटला हुताशन
करा समाधान निवृत्तीचें ॥

कण्वाच्या अंतःकरणाची जी स्थिति कालिदासानें वर्णन केली आहे तशीच गोड मराठींत निवृत्तिनाथासारख्या ज्ञानराजयाच्या गुरूची अवस्था नामदेवानें वर्णन केलेली आहे. जेथें अंतःकरणांत स्नेहाचा हुताशन धाडधाड पेटला तेथें त्याला कोण शांत करणार! प्रत्यक्ष विठ्ठलाला निवृत्तीचें समाधान करतां आलें नाहीं; एवढें ज्ञान. गांठीं होतें पण कण्वाला त्या प्रसंगीं उसळून बाहेर आलेला हुंदका दाबतां आला नाहीं. आणि त्यांत काय नवल आहे! मातापितरांच्या अपत्य-प्रेमाला गुणावगुणांची देखील पर्वा नाहीं. मग शकुंतला तर "मूर्तिमती सत्क्रिया" होती! तिच्या गुणाचें वर्णन ह्या चौथ्या अंकांत करतांना कालि-दासाची वाणी विशेषच उदात्त झाली आहे. या प्रसंगींच्या कित्येक श्लोकांचा विचार पूर्वी केलेला आहे. पण प्रत्यक्ष शकुंतलेच्या पायांत येऊन अडखळणारा आणि तिला अडविणारा तो मृग आपणालाही अडवितो—पुनः पुनः अडवितो आणि त्याच्या त्या स्नेहपूर्ण दृष्टीनें जेव्हां आपण त्या उदार आणि प्रेमळ कन्यके-कडे पहातों तेव्हां आपणालाही तिच्या गोड स्वभावानें कायमची मोहिनी पडते.

यस्य त्वया व्रणविरोपणमिंगुदीनां
तैलं न्यषिच्यत मुखे कुशसूचिविद्धे ।
श्यामाकमुष्टिपरिवर्धितको जहाति
सोयं न पुत्रकृतकः पदवीं मृगस्ते ॥ ४–१४

तो मृग शकुंतलेनें मुलासारखा बाळगला होता. धान्याच्या मुठी त्याला खायाला घालून तिनें तो वाढविला होता. एकदां गवत खातां खातां तें त्याच्या तोंडाला टोचलें. तेव्हां त्यामुळें झालेली जखम बरी व्हावी म्हणून इंगुदीचें तेल तिनें त्या ठिकाणीं लावलें आणि त्याला बरें केलें. तो हरिण कांहीं तिच्या पायांतून दूर होईना. आणि त्या मृगाच्या त्या प्रेमानें शकुंतलेच्या अंतःकरणाचें पाणी पाणी झालें आणि तें अश्रुरूपानें बाहेर पडूं लागलें. बाळगलेल्या मृगाबद्दल जिचें एवढें प्रेम त्या शकुंतलेचा वियोग होतांना कण्वाच्या अंतःकरणांत खळबळ उडाली यांत काय आश्चर्य! आणि त्या पुत्रकृतक हरिणाला गवत टोचून झालेली जखम बरी व्हावी म्हणून जिचा एवढा प्रयत्न ती आपल्या पोटच्या गोळ्यावर केवढें प्रेम करील हें काय सांगावयास पाहिजे? या मुग्ध आणि शांतप्रकृति शकुंतलेनें पांचव्या अंकांत जो क्षणभर जमदग्नीचा अवतार धारण केला तो तरी त्या पोटच्या गोळ्यावर कसलाही अपवाद येऊं नये म्हणूनच नव्हे काय?

"तावदत्र स्वच्छंदचारिणी कृतास्मि"

"मी येथें स्वैराचारी ठरलें!" म्हणून तिनें जो हंबरडा फोडला तो त्या बाळकासाठींच ना? शाकुंतलांत अथपासून इतिपर्यंत सौंदर्य भरलेलें आहे. पण चौथ्या अंकांतील ती कन्यास्वरूपी शकुंतला वरचेवर आपल्या चिंतनांत घोळते. कारण तेथचें तिचें स्वरूप नुसतें अव्याजमनोहर नाहीं, तें उदात्ततेचें मूर्तिमंत पूर्णत्व आहे.

११. हें अर्थप्रकरण वाटेल तितकें लांबवितां येईल; पण सुरवातीच्या भागांतून निरनिराळ्या ग्रंथांतील अर्थाचेंच वास्तविक विवेचन आहे म्हणून आणि स्थलमर्यादा लक्षांत घेऊन आपण आतां अलंकारांकडे वळूं. कालिदासाकडे अलंकारांची संपत्ति कुबेरासारखी अपरंपार आहे. पण तो केवळ अलंकारांची भरती करून मात्र आपल्या काव्याला उजळा देत नाहीं. त्याचें काव्य जातीचें सुंदर असतें आणि उचित अलंकारांच्या साहाय्यानें तें सौंदर्य खुलून दिसतें. उपमा अलंकारांबद्दल कालिदास विख्यात आहे. उपमा, रूपक आणि उत्प्रेक्षा हे साम्यावर आधारलेले अलंकार त्याच्या काव्यांत विपुल आहेत. कित्येक श्लोकांत तर दोन, तीन, चार असे अलंकार तो ठेवून देतो आणि ते त्यांची पारख असणाऱ्यांनाच बरोबर ओळखूं येतात. उपमा अलंकारांचें "वागर्थाविवसंपृक्तौ" हा यापूर्वी आपल्या

परिचयाचा झालेला श्लोक हें एक उत्तम उदाहरण आहे. त्यांत या अलंकारांच्या साहाय्यानें अर्थाचें सौंदर्य कसें वाढलेलें आहे याची चर्चा यापूर्वी आपण केलेली आहे. उपमेचें आणखी एक सुंदर उदाहरण शाकुंतलांतील देतां येईल. राजा शकुंतलेचें वर्णन करतो:—

अधरः किसलयरागः कोमलविटपानुकारिणौ बाहू ।
कुसुममिव लोभनीयं यौवनमंगेषु सन्नद्धम् ॥ १–१९

तिचा खालचा ओठ कोवळ्या पानासारखा लाल आहे; कोवळ्या फांदीप्रमाणें तिचे हात आहेत; आणि तिच्या अंगाअंगांतून रसरसणारें तारुण्य, पुष्पासारखें आकर्षक आहे. संस्कृत अलंकारिकांनीं उपमेचे निरनिराळे प्रकार सांगितलेले आहेत. त्यांतले तीन चार प्रकार या श्लोकांत एकत्र आले आहेत म्हणजे त्यांची संसृष्टि झालेली आहे असें शाकुंतलाचे व्याख्याकार राघवभट्ट यांनीं सांगितलें आहे. पण त्या प्रकारची चर्चा येथें करण्याला अवकाश नाहीं व अलंकारशास्त्राचें तांत्रिक अध्ययन करणारे आहेत त्यांहून इतरांना ती चर्चा मनोरंजकही वाटणार नाहीं. असो. कालिदासीय वाङ्मयांतील सर्व उपमांचा संग्रह करणें म्हणजे समुद्रांतील पाणी भरून ठेवण्यासारखें आहे. भरून भरून भरणार किती ? मल्लीनाथानें जें म्हटलें आहे कीं

प्रायिकश्चोपमालंकारः कालिदासोक्तकाव्यादौ ।

तेंच खरें आहे. तें लक्षांत ठेवून आणखी कांहीं अलंकार नमुन्यासाठीं पाहूं.

उत्प्रेक्षा अलंकाराचें एक चमत्कृतियुक्त उदाहरण मेघदूतांत आहे. कैलास पर्वताचें वर्णन करतांना म्हटलें आहे:—

शृंगोच्छ्रायैः कुमुदविशदैर्यो वितत्य स्थितः खं
राशीभूतः प्रतिदिनमिव त्र्यंबकस्याट्टहास्यः ॥

कैलासपर्वताचीं शिखरें हिमाच्छादित असल्यामुळें अगदीं पांढऱ्या कमळाप्रमाणें निर्मळ होतीं. शिखरें फार उंच होतीं आणि तीं सर्व एकवटून आकाशभर पसरून राहिलेलीं दिसत होतीं; त्यावरून शंकराचें हें मोठ्यानें हंसणेंच एकवटून येथें राहिलें आहे कीं काय असें वाटलें. अट्टहास्यांत तोंड पुष्कळ उघडतें आणि दांतही दिसतात. हास्याचा रंग शुभ्र असा कवींचा संकेत आहे आणि

दांतही पांढरे शुभ्र असतात. ते दांत शिखरासारखे दिसले आणि त्या दांतांची शुभ्रता आणि त्या हंसण्याची शुभ्रता यांच्या एकवटण्याची कल्पना हिमाच्छादित शिखरांच्या उंचपणावरून झाली. असो. याप्रमाणें अलंकारशास्त्रांत सांगितलेल्या बहुतेक सर्व अलंकारांचीं उदाहरणें कालिदासांत मुबलक मिळतील. पण त्या त्या अलंकारांच्या व्याख्या सांगून त्या त्या उदाहरणांची फोड करावयाची म्हणजे एक निराळाच ग्रंथ होईल व केवळ मराठी वाचकांना संस्कृत श्लोकांचा एवढा भार उचलावयास लावणें युक्तही होणार नाहीं. पण जशी कालिदासाची उपमा प्रसिद्ध आहे तसा त्याचा अर्थांतरन्यास हा अलंकार फार प्रसिद्ध आहे. त्याची कांहीं उदाहरणें आपण घेऊं.

अलंकारचंद्रिकेंत अर्थांतरन्यासाची व्याख्या पुढीलप्रमाणें दिलेली आहे:—

" जेव्हां प्रकृत सामान्य अर्थाचें समर्थन अप्रकृत विशेष अर्थानें केलेलें असतें अथवा जेव्हां प्रकृत विशेष अर्थाचें समर्थन अप्रकृत सामान्य अर्थानें केलेलें असतें तेव्हां अर्थांतरन्यास अलंकार होतो. "

शाकुंतलांतील पुढील सुप्रसिद्ध श्लोकाचा उल्लेख वर केलेला आहे.

**सरसिजमनुविद्धं शैवलेनापि रम्यं**
**मलिनमपि हिमांशोर्लक्ष्म लक्ष्मीं तनोति ।**
**इयमधिकमनोज्ञा वल्कलेनापि तन्वी**
**किमिव हि मधुराणां मंडनं नाकृतीनाम् ॥**

कमळ जरी शेवाळानें भरलेलें असलें तरी सुंदर दिसतें; चंद्रावरचा डाग जरी मलिन असला तरी तो चंद्राची शोभा वाढवितो; ही सुंदर शकुंतला वल्कलें नेसली आहे तरी त्यामुळें अधिकच सुंदर दिसते. ( कारण सिद्धांत हा आहे कीं ) ज्या आकृति सुंदर आहेत त्यांनीं कांहींही घातलें तरी तें शोभून दिसतें.

यांत शेवटचें जें वाक्य तें अप्रकृत सामान्य अर्थानें केलेलें समर्थन; कोणाचें, तर पहिल्या तीन ओळींत जीं तीन वाक्यें आहेत त्यांतील प्रकृत विशेष अर्थाचें. प्रकृत म्हणजे ज्याचें आपण वर्णन करीत आहों तो पदार्थ, ज्याला वर्णन करण्यासाठीं दुसऱ्या पदार्थाची आपण उपमा देतों; हा दुसरा पदार्थ म्हणजे अप्रकृत; तेव्हां प्रकृत म्हणजे उपमेय आणि अप्रकृत म्हणजे उपमान. जेव्हां प्रथम सामान्य सिद्धांत सांगून त्याचें समर्थन आपण विशेष उदाहरणें देऊन करतों

किंवा जेव्हां विशेष उदाहरणाचें समर्थन आपण सामान्य सिद्धांतानें करतों तेव्हां हा अलंकार होतो. हा जो सामान्य सिद्धांत या अलंकारांत प्रकृत किंवा अप्रकृत म्हणून सांगावा लागतो त्यालाच सुभाषित म्हणतात.

किमिव हि मधुराणां मंडनं नाकृतीनाम् ।

हें सुभाषित किंवा सामान्य सिद्धांत. अशीं सुभाषितें कालिदासवाङ्मयांत फार आहेत व त्यांचीं कांहीं उदाहरणें येथें आपण घेऊं.

" कामार्ता हि प्रकृतिकृपणाश्चेतनाचेतनेषु ॥ "

भाषांतर—तुल्य भासती सजीवनिर्जीव विरहग्रस्त जनाते ॥

" याच्ञा मोघा वरमधिगुणे नाधमे लब्धकामा ॥ "

भाषांतर—गुणवंताच्या जवळ याचना विफलहि बरवी वाटे ।
नको नको ती नीचापाशीं होतांही फळ मोठें ॥

" रिक्तः सर्वो भवति हि लघुः पूर्णता गौरवाय ॥ "

ज्याच्याजवळ कांहीं नाहीं तो लघु होतो ( त्याला कमीपणा येतो ); पण जो पूर्ण आहे, ज्याच्याजवळ पुष्कळ आहे त्याला मोठेपणा मिळतो. ( जोंवरि पैसा तोंवरि बैसा, ही मराठी ओळ प्रसिद्धच आहे. )

" मंदायंते न खलु सुहृदामभ्युपेतार्थकृत्याः ॥ "

भाषांतर—कधीं न गणिती सज्जन करतां मित्रकार्य आयास ॥

वरील भाषांतराच्या ओळी कृष्णशास्त्री यांच्या मेघदूताच्या भाषांतरांतून घेतलेल्या आहेत हें मराठी रसिकांना सांगावयास नकोच.

शाकुंतलांतील कांहीं सुभाषितें पहा—

" अथवा भवितव्यानां द्वाराणि भवंति सर्वत्र "

नशीब कोठें फळाला येईल त्याचा कांहीं नियम सांगतां येत नाहीं. भवितव्याचीं दारें सर्व ठिकाणीं आहेत.

सतां हि संदेहपदेषु वस्तुषु
प्रमाणमंतःकरणप्रवृत्तयः ॥

जेव्हां एखाद्या गोष्टीबद्दल संशय असतो तेव्हां चांगलीं माणसें आपल्या अंतःकरणाची त्या गोष्टीबद्दलची भावना प्रमाणभूत मानतात.

**न प्रभातरलं ज्योतिरुदेति वसुधातलात्।**

आपल्या प्रकाशानें लखलखणारें तेज जमिनींतून उत्पन्न होत नाहीं. (तें आकाशांतच उत्पन्न होत असतें.)

**स्रजमपि शिरस्यंधः क्षिप्तां धुनोत्यहिशंकया।**

आंधळ्याच्या डोक्यावर माळ टाकली तरी तो साप आहे अशी शंका घेऊन ती फेकून देतो. आतां कांहीं सुभाषितें कुमारसंभवांतून घेऊं—

**क्षुद्रेपि नूनं शरणं प्रपन्ने**
**ममत्वमुच्चैःशिरसां सतीव ॥**

आपल्याला शरण आलेला माणूस क्षुद्र जरी असला तरी मोठीं माणसें शरण आलेल्या सज्जनाबद्दल जसा आपलेपणा मानतात तसाच त्या क्षुद्राबद्दलही मानतात.

**अभ्यर्थनाभंगभयेन साधु–**
**र्माध्यस्थमिष्टेप्यवलंबतेऽर्थे ॥**

याचा अर्थ पूर्वी दिलेला आहे.

**प्रायेण सामग्र्यविधौ गुणानां**
**पराङ्मुखी विश्वसृजः प्रवृत्तिः ॥**

सगळे गुण एका ठिकाणीं उत्पन्न करण्याची ब्रह्मदेवाची साधारणपणें प्रवृत्ति नाहीं.

**न हीश्वरव्याहृतयः कदाचित्**
**पुष्णंति लोके विपरीतमर्थम् ॥**

महापुरुषांचें जें बोलणें असतें (तें स्पष्ट व निश्चितार्थ असल्यामुळें) त्याचा लोकांत भलता अर्थ होऊं शकत नाहीं.

**प्रमदाः पतिवर्त्मगा इति**
**प्रतिपन्नं हि विचेतनैरपि ॥**

याचाही अर्थ पूर्वी येऊन गेलेला आहे.

आतां आपण रघुवंशांतील तीन चार सुभाषितें घेऊन मग दुसरीकडे वळूं.

**न पादपोन्मूलनशक्ति रंहः**
**शिलोच्चये मूर्च्छति मारुतस्य ॥**

हें वर आलेलें आहे.

**पथः श्रुतेर्दर्शयितार ईश्वरा**
**मलीमसामाददते न पद्धतिम् ॥**

श्रुतिविहित मार्ग दाखविणारीं थोर माणसें आपण स्वतः भलत्या (अधर्म्य) मार्गांचा आश्रय करीत नाहींत.

**पवनाग्निसमागमो ह्ययं। सहितं ब्रह्म यदस्त्रतेजसा ॥**
**प्रतिकारविधानमायुषः सति शेषे हि फलाय कल्पते ॥**
**अभितप्तमयोपिमार्दवं भजते कैव कथा शरीरिषु ॥**
**विषमप्यमृतं क्वचिद्भवेदमृतं वा विषमीश्वरेच्छया ॥**
**द्रुमसानुमतां किमंतरं यदि वायौ द्वितयेपि ते चलाः ॥**

या सर्वांचा अर्थ पूर्वी येऊन गेलेला आहे.

**तेजसां हि न वयः समीक्ष्यते ॥**

जे तेजस्वी आहेत त्यांच्या वयाचा प्रश्न नाहीं; इत्यादि.

**१२.** रस, अर्थ आणि अलंकार यांच्यासंबंधीं आपण कालिदासाच्या काव्याचें थोडेंबहुत निरीक्षण केलें. आतां त्याच्या काव्यवस्तूचा म्हणजे कथानकाचा थोडक्यांत विचार करूं. शाकुंतल नाटकांतील वस्तूविषयीं पूर्वी बराच मजकूर आलेला आहे व त्या नाटकाची माहिती बहुतेक सर्वांना आहे. मालविकाग्निमित्र नाटकांत मालविका नांवाच्या राजकन्येवर अग्निमित्र राजाचें प्रेम बसतें व शेवटीं तो आपल्या राणीच्या संमतीनें तिच्याशीं विवाह करतो असें कथानक असून हें नाटक थोडासा विनोद आणि फार उंच न जाणारी भावना यांचा उपयोग करून लिहिलेलें दिसतें. राजाला राणी आहे इतकेंच नव्हे तर लढाईवर पाठविण्याएवढा मोठा मुलगा पण आहे. राजाच्या दोन राण्या या नाटकांत येतात; आणखीही असतील; आणि शेवटीं मालविकाही राणी होते. नाटकाच्या शेवटीं ती राजकन्या आहे असें स्पष्ट होतें. नाटकाचें कथानक थोडक्यांत पुढीलप्रमाणें आहे :—

राजा अग्निमित्रानें एके दिवशीं चित्रगृहांत आपली राणी धारिणी हिचें चित्र असलेल्या एका तसबिरींत तिच्याजवळच बसलेल्या एका मुलीचें चित्र पाहिलें व त्या चित्रगत सौंदर्यावरच तो इतका खूष झाला कीं त्या मुलीला प्रत्यक्ष पाहण्याचा

योग कसा येईल याबद्दल तो विचार करूं लागला. ही मुलगी धारिणीच्या नौकरमंडळींत असून तिचें नांव मालविका आहे एवढें त्याला समजलें. गणदास नांवाच्या नाट्यकलेच्या शिक्षकाजवळ नृत्यगायनाचा वगैरे अभ्यास करण्यासाठीं मालविका धारिणीच्या अनुमतीनें असे. दुसरा एक हरदत्त नांवाचा नाट्यकलेचा शिक्षक होता. गणदास हा राणी धारिणीच्या मर्जीतला आणि हरदत्त हा राजाच्या मर्जीतला. एके दिवशीं या दोघांची बोलाचाली होऊन एकमेकांनीं परस्परांचें उणेंदुणें काढलें. तेव्हां त्यांच्या भांडणाचा फायदा घेऊन राजाचा मित्र विदूषक यानें गणदासानें आपला नाट्यप्रयोग, राजा, राणी आणि तिची मैत्रीण कौशिकी नांवाची परिव्राजिका यांजपुढें दाखवावा व हरदत्तानेंही तसेंच करावें आणि परिव्राजिकेनें परीक्षक होऊन दोघांत सरस पंडित कोण याचा निर्णय द्यावा असें ठरवून या सर्व योजनेला राजाची व राणीची संमति मिळविली. अर्थात् गणदासाचा प्रयोग म्हणजे त्यांत मालविकेचें काम होणारच म्हणजे या योजनेनें राजाला मालविका पहावयास मिळणार. धारिणीची इच्छा राजाच्या दृष्टीला मालविका पडूं नये अशी होती, पण गणदासानें फार आग्रह केल्यामुळें तिनें या योजनेला मान्यता दिली. अशा प्रकारें मालविका राजाच्या प्रत्यक्ष दृष्टीला पडली व तो तिच्याबद्दल अत्यंत आतुर झाला. राजाची दृष्टि मालविकेवर आहे हें पाहून धारिणी साशंक झाली. पुढें अशोकवृक्षाला धारिणी पदताडन करणार होती, पण तिचा पाय दुखावला म्हणून तिनें तें काम मालविकेकडे सोंपविलें; व जर मालविकेच्या पदताडनानें अशोकाला फुलें आलीं तर तिचा इच्छित हेतु जो असेल तो मी पुरवीन असें तिनें अभिवचन दिलें. या पदताडनप्रसंगीं राजा तेथें गेला व मालविकेबद्दल आपलें प्रेम त्यानें व्यक्त केलें. याप्रमाणें त्यांचा प्रणयप्रसंग चालला असतां राजाची दुसरी राणी इरावती तेथें आली व तिनें सर्व प्रकार पाहिला. राजाची अर्थात् मोठी त्रेधा उडाली. यानंतर मालविकेला सक्त बंदोबस्तांत ठेवण्यांत आलें आणि राणी धारिणीची मत्स्यचिन्हांकित अंगठी दाखविल्याशिवाय तिची सुटका करावयाची नाहीं असा हुकूम सुटला. यावरही विदूषकानें तोड काढली. एक दिवस आपल्याला साप चावला असा ओरडा करून त्यानें वैद्याला बोलावलें व कांहीं तरी मत्स्यचिन्हांकित वस्तूच्या साहाय्याशिवाय सापाचें विष उतरणार नाहीं असें वैद्यानें सांगितलें. तेव्हां राणी धारिणीनें आपली अंगठी लागलीच या कटांत विदूषकाला सामील असलेल्या दासीजवळ दिली व तिच्या साहाय्यानें मालविकेची सुटका झाली व तिची व राजाची पुनः गांठ पडून त्यांचा प्रणय सुरू

झाला. तेथें पहारा करीत बसलेला विदूषक झोंपीं गेला. इतक्यांत पुन: राणी इरावती आपल्या दासीसह तेथें आली. दासीनें गंमत करावी म्हणून एक लाकूड विदूषकाच्या अंगांवर टाकलें. तेव्हां झोंपेंतच विदूषक घाबरला आणि आरडूं लागला. तेथें राजा आला व याप्रमाणें राजाला मालविकेसह इरावतीनें पुनः पकडलें. पण पुढें धारिणीचा मुलगा लढाईवर गेला होता तो विजयी होऊन परत आला असें वर्तमान आलें. मालविकेनें ताडन केलेल्या अशोकालाही फुलें फुटलीं. आणि मालविका ही राजकन्या आहे असेंही समजलें. मग धारिणीनें आपण होऊन इरावतीची समजूत घातली आणि मालविका राजाला अर्पण केली आणि अशा प्रकारें राजवाड्यांत सर्वत्र आनंदीआनंद झाला. इंग्रजींत ज्याला Light Comedy म्हणजे जवळजवळ प्रहसन म्हणतात तशा तऱ्हेची ही कथा आहे व त्यांत हास्य रसाचा उत्कर्ष बऱ्याच ठिकाणी होईल असे प्रसंग आणून कवीनें नाटक मनोरंजक केलेलें आहे. नाटकाच्या प्रस्तावनेवरून कालिदासानें रचलेलें हें पहिलें नाटक होतें असें दिसतें.

विक्रमोर्वशीय नाटकाचें कथानक यापेक्षां थोडें चमत्कृतिप्रधान आहे. मालविकाग्निमित्र नाटकाच्या कथानकाला सामाजिक म्हणण्यास हरकत नाहीं. राजाच्या प्रणयसंबंधीं खटपटी व लटपटी पाहून त्याची राणी म्हणते सुद्धां—"येवढा प्रयत्न जर राजकारणांत होईल तर राजाला केवढें तरी यश मिळेल." तसेंच, जरी शेवटीं महाराणी धारिणी आपण होऊन मालविका राजाला अर्पण करिते तरी तिला किंवा राणी इरावतीला राजाच्या वागण्याचा पुष्कळ राग येतो व इरावती तर राजाला चांगले टोमणे लगावीत असते. त्यामुळें हें नाटक माणसांचें, यांत स्वर्गीय कांहीं नाहीं हें स्पष्ट होतें आणि म्हणून जरी तें विनोदप्रचुर आहे व विशेष भावनाप्रधान नाहीं तरी चालत्या बोलत्या समाजाचें त्यांत अधिक चांगलें प्रतिबिंब पडलेलें आहे असें आपल्याला दिसून येतें. शाकुंतल नाटकांत सुरवातीपासूनच वातावरण निराळें आहे आणि ऋषींच्या आश्रमभूमीपासून तों इंद्राच्या आणि अप्सरांच्या स्वर्गभूमीपर्यंत आपण निरनिराळ्या गोष्टी पाहत असतों. विक्रमोर्वशीय नाटकांतही वातावरण "वरचें" आहे. स्वर्गलोकांतील प्रख्यात अप्सरा ऊर्वशी आपल्या मैत्रिणीसहित भगवान् महादेवाचें पूजन करीत असतां तिला राक्षस पकडतात व त्या प्रसंगीं राजा पुरूरवा तिला येऊन सोडवतो व दोघांचें एकमेकांवर तत्काळ प्रेम जडतें अशी या कथेची सुरवात आहे. चित्र-

रथ गंधर्व येऊन ऊर्वशीला सोडविल्याबद्दल राजाची प्रशंसा करतो व तिला तो गंधर्वलोकीं घेऊन जातो व राजा आपल्या नगराला परततो. राजाची अर्थात् राणी आहेच व तिच्याबद्दल त्याला अत्यंत आदर व प्रेम आहे. पुढें ऊर्वशी राजा बसला आहे तेथें गुप्तरूपानें येते व एका भूर्जपत्रावर प्रणयलेख लिहून तो त्याच्याकडे फेंकते. राजाचा मित्र विदूषक याही नाटकांत आहेच. तो चुकीनें ऊर्वशीचें नांव राणीच्या विश्वासू दासीला सांगतो आणि भूर्जपत्रही कोठें तरी टाकून देतो. तेंही राणीला सांपडतें व राजाराणींत थोडासा प्रणयकलह होतो. ऊर्वशीची व राजाची गांठ पडते, पण तिला तांतडीनें स्वर्गलोकीं एका नाटकांत काम करण्यासाठीं जावें लागतें. पुरूरव्याचें ध्यान लागल्यामुळें नाटकांत तिच्या हातून बोलण्याच्या चुका होतात; त्यामुळें नाटकाचे संचालक भरतमुनि तिला शाप देतात व तूं स्वर्गांतून नष्ट होशील म्हणून तिला सांगतात. पण इंद्र तिच्यावर दया करतो व "पृथ्वीलोकावर जाऊन तुझा व पुरूरव्याचा समागम होईल व त्याला पुत्रदर्शन होईपर्यंत तूं तिकडे राहशील" म्हणून तिला उश्शाप देतो. याप्रमाणें तिची व पुरूरव्याची पुनः गांठ पडते. या गांठींतही राणी तिला भेटण्याचा म्हणजे दृष्टीला पडण्याचा प्रसंग येतो व राणी प्रियप्रसादन म्हणून व्रत करून "जी स्त्री तुला पाहिजे असेल तिच्याशीं तुझा समागम होवो" असें राजास सांगते. याप्रमाणें राजा व ऊर्वशी एकत्र येऊन गंधमादन पर्वतावर आनंद उपभोगण्यास जातात. तेथें त्यांच्यांत थोडासा प्रेमकलह होऊन ती रागावते व जेथें स्त्रियांना जाण्याची पूर्ण बंदी आहे अशा कुमारवनांत चुकून जाते व लागलीच लता होऊन पडते. राजा तिला हुडकतो व भ्रमिष्ट होऊन धावाधाव करतो. त्याच्या उन्मादावस्थेचें व विरहदुःखाचें मोठें सुंदर वर्णन चौथ्या अंकांत आहे. पुढें सुदैवानें संगमनीय मणि त्याला सांपडून त्याचा स्पर्श होतांच ऊर्वशी लतास्वरूप सोडून आपल्या पहिल्या स्वरूपाला धारण करते. याप्रमाणें त्यांचा पुनः समागम होतो. पुढें ऊर्वशी एकाएकीं नाहींशी होऊन कांहीं दिवसांनीं राजापासून झालेल्या मुलाला त्याच्याकडे पाठविते. शेवटीं इंद्राच्या अनुमतीनें तीही तेथें येते. ती येते ती मुलाला पाहण्यासाठीं म्हणून. पण पुढें नारदमुनि इंद्राकडून निरोप घेऊन येतात कीं ऊर्वशीनें पुरूरव्याजवळ कायम रहावें. आणि अशा प्रकारें नाटकाचा शेवट स्वर्गलोक व भूलोक यांच्या मीलनानें आनंदमय होतो. या नाटकांत विनोद अगदीं बेताचा आहे व भावनाविष्कार फार मोठ्या प्रमाणांत आहे व कथानकांतही बरीच चमत्कृति आहे.

मेघदूताचें कथानक अगदीं साधें आहे—त्याला कथानक असें म्हणण्याचेंही कारण नाहीं. यक्षाला शाप झाल्यामुळें एक वर्षपर्यंत त्याला पत्नीवियोग घडला आणि त्या अवधींत त्यानें रामगिरीवर वसति केली. तेथें आषाढ महिन्याच्या सुरवातीला पर्वतशिखरावर मेघाला पाहून तो पत्नीसमागमाबद्दल अत्यंत आतुर झाला व त्यानें मेघाला आपला संदेश घेऊन तो आपल्या पत्नीला पोंचविण्याचें काम सांगितलें. रामगिरीवरून कुबेरनरीला जाण्याचा रस्ता कित्येक शहरांचा उल्लेख करून यक्षानें प्रथम सांगितला आणि नंतर आपला संदेश सांगितला व अनुषंगानें त्या कुबेरनगरीच्या वैभवाचें, आपल्या पत्नीच्या विरहावस्थेचें इत्यादि वर्णन त्यानें केलें व तें सर्व अत्यंत सरस उतरलेलें आहे. कसल्याही कथानकाचा आश्रय न घेतां सृष्टिवर्णन आणि भावनेचें आविष्करण यांवर हें खंडकाव्य उभारलेलें आहे व तरुण, कामी व प्रणयी पुरुषाच्या त्याचप्रमाणें स्त्रीच्या अंतःकरणवृत्तीचें त्यांत फार मार्मिकपणानें वर्णन केलेलें आहे. शब्दरचना, अर्थगांभीर्य, रसपरिपोष इत्यादि सर्व गुणांनीं मेघदूत फार हृदयंगम आहे हें नव्यानें सांगावयास नको; कारण आज कित्येक शतकें मेघदूताचें गौरव पंडित करीत आले आहेत. मेघदूताचें अनुकरण पुष्कळांनीं केलें आहे पण इंद्रधनुष्याच्या रंगांची सजावट करण्याचे प्रयत्न जसे निष्फल होतात तसाच त्यांचाही या बाबतींत प्रकार झालेला दिसतो. रघुवंश आणि कुमार-संभव यांच्यांतील विषयांचा उल्लेख पूर्वी झालेलाच आहे, तेव्हां त्यांचा पुनरुच्चार करण्याचें कारण नाहीं. उत्तम कथावस्तु घेण्याबद्दल कालिदास फार काळजी घेत असे; पण कथावस्तूची अपेक्षा न करतां उत्कृष्ट काव्याची निर्मिति तो करूं शकतो हें मेघदूतावरून सिद्ध होतेंच आणि वस्तु हें तरी महाकवीचें साधन आहे; काव्य हेंच त्याचें साध्य होय.

याप्रमाणें निरनिराळ्या दृष्टींनीं आपण कालिदासाच्या काव्यगंगेंत डुंबण्याचा प्रयत्न केला आणि तसें कितीही वेळां केलें तरी त्याचा कोणास कंटाळा येणार नाहीं. कालिदासाचें काव्य म्हणजे अमृततुल्य मधुर आहे, पुष्टिदायक आहे, अमर करणारें आहे. रघुवंशाच्या बहुतेक प्रत्येक सर्गांत एक एक तरी उदात्त प्रसंग आणून वाचकाची वृत्ति केवळ भौतिक भूमिकेपासून उच्च वातावरणांत वळविण्याचें कार्य कवीनें फारच बहारीनें साधलें आहे. आपणांला न कळत आपलें अंतःकरण ते ते प्रसंग वाचीत असतांना हेलावतें, उन्नत होतें, आनंदित होतें. कुमारसंभवांतील पार्वतीची आणि शंकराची आश्चर्यकारक कथा वाचून आपण

विस्मित होतों आणि हिमालयाच्या तुंग शिखरावरील उन्नतत्त्वाचा अनुभव घेतों. मेघदूताच्या ओळी गोड लकेऱ्यांप्रमाणें आपल्या अंतःकरणांत गुणगुण करीत राहतात. मालविका आणि ऊर्वशी यांच्या प्रणयकथा आपण हंसत हंसत व कधीं कधीं विस्मित होऊन वाचतों. पण कालिदासाच्या नाट्यरचनेंत शाकुंतलाची शोभा कांहीं विलक्षण आहे आणि आग्र्याचा ताजमहाल पाहिल्यावर उत्तर हिंदुस्थानांतील लखनौ व दिल्ली येथीलही इमारती आपण विसरतों तोच प्रकार शाकुंतल वाचल्यावर कालिदासाच्याच इतर दोन नाटकांच्या बाबतींत होतो. हें सर्व वाचतां वाचतां कालिदासानें काढलेलीं स्त्री-पुरुषांचीं, बालवृद्धांचीं, ब्राह्मण-क्षत्रियांचीं चित्रें आपल्या दृष्टीपुढून सरकतात आणि त्यांच्या मागें व्यंजनेनें लपलेली ध्येयात्मकता अंतःकरणाला पटून आपणांस उत्साह वाटतो. आर्यसंस्कृतीचें भव्य स्वरूप त्याच्या काव्यांतून आपणाला दृग्गोचर होतें आणि त्या स्वरूपाचें ध्यान करतां करतां आपली वृत्ति निराशेला झुगारून देऊन औत्सुक्यवती होते. जेथें अशीं माणसें झालीं कीं ज्यांचें वर्णन करतांना महाकवीच्या रसवंतीला रंग चढला तेथें कितीही कालगति प्रतिकूल झालेली असली आणि औदासिन्याचें धुकें पसरलेलें असलें तरी ती पूर्वकालांत स्वर्गाला धरेवर आणण्याची शक्ति, धरेबद्दल स्वर्गाला असूया वाटावयास लावण्याची शक्ति, या भूमींत सुप्त आहे ती जागृत करतां येईल असें वाटतें, आणि या कवीनें भरतवाक्यनिमित्तानें दिलेला आशीर्वाद अद्यापिही खरा होईल अशी आशा वाटते.

सर्वस्तरतु दुर्गाणि सर्वो भद्राणि पश्यतु ।
सर्वः कामानवाप्नोतु सर्वः सर्वत्र नंदतु ॥

सर्वजण संकटांत तरून जावोत आणि त्यांचें कल्याण होवो. प्रत्येकाची इच्छा पूर्ण होवो आणि प्रत्येकाला सर्वत्र आनंदीआनंद होवो. आणि असें होण्याला कालिदासाच्या ध्येयात्मक शक्तीनें काढलेलें आर्यसंस्कृतीचें स्वरूप आपण नित्य लक्षांत ठेविलें पाहिजे. त्या विषयाचा थोडा ऊहापोह करून आपण या ग्रंथाच्या समाप्तिमर्यादेजवळ जाऊं.

# भाग आठवा

## आर्यांची संस्कृति

बलमार्तभयोपशांतये
विदुषां सत्कृतये बहुश्रुतम्।
वसु तस्य विभोर्न केवलं
गुणमत्तापि परप्रयोजना ॥ रघु० ८ – ३१ ॥

आतांपर्यंत या ग्रंथांत कालिदासानें वर्णन केलेल्या व्यक्तींचें आणि प्रसंगांचें जें विवेचन आलें त्यावरून आर्यांच्या संस्कृतीसंबंधीं या महाकवीच्या कांहीं निश्चित कल्पना होत्या हें स्पष्ट दिसतें. यांतील पहिली अतिशय महत्त्वाची गोष्ट परस्पर-पूरकतेशिवाय समाज उत्तम प्रकारें चालणार नाहीं ही होय. जातिभेदाच्या सध्यांच्या आणि आज कित्येक शतकें नांदत आलेल्या दुष्ट स्वरूपामुळें ऐक्याची भावना या समाजांत कधींही नव्हती असें वाटावयास लागतें; पण या कालिदास-वाङ्मयांत वर्णाश्रमधर्माचें जें वर्णन आहे त्यावरून कोणत्या तरी एका काळीं हा धर्म विघटनात्मक नसून संघटनात्मक होता हें लक्षांत आल्यावांचून रहात नाहीं. त्या संघटनात्मक धारणेला आधुनिक जातिभेदाचें स्वरूप कोणत्या कारणामुळें आलें, कोणत्या परिस्थितीमुळें, कोणत्या बाह्य संकटांमुळें आणि अंतर्गत दुर्गुणां-मुळें आलें याचें संशोधन होणें अत्यंत आवश्यक आहे, आणि इतिहासाचीं साधनें जसजशीं अधिकाधिक बाहेर पडत आहेत, तसतसें हें संशोधन करणें अधिका-धिक शक्य होत आहे. पण त्या संशोधनांत पडण्याचा या ग्रंथाचा हेतु नाहीं आणि त्याचा तो विषयही नाहीं. विघटनेला सुरवात झाल्याचा एखाद दुसरा उल्लेख कालिदासीय वाङ्मयांत मिळतो; पण संघटनात्मकता, परस्परपूरकता हेंच कालिदासानें वर्णिलेल्या, कल्पिलेल्या म्हणा पाहिजे तर, आर्यसंस्कृतीचें एक महत्त्वाचें लक्षण आहे.

पवनाग्निसमागमो ह्ययं
सहितं ब्रह्म यदस्त्रतेजसा ॥

या वर्णनांत हें लक्षण परिस्फुटित झालेलें आहे. सामाजिक व्यवहारांत निरनिराळीं कामें निरनिराळ्या माणसांना करावीं लागतात; असें जें एखाद्याला करावें लागतें तें काम, तो उद्योग, तें कर्तव्य, तो प्रयत्न, हा त्याचा धर्म. या धर्माचें प्रतिपालन धारणेसाठीं म्हणजे समाज एकत्रित रहावा, त्याचा विध्वंस होऊं नये, त्याच्या सुदृढतेला बाधा येऊं नये यासाठीं केलें पाहिजे. या धारणेला किंवा धृतीला आर्य संस्कृतींत फार महत्त्व होतें ही गोष्ट, तें महत्त्व जरी आज आपण मानीत नसलों, तरी विसरून चालणार नाहीं. भगवद्गीतेंतील तेराव्या अध्यायांतील श्लोक ५ व ६ यांत क्षेत्राचें म्हणजे शरीराचें वर्णन आलें आहे. त्यांत क्षेत्राच्या ठिकाणीं धृति हा एक गुण असतो म्हणून सांगितलेलें आहे. समाज अनेक पुरुषांचा म्हणजे व्यक्तींचा झालेला विराटपुरुष आहे व क्षेत्राच्या ठिकाणचीं सर्व तत्त्वें या विराट क्षेत्रांतही असणार हें उघड आहे. या धृति शब्दावर ज्ञानेश्वरांनीं पुढील व्याख्या केलेली आहे. ज्ञानेश्वरीच्या तेराव्या अध्यायांतून पुढील ओंव्या घेतल्या आहेत.

तरी तत्वां परस्परें । उघड जातिस्वभाववैरें ।
नव्हे पृथ्वीतें नीरें । निनाशिजे ॥ १४३ ॥

नीरातें आटी तेज । तेजा वायूसी झुंज ।
आणि गगन तंव सहज । वायु भक्षी ॥ १४४ ॥

तेवींचि कोणेही वेळे । आपण कायिसयाही न मिळे ।
आंत रिघोनि वेगळें । आकाश हें ॥ १४५ ॥

ऐसीं हीं पांचही भूतें । न साहती एकमेकांतें ।
कीं तियेंही ऐक्यातें । देहासि येती ॥ १४६ ॥

द्वंद्वाची उखविखी । सोडूनि वसती एकीं ।
एक एकातें पोखी । निजगुणें गा ॥ १४७ ॥

ऐसें न मिळे तया साजणें । चाले धैर्यें जेणें ।
तया नांव म्हणे । धृति मी गा ॥ १४८ ॥

ज्यांचें एकमेकांशीं पटत नाहीं, ज्यांच्यांत वास्तविक स्वभावविरोध आहे, अशीं पंचमहाभूतें "द्वंद्वाची उखविखी सोडूनी" एका ठिकाणीं राहतात आणि परस्परांचें पोषण करतात आणि या परस्परपोषणाच्या सामर्थ्यामुळें त्यांचा पर-

स्परविरोध हा गौण ठरतो आणि त्यांच्यांत निर्मितिशक्ति उत्पन्न होऊन हें क्षेत्र, हा देह, हें शरीर, सिद्ध होतें. तोच न्याय समाजाला लागू पडतो.

**पवनाग्निसमागमो ह्ययं ।**

या ओळींत तरी हाच सुंदर अर्थ सामावलेला आहे. व्यक्ति तितक्या प्रकृति; व्यक्ति तितके हितसंबंध; आणि हितसंबंध निरनिराळे झाले कीं विरोधाची धाड आली: पण या विरोधाला गौणता देऊन समाजांतील या लक्षावधि व्यक्ति जेव्हां "द्वंद्वाची उखविखी" सोडून "वसती एकीं" आणि "एकएकातें पोखी" अशी स्थिति निर्माण होते तेव्हांच समाजाची धारणा होते. म्हणून व्यक्तीचीं सामाजिक कर्तव्यें, व्यक्तीचा धर्म, हा धारणात्मक म्हणजे संघटनात्मक असावा लागतो. सीतेला रामानें टाकली व त्या मानिनी पतिव्रतेनें त्याला कठोर संदेश पाठविला पण त्यांतही "माझ्या ठिकाणीं तुझें असलेलें तेज" बाहेर येऊन तें आपल्या पायावर उभें राहीपर्यंत मी प्राणत्याग करून तुझ्या कुळक्षयाचें पातक करणार नाहीं, हें स्पष्ट केलें. कारण व्यक्तींमधील विरोध कितीही तीव्र असला तरी त्यामुळें संहति, कुटुंब किंवा समाज किंवा राष्ट्र, यांस धक्का लागतां उपयोगी नाहीं हें आर्यसंस्कृतीचें मोठें तत्त्व आहे.

हें धृतीचें तत्व समाजाच्या निरनिराळ्या घटकांत, वर्गांत, व्यक्तींत व व्यवसायांत जसें असलें पाहिजे तसें राजा व प्रजा यांत असलें पाहिजे; म्हणजे त्यांमधील संबंध न्यायावर, सरळपणावर, परस्परांबद्दल सहानुभूतीवर आणि आदरावर आधारले पाहिजेत. राजा अन्यायी आणि अविचारी झाला कीं या संघटनात्मक तत्त्वाला बाधा झाल्याशिवाय राहणार नाहीं; म्हणून दुर्बलांचें रक्षण, सज्जनांचें रक्षण इत्यादि गोष्टींबद्दल राजाला जागरूक रहावें लागे. म्हणूनच त्याचें वर्णन करतांना

**आर्तत्राणाय वः शस्त्रं न प्रहर्तुमनागसि ।।**

किंवा

**आपन्नाभयसत्रेषु दीक्षिताः खलु पौरवाः ।।**

असे उद्गार कवि काढतो. तसेंच राजांना षष्ठांशवृत्ति असें नांव दिलें आहे. प्रजेच्या उत्पन्नापैकीं सहावा भाग राजानें घ्यावयाचा व त्याचा मोबदला म्हणून प्रजांचें

भरण, रक्षण वगैरे सर्व कल्याण त्यानें पहावयाचें असा दंडक होता. ऋषि, मुनि, तपस्वी हे द्रव्यार्जन करीतच नसत, तेव्हां त्यांच्याकडून कशाचा सहावा भाग राजानें घ्यावयाचा? तर त्यांनीं संपादन केलेल्या पुण्याईचा. दिलीप राजानें वशिष्ठाला पुत्रप्राप्तीचा उपाय विचारला त्या वेळीं सांगितलें,

पुरुषायुषजीविन्यो निरातंका निरीतयः।
यन्मदीयाः प्रजास्तस्य हेतुस्त्वे ब्रह्मवर्चसम् ॥ रघु. १–६

माझे प्रजाजन शंभर वर्षे जगतात; त्यांना कसलेंही भय वाटत नाहीं; त्यांना अतिवृष्टीसारख्या दैवी आपत्तींचा धाक नाहीं; या सर्वांला कारण तुझें ब्रह्मवर्चस्व, तुझी व्रताध्ययनसंपत्ति हें आहे. तेव्हां याप्रमाणें व्रताध्ययन आणि शक्तिपराक्रम यांच्या परस्परानुकूल संयोगानें समाजाला स्थैर्य येतें आणि प्रगमनशीलताही येते. तेव्हां अशी संघटनात्मकता, परस्परपूरकता, ऐक्य, धृति, धारणा, ही गोष्ट आर्यसंस्कृतीच्या पुरोभागीं घातली पाहिजे असें आम्हांस वाटतें.

या गुणाशिवाय समाज जिवंतच राहूं शकत नाहीं. अलीकडे कित्येक शतकें या अतिशय आवश्यक तत्त्वाचा आपणांला विसर पडलेला आहे व त्यामुळें आपल्या बऱ्याचशा सामाजिक प्रवृत्ति, आचारविचार, चालीरीति हीं विघटनात्मक होऊन राहिलेलीं आहेत व त्यांतून द्वेष व परस्परांसंबंधीं अविश्वास उत्पन्न होत असतो. विघटनात्मक म्हणजे तुटकपणाच्या वृत्तीचें प्राबल्य आपल्यांत इतकें झालेलें आहे कीं तिचा अंमल आपल्या सामाजिक संबंधावरच नव्हे तर कौटुंबिक संबंधांवरही चालतो. हे दुष्परिणाम टाळण्यासाठीं आपल्या वागण्यांत स्वार्थापेक्षां न्यायबुद्धि अधिक असली पाहिजे, म्हणजे दुसऱ्यासंबंधीं अन्याय न करण्याबद्दल आपण विशेष दक्षता ठेविली पाहिजे. जेथें अन्याय घडतो त्या ठिकाणीं लागलीच डोकें फिरवून न घेतां प्रथम खेळीमेळीनें, सामोपचारानें त्याचें निराकरण करण्याची तयारी पाहिजे. पण जेथें तसें निराकरण होणें शक्य नसेल, शक्य नाहीं असें अनुभवानें कळून चुकेल, तेथें आपला प्रभाव दाखवून त्या अन्यायाचें परिमार्जन करून घेतलें पाहिजे. पण त्यापूर्वी होतां होईतों तंट्याचीं, तुटकपणाचीं कारणें जितकीं कमी करतां येतील तितकीं कमी केलीं पाहिजेत. रघुवंश, शाकुंतल, कुमारसंभव इत्यादिकांत क्षत्रिय आणि ब्राह्मण परस्परांशीं कसे वागतात हें पाहून आज काल आपणांला विस्मय वाटतो. विस्मयाबरोबर आपणांला; सध्यां ज्या

तऱ्हेनें आपण वागतों त्याबद्दल लाजही वाटली पाहिजे. समाज हा प्रत्येकाचा; प्रत्येक हा समाजाचा; प्रत्येकानें समाजाची सोय पाहिली पाहिजे आणि समाजानें प्रत्येकाची सोय पाहिली पाहिजे आणि भगवद्गीतेंत सांगितल्याप्रमाणें,

> परस्परं भावयंतः श्रेयःपरमवाप्स्यथ । ३–११
> "तुम्ही देवातें भजाल । देव तुम्हां तुष्टतील ।
> ऐसी परस्परें घडेल । प्रीति जेथ ॥ ज्ञानेश्वरी ॥ ३–९७
> तेथ तुम्ही जें करूं म्हणाल । तें आपैसें सिद्धी जाईल ।
> वांछितही पुरेल । मानसीचें ॥ ३–९८

जेथें देव आणि माणसें यांच्यांत परस्परावलंबित्व याप्रमाणें आवश्यक म्हणून सांगितलें होतें तेथें तें माणसामाणसांत सांगितलें होतें यांत शंकाच नाहीं. कालिदास या देवांच्या आणि मनुष्यांच्या एकीचें वर्णन मोठें चातुर्यानें करतो:—

> दुदोह गां स यज्ञाय सस्याय मघवा दिवम् ।
> संपद्विनिमयेनोभौ दधतुर्भुवनद्वयम् ॥ रघु. १–२६

तो ( राजा दिलीप ) प्रजेपासून यज्ञ करण्यासाठीं कर घेई आणि यज्ञांमुळें देवांची उपजीविका होई; उलट, इंद्र ( देवांचा राजा ) स्वर्गलोकापासून पर्जन्य घेऊन तो पृथ्वीलोकाला देई; आणि त्यामुळें पृथ्वीवरील माणसांची उपजीविका होई. अशा प्रकारें हे दोघे एकमेकांच्या संपत्तीची अदलाबदल करून दोन्ही लोकांचें ( स्वर्गाचें व पृथ्वीचें ) पालनपोषण करीत. जो प्रकार देवामाणसांत तोच माणसामाणसांत हें तत्त्व लक्षांत ठेवून परस्परानुकूलत्व, संघटनात्मक तत्व, हें त्या वेळीं अत्यंत महत्त्वाचें समजत असत.

२. पराक्रमशीलता हें आर्यसंस्कृतीचें दुसरें महत्त्वाचें तत्त्व होतें. त्यांतच अर्थात् निर्भयतेचा अंतर्भाव होतो. प्रो. गोळे यांनीं आपल्या "हिंदुधर्म आणि सुधारणा" या सुंदर भाषेंत लिहिलेल्या व विपर्यस्त आणि सप्रमाद विधानांनीं ओत-प्रोत भरलेल्या ग्रंथांत अल्पसंतोष, थंडेपणा, पराक्रमाविषयीं उदासीनता इत्यादि गोष्टी या हिंदुधर्मांत महत्त्वाच्या गणतात म्हणून सांगितलें आहे. प्रो. गोळे यांचा हिंदुधर्म आणि कालिदासाची आर्यसंस्कृति यांच्यांत अत्यंत विभिन्नता आहे. "यशसे विजिगीषूणां" हें आर्यसंस्कृतीच्या तत्त्वांनीं भरलेल्या आणि भारलेल्या शूर आर्यांचें

लक्षण होतें. कोणत्या ऐतिहासिक कारणामुळें आणि कोणत्या परिस्थितीच्या बाह्य प्रेरणेमुळें आमचा पराक्रम नाहींसा होऊन आम्ही थंडे झालों याचा विचार इतिहासज्ञ संशोधकांनीं करावा. पण कवि कालिदास ज्या संस्कृतीचें वर्णन करतो त्यांत या असल्या थंडेपणाला थारा नव्हता हें स्पष्ट आहे. सिंहाला पकडून त्याचे दांत मोजतां मोजतां खदखदा हंसणारा छोटा भरत, प्रत्यक्ष इंद्राशीं युद्धाचा प्रसंग आला असतांना बिलकुल न भीतां " गृहाण शस्त्रं यदि सर्ग एष ते " असें म्हणणारा रघु, परशुरामासारख्या कित्येक वेळां पृथ्वी निःक्षत्रिय करणाऱ्या प्रचंड योद्धयाशीं गांठ पडली असतांना

तद्धनुर्ग्रहणमेव राघवः
प्रत्यपद्यत समर्थमुत्तरम् ।

असें कृतीनें उत्तर देणारा रामचंद्र; दुष्यंत राजाच्या दरबारांत खुद्द त्या राजाला

मूर्च्छन्त्यमी विकाराः प्रायेणैश्वर्यमत्तेषु ।

म्हणून रोखठोक घोषणा करणारा शार्ङ्गरव; प्रत्यक्ष मदनाची राखरांगोळी करणाऱ्या शंकराला पति प्राप्त करून घेण्याच्या इच्छेनें

क्लमं ययौ कंदुकलीलयापि या
तया मुनीनां चरितं व्यगाह्यत ॥

जिला कंदुकक्रीडा खेळतांनाही श्रम होत, पण जिनें कठीण असें मुनिव्रत उत्कृष्टपणानें आचरणांत आणलें अशी पार्वती—हीं काय थंडपणाचीं, अल्पसंतोषाचीं, पराक्रमहीनतेचीं उदाहरणें आहेत ? पराक्रमशालित्व हें आर्यसंस्कृतीचें फार महत्त्वाचें तत्त्व होतें. शरीराचा सुदृढपणा आणि अंतःकरणाचा निर्भयपणा यांवर ही पराक्रमशीलता आधारलेली होती. उत्तम गुरूपासून युद्धज्ञानाची प्राप्ति आणि यशासाठीं यशाची आवड या गुणांमुळें ती पराक्रमशीलता सार्थ होत असे. शरीरांत शुद्ध आणि भरपूर रक्त खेळत असलें म्हणजे माणसाला पराक्रमाची इच्छा झालीच पाहिजे. ती जेथें होत नाहीं तेथें समाजरचनेंत, कुटुंबव्यवस्थेंत, धर्मसंबंधी समजुतींत, कर्मसंबंधीं तंत्रांत कांहींतरी विलक्षण दोष उत्पन्न झालेला आहे असें खास समजावें. जन्माला येऊन यश मिळविलें पाहिजे ही ऐहिक कल्पना आर्यसंस्कृतींत होती आणि तिचाच पुनरुच्चार रामदासांनीं शिवछत्रपतीच्या त्या संस्कृतीचें स्मारक होऊन राहिलेल्या पुण्यकाळांत

मरावें परी कीर्तिरूपें उरावें ।

या शब्दांनीं केला. शरीर हें केवळ मातीचें न होतां यशःशरीर व्हावें ही अत्यंत प्रभावी आकांक्षा या संस्कृतीच्या काळांत सर्वत्र वावरत होती; आणि वर सांगितल्याप्रमाणें या आकांक्षेला सिद्ध करण्यासाठीं सुदृढ शरीर आणि निर्भय अंतःकरण यांचें संपादन प्रत्येकाला करण्याची आवश्यकता वाटत होती. वरतीं शार्ङ्गरवाचें उदाहरण दिलें आणि बालसृष्टींत दुसरींही अनेक उदाहरणें दिलीं आहेत. कालिदासाची हीं पराक्रमशीलतेचीं वर्णनें सुदैवानें त्याच्या मागून कांहीं शतकांनीं झालेल्या महाकवि भवभूतीनेंही आपल्या नाटकांतून प्रकट केलीं आहेत.

दृष्टिस्तृणीकृतजगत्त्रयसत्त्वसारा
धीरोद्धता नमयतीव गतिर्धरित्रीम् ।

असें रामचंद्राच्या पुत्राचें वर्णन वाचून "अशीं मुलें केव्हां होतील तो सुदीन" असें वाटत नाहीं काय? शरीराच्या सुदृढपणावर व अंतःकरणाच्या निर्भयपणावर कालिदासाचा भर विशेष आहे.

शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम् ॥ कु. ५—३३

यावर व्याख्या करतांना मल्लीनाथ म्हणतो—

धर्मस्तु कायेन वाचा बुद्ध्या धनादिना च बहुभिः
साध्यते तेषु च वपुरेव मुख्यं साधनम् ।
सति देहे धर्मार्थकाममोक्षलक्षणाश्चतुर्वर्गाः साध्यंते ॥

म्हणजे, काया, वाणी, बुद्धि, द्रव्य इत्यादि पुष्कळ साधनांनीं धर्म (कर्तव्य) साधतां येतो. पण त्या सर्व साधनांत वपु म्हणजे शरीर हेंच मुख्य आहे. शरीर असेल तरच (म्हणजे सुदृढ असेल तरच) धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष हे चार पुरुषार्थ साधतां येतात. तेव्हां पुरुषार्थ साधणें हें आर्यसंस्कृतीचें एक मुख्य लक्षण होतें. याला म्हणजे शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम् या कालिदासोक्तीला मल्लीनाथानें श्रुतीचाही पुढील आधार दिलेला आहे :—

सततं आत्मानमेव गोपयीत ।

नेहमीं स्वतःचें संगोपन करावें, आपलें शरीर तयार ठेवावें; तेव्हां या तत्त्वाविरुद्ध ज्या ज्या प्रवृत्ति आजच्या हिंदुसमाजांत आहेत त्या आर्यसंस्कृतीला

मान्य नाहींत हें आपण लक्षांत ठेविलें पाहिजे. धर्म, अर्थ, काम, आणि मोक्ष हे चारी पुरुषार्थ साधणें ही आर्यसंस्कृतीची आज्ञा विसरून त्यांतला फक्त "मोक्ष" हा शब्द आपल्या कानांत घुसला आणि त्याचेही विपरीत अर्थ आपण लावीत बसलों. हे चारी पुरुषार्थ संपादन करण्याच्या दृढतर महत्त्वाकांक्षेमुळेंच काव्यांतील उदात्त प्रसंग सिद्ध होत असतात हें कोणाच्याही म्हणजे कोणाही रसिकाच्या, काव्यमर्मज्ञाच्या लक्षांत येण्यासारखें आहे. आणि यांच्या संपादनाला जसें शरीर सुदृढ तसें अंतःकरण निर्भय पाहिजे. निर्भयतेला, निधडेपणालाच शौर्य ही संज्ञा आहे. हा गुण प्रत्येक नागरिकांत असला पाहिजे असें सुप्रसिद्ध जर्मन राजनीतिज्ञ ब्लन्ट्श्ली याचें मत आहे. आर्यसंस्कृतीच्या धुरीणांचें हेंच मत होतें व कालिदासानें तें आपल्या वर्णनशैलीनें निरनिराळ्या प्रसंगीं विशद केलेलें आहे.

या चारी पुरुषार्थांची सिद्धि करणें, त्यांची प्राप्ति करून घेणें याची पराक्रमांत गणना होते. धर्म म्हणजे कर्तव्यपरिपालन; मग कसलेंही संकट आलें तरी कर्तव्यापासून च्युत होऊन चालत नाहीं. रघूच्या दुसऱ्या सर्गांतील दिलीप व नंदिनी या कथेचा उल्लेख पूर्वी केलेला आहे. त्यांत ही कर्तव्यतत्परतेची वृत्ति फार उत्कृष्टपणें चित्रित केलेली आहे. राजानें गाईचें रक्षण करण्याची हमी घेतली होती. त्यासाठीं स्वदेहार्पण—निष्क्रय करण्याला, म्हणजे आपल्या देहदानाची किंमत देण्याला तो तयार झाला. सिंह त्या गाईला खाणार होता त्यास राजा म्हणाला—"माझें शरीर भक्षण कर." गाईच्या क्षुल्लक जीवासाठीं एवढें घोर त्यागकर्म तूं कां करतोस म्हणून सिंहानें त्याला विचारलें, पण राजानें सांगितलें कीं "या गाईच्या रक्षणाची जबाबदारी मजवर आहे आणि हें कर्तव्य बजावण्यासाठीं देहाचाही जरी मला त्याग करावा लागला तरी मला त्याची पर्वा नाहीं. देह कांहीं राहणारा नाहीं. तेव्हां त्यासंबंधीं फाजील प्रेम मला नाहीं. कारण या भौतिक पिंडाची मला फिकीर नाहीं."

**शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम्।**

आणि

**एकांतविध्वंसिषु मद्विधानां**
**पिंडेष्वनास्था खलु भौतिकेषु।**

या परस्परविरुद्ध भासणाऱ्या दोन वाक्यांत मिळून आर्यसंस्कृतीच्या पराक्रम-

शीलत्व या तत्त्वाचें रहस्य सांठलेलें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. धर्मासाठीं, अंगीकृत कर्तव्य पार पाडण्यासाठीं, शरीराचाही त्याग करावा लागला तरी त्याचें भय नाहीं.

अप्यसुप्रणयिनां रघोः कुले
न व्यहन्यत कदाचिदर्थिता ॥

रघूचें कुळ दानशूरत्वाबद्दल प्रसिद्ध होतें. कोणी जरी प्राणाचें दान मागवयास आला तरी त्याची मागणी निष्फळ होत नाहीं असें दशरथ सांगतो. वर दिलेलें दिलीपाचें वाक्य आणि हें दशरथाचें वाक्य यांत आर्यसंस्कृतीच्या स्वरूपाचें मोठें मोहक, आकर्षक आणि उदात्त असें दर्शन या महाकवीनें आपणांस करून दिलेलें आहे.

संसार उत्तम प्रकारें करावयाचा, त्यासाठीं " शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम् " म्हणून शरीराची निगा उत्कृष्टपणें राखावयाची, आणि वेळ प्रसंग येईल तेव्हां त्या शरीराचा यज्ञ करावयास तयार व्हावयाचें, कारण तें एकांतविध्वंसि आहे, अगदीं नक्की मरणारें आहे, अशी वृत्ति झाली म्हणजे भयाचा अंतःकरणांत मागमूसही राहण्याचें कारण नाहीं. दुर्बळांचें रक्षण करावयाचें, " बलमार्तभयोपशांतये;" म्हणजे दुष्टांशीं जाणूनबुजून तंटा करावयाचा आणि त्यांचे दांत पाडून त्यांना धडा शिकवावयाचा; अन्याय सोसावयाचा नाहीं, जबरदस्ती सहन करावयाची नाहीं, कितीही कोणी बलाढ्य असला आणि तो जर अन्यायानें, अधर्मानें, निर्दयतेनें वागूं लागला तर त्याविरुद्ध स्पष्टपणें पुकारा करावयास मागेंपुढें पहावयाचें नाहीं ही अत्यंत श्लाघ्य आणि आवश्यक वृत्ति आर्यसंस्कृतीच्या तत्त्वप्रणालिकेंत होती. अर्थात् पराक्रम म्हटला म्हणजे आळस असून चालणार नाहीं; " पडे रहे हैं " असली वृत्ति खपणार नाहीं. चपलता पाहिजे; अंग मोडून काम करण्याची तयारी पाहिजे; सावधगिरी पाहिजे. या ज्या सर्व गुणांचा अभाव पुढें पुढें हिंदु समाजांत झाला त्या गुणांला, कालिदास जिचें वर्णन करतो त्या आर्यसंस्कृतींत, अत्यंत महत्त्वाचें स्थान होतें. अवघड गोष्टी टाळणें आणि सोप्या रस्त्यानें जाणें ही आळशी मनुष्यस्वभावाची खूण आहे; पण जेथें हौस आहे, अंगांत ताजें रक्त सळसळतें आहे, धमक आहे तेथें हा मार्ग न पतकरण्याचीच शिकवण मिळावी लागते; आणि या सर्वांना मिळूनच अभ्युदयधर्म असें नांव आहे. अभ्युदयधर्म

आणि मोक्षधर्म यांची सांगड या आर्यसंस्कृतीनें घातली होती; मोक्षधर्माच्या नांवाखालीं अभ्युदयधर्माचा तिनें लोप होऊं दिला नव्हता हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

३. धर्मप्रतिपालन म्हणजे कर्तव्यप्रतिपालन; याच्या मुळाशीं वर्णाश्रमधर्मव्यवस्था होती आणि तिचे हेतु परस्परपूरकता व पराक्रमशीलता हे होते हें वर सांगितलेंच. पण प्रत्यक्ष धर्मप्रतिपालनाच्या महत्त्वाचें थोडेंसें वर्णन करणें जरूर आहे. कारण धर्म ( कर्तव्य ) ही तर या संस्कृतींतील मध्यवर्ती कल्पना आहे. ज्याच्याकडे जो धर्म येईल तो त्यानें उत्तम प्रकारें पार पाडला पाहिजे आणि तसा पार पाडल्यानें अभ्युदय (ऐहिक कल्याण) आणि मोक्ष (पारलौकिक किंवा पारमार्थिक कल्याण ) हीं प्राप्त होतात. ' या दोहोंचीही प्राप्ति करून घेणें आवश्यक आहे अशी या संस्कृतीची आज्ञा होती. या दोन्ही गोष्टी लक्षांत ठेवून जी एक विशिष्ट मनोवृत्ति उत्पन्न करीत असत तिचा पुढें जरी विपर्यास झाला तरी तिचें उज्ज्वल स्वरूप कालिदासीय वाङ्मयांत आपणांस स्पष्टपणें पहावयास मिळतें. वर्णव्यवस्थेबद्दल यापूर्वी थोडेंफार विवेचन केलेलें आहे व तिचें मूळचें स्वरूप सध्यांच्या जातिभेदाचें नव्हतें हेंही तेथें स्पष्ट झालेलें आहे. वर्णव्यवस्थेचा आधार आश्रमव्यवस्था होती किंबहुना आश्रमव्यवस्था ही आर्यसंस्कृतींत अतिशय महत्त्वाची होती आणि आतांच सांगितल्याप्रमाणें तिच्यांत अभ्युदय आणि मोक्ष यांची उत्तम सांगड घातली होती. मनुष्यानें जन्माला येऊन जे चारी पुरुषार्थ साधावयाचे त्यांत मोक्षही आहे आणि या चतुर्वर्गाची सिद्धि हा आर्यसंस्कृतीच्या सर्व व्यवस्थेचा हेतु होता. हे चार पुरुषार्थ धर्म, अर्थ, काम व मोक्ष क्रमाक्रमानें साधावयाचे असत. त्यांत धर्म पहिला घातला आहे व धर्म याचा अर्थ प्रत्येकाचें कर्तव्य हा लक्षांत घेतला म्हणजे तो प्रथमच आला पाहिजे हें उघड आहे. धर्म, अर्थ, काम हे संपादन करून–व्यक्तीचा पराक्रम आणि समाजाची सेवा हीं संपादन करून–नंतर मिळविण्याला अत्यंत कठीण अशा मोक्षाच्या प्राप्तीसाठीं प्रयत्न करावयाचा. हें सर्व उत्तम प्रकारें साध्य होण्यासाठीं आश्रमव्यवस्थेची रचना मोठ्या चातुर्यानें केली होती. पहिला ब्रह्मचर्याश्रम म्हणजे तयारीचा—तपश्चर्येचा आणि ज्ञानसंपादनाचा आश्रम होता. तपश्चर्या आणि ज्ञान यांच्या भक्कम पायावरच आयुष्यांतील कर्तृत्वाची इमारत उभी करतां येते. तपश्चर्या आणि ज्ञान या दोहोंनाही पुढें तांत्रिक स्वरूप आलें. तपश्चर्या म्हणजे एक प्रकारची [illegible]ढाईत झाली आणि

ज्ञान म्हणजे एक प्रकारची आंधळी वटवट झाली. पण त्यामुळें त्यांचें मूळचें सोज्वळ स्वरूप आपण दृष्टीआड होऊं देतां कामा नये. तपश्चर्या ही शरीर आणि मन यांना तयार करण्यासाठीं, सुदृढ करण्यासाठीं, कोणत्याही संकटाशीं टक्कर देण्याला समर्थ करण्यासाठीं असे. ती केवळ कवाईत नव्हती. ब्रह्म-चर्याश्रमांत याप्रमाणें तयारी झाल्यावर मग गृहस्थाश्रमांत जाण्यास हरकत नाहीं. प्रत्येक आश्रमांत त्या त्या आश्रमाचे धर्म म्हणजे कर्तव्यें हीं असत. गृहस्था-श्रमांत अर्थ आणि काम या दोन पुरुषार्थांवर भर असे. धर्माचें ज्ञान हें प्रथमाश्रमांतच होत असे. अर्थ आणि काम या दोहोंच्या साहाय्यानें गृहस्थाश्रम होई, पण यांत अधिक गुरफटून माणूस राहिला तर त्याचा शेवटचा पुरुषार्थ सिद्ध तर होणारच नाहीं, पण त्याच्यामुळें तरुण मंडळींचीही अडचण होईल. तशी ती होते हा सध्यांचाही अनुभव आहे. तेव्हां विश्रांति आणि मोक्षाची तयारी किंवा परमार्थाची तयारी किंवा परोपकाराचे प्रयत्न यासाठीं तिसऱ्या म्हणजे वानप्रस्था-श्रमाची योजना होती. चांगलीं माणसें, शहाणीं माणसें यथाकाल वानप्रस्थाश्रमांत प्रवेश करीत. शकुंतलेनें मला पुनः या आश्रमाचें दर्शन केव्हां होईल म्हणून विचारलें तेव्हां महर्षि कण्व तिला म्हणतो—

भूत्वा चिराय चतुरंतमहीसपत्नी
दौष्यंतिमप्रतिरथं तनयं निवेश्य ।
भर्त्रा तदर्पितकुटुंबभरेण सार्धं
शांते करिष्यसि पदं पुनराश्रमेऽस्मिन् ॥

पतीबरोबर पुष्कळ दिवस (चिराय) राज्याचा उपभोग घेऊन आणि पराक्रमी पुत्राची राज्यावर स्थापना करून व त्याच्यावर संसाराचा सारा भार सोंपवून मग त्या (पती) बरोबर या आश्रमांत पुनः तूं (वानप्रस्थाश्रमाचें पालन करण्यासाठीं) येशील. या सुंदर श्लोकांत गृहस्थाश्रमाचें आणि वानप्रस्थाचें थोडक्यांत वर्णन केलेलें आहे. गृहस्थाश्रमाचें कार्य आटपलें कीं मोक्षाच्या तयारीसाठीं, परमार्थासाठीं संसाराचा त्याग करून अरण्याकडे वळावयाचें. या वानप्रस्थांत परमार्थाच्या मार्गानें मोक्षाकडे कसें जावयाचें याचें वर्णन मागें रघुराजाचा वृत्तांत सांगतांना केलेलें आहे.

केवळ शरीरपोषणापलीकडे माणसाचें कांहीं अधिक कर्तव्य आहे, केवळ शारी-

रिक आनंदापेक्षां उच्चतर असा कांहीं आनंद आहे ही गोष्ट सर्व काळांतील व सर्व ठिकाणच्या सुज्ञांना मान्य आहे. त्या आनंदाचें परिपूर्ण स्वरूप म्हणजे मोक्ष. भौतिक जगांत आपली करामत गाजविल्यावर, त्या आनंदाचा उपभोग घेण्याची आकांक्षा असणें हें उत्कृष्ट मनोवृत्तीचें निश्चित लक्षण होय. तसेंच या आनंदाच्या, म्हणजे मोक्षाच्या नांवाखालीं बाकी सर्व पुरुषार्थांना टाळा देणें हा अंगचुकारपणा होय, आळस होय. झोंप म्हणजे समाधि नव्हे; अर्थशून्य शब्दरचना म्हणजे गूढगुंजनात्मक काव्य नव्हे; मुकेपणा म्हणजे मौनव्रत नव्हे; अशक्तपणा म्हणजे संततिनियमन नव्हे; रणांगणाला भिणें म्हणजे शांततावाद नव्हे; स्वतःजवळ कांहीं नसणें म्हणजे स्वार्थत्याग नव्हे; त्याप्रमाणें पहिल्या तीन आश्रमांतील कर्तव्यांना चुकविणें, पहिल्या तीन पुरुषार्थांपासून अलिप्त असणें, संसार नेटका न करणें, संसाराला भिणें, संसार भयप्रद आहे म्हणून त्यांतून पळ काढणें हाही मोक्ष नव्हे. रघुराजाचें वर्णन करतांना आपल्या कवीची अर्थवती वाणी काय म्हणते पहाः—

अथ वीक्ष्य रघुः प्रतिष्ठितम्
प्रकृतिष्वात्मजमात्मवत्तया।
विषयेषु विनाशधर्मसु
त्रिदिवस्थेष्वपि निःस्पृहोभवत् ॥

रघूनें पाहिलें कीं आपला मुलगा राज्यकारभारांत चांगला वाकबगार झाला आहे व तो आत्मवान् आहे म्हणजे कसलाही वेळप्रसंग आला तरी डगमगणारा नाहीं असा सत्ववान् आहे, सत्वशील आहे; तेव्हां विनाशधर्म असे जे विषय—स्वर्गांतील उपभोगसुद्धां—त्यांविषयीं तो निःस्पृह झाला. म्हणजे रघूनें उत्तम संसार केला; उत्तम संततीला जन्म दिला; मुलगा आपल्या पायावर उभा राहतो हें त्यानें पाहिलें; आणि मग त्याची दृष्टि मोक्षाकडे वळली. जन्मतःच संसारांतून पळणें किंवा लग्न झाल्यावर बायको टाकून किंवा बायकामुलें टाकून मोक्षाच्यामागें लागण्याचा आव आणणें किंवा बायकापोरांची जबाबदारी विसरून देशसेवेचा किंवा धार्मिकपणाचा आव आणणें हे सर्व भिन्नटपणाचे, बेजबाबदारपणाचे, कर्तव्याच्या बाबतींत चुकारतट्टूपणाचे, म्हणजे धर्मभ्रष्टतेचे निरनिराळे प्रकार आहेत; त्यांचा आणि मोक्षाचा कांहींही संबंध नाहीं; त्यांच्या साहाय्यानें मोक्ष मिळवितां येत नाहीं. मोक्ष मिळविण्यासाठीं "त्रिदिवस्थेष्वपि विषयेषु" निःस्पृह व्हावें

लागतें, समलोष्टकांचन व्हावें लागतें. मोक्षमार्गाकडे बाकीचीं कर्तव्यें यथासांग पाळून "परिणामे", शेवटीं वळावयाचें असतें; म्हणजे वळलेंच पाहिजे असा आर्यसंस्कृतीचा दंडक आहे. वर दिलेल्या श्लोकाचाच अर्थ विशद करणारा त्याच ठिकाणीं त्याच्यापुढें दुसरा श्लोक आहे तोही लक्षांत ठेवण्यासारखा आहे.

गुणवत्सुतरोपितश्रियः
परिणामे हि दिलीपवंशजाः ।
पदवीं तरुवल्कवाससां
प्रयताः संयमिनां प्रपेदिरे ॥

गुणवान् अशा मुलांच्यावर आपली संसारांतील कमाई (आणि पुण्याई) सोंपवून शेवटीं (परिणामे) दिलीपवंशांतील राजे प्रयत होऊन, यमनियमयुक्त होऊन, तरूचीं वल्कलें धारण करणारे असे जे महंत आहेत त्यांच्या मार्गाचा अवलंब करतात. गुणवत्सुतरोपिता श्री होण्याला प्रथम सश्रीक असलें पाहिजे व सपुत्रक असलें पाहिजे म्हणजे ब्रह्मचर्याश्रम व गृहस्थाश्रम यांतील सर्व पुरुषार्थ (धर्मार्थकाम) साधले पाहिजेत. मग, परिणामे, शेवटीं, प्रयत होऊन (डोक्यांत राख घालून किंवा केवळ अंगाला राख फासून नव्हे) संयमी जनांचा रस्ता (ढोंगी किंवा लफंग्या लोकांचा नव्हे) पतकरला पाहिजे. हा वानप्रस्थाश्रमांतून जो रस्ता निघतो तो मोक्षाकडे जातो. तेव्हां मोक्षमार्ग म्हणजे संसारावर पाणी ओतण्याचा मार्ग नव्हे; ऐहिक सुखविध्वंसाचा मार्ग नव्हे; अभ्युदयधर्माचा नाश करण्याचा मार्ग नव्हे; प्रवृत्तीला नष्ट करण्याचा मार्ग नव्हे; तर प्रवृत्तीचें कार्य संपादन करून नंतर अत्युच्च आणि शाश्वतसुखसंपादनाचा मार्ग आहे. ह्या आर्यसंस्कृतीनें हे चार आश्रम आणि हे चार पुरुषार्थ सांगितले. तिनें कोणाचा कसलाही घात केला नाहीं; पण तिच्या सरळ संदेशाच्या अर्थाचा अनर्थ ज्यांनीं केला, मोक्षाची लायकी नसतांना तांत्रिक गोष्टींचें स्तोम माजवून मोक्ष तर मिळणें शक्य नव्हतें तेव्हां तो मिळविला नाहींच पण संसाराचा मात्र ज्यांनीं विध्वंस केला, त्यांनीं आपल्या या हिंदु समाजाच्या मानेवर सुरी ठेवली. अद्यापि आपण आर्यसंस्कृतीच्या वास्तविक स्वरूपाचें ज्ञान करून घेऊन आपलें आचरण सुधारलें तर अभ्युदय आणि मोक्ष दोन्ही आपल्या हातांत आहेत. तेव्हां मोक्षधर्म, परमार्थ, वेदांत हे शब्द उच्चारल्याबरोबर पिचकून जाण्याची संवय जी कित्येकांनीं लावून घेतली आहे त्यांनीं ती

सोडून द्यावी. धर्मार्थकामापेक्षां मोक्ष श्रेष्ठ आहे; कारण केवळ भौतिक सुखाच्या पलिकडे, इंद्रियवृत्तींना संतुष्ट करण्याच्या पलिकडे कांहीं तरी सुंदर आनंद आहे यांत मात्र शंका नाहीं. त्या आनंदाचें नांव घेऊन संसार कष्टमय व दुःखमय करावा ही शिकवण कोणाचीही असो, ती आर्यसंस्कृतीची नाहीं. पण या श्रेष्ठ आनंदाचें अस्तित्व जे नाकबूल करतात व केवळ " सुखं च मे शयनं च मे " या तत्त्वाचा जे अहर्निश जप करतात त्यांनाही आर्यसंस्कृतींत जागा नाहीं; कारण श्रेय व शाश्वत सुख आणि मोक्ष हीं त्या संस्कृतीनें उत्कृष्ट माणसांच्या आकांक्षांचे विषय, ध्येय म्हणून स्पष्टपणें सांगितलेलीं आहेत.

अभ्युदयधर्माच्या मार्गांत असलेल्यांचीं पुष्कळ वर्णनें आपण वाचलीं. आतां मोक्षमार्गावर असलेल्यांचें स्वरूप थोडेंसें पाहूं. रघूचें वर्णन तर आपण पाहिलेंच. संसारांतून निवृत्त होऊन वानप्रस्थाश्रमांत प्रविष्ट झालेल्यांचींही वर्णनें आपण वाचलीं. पण

ब्रम्हानंदीं लागली टाळी
कोण देहातें सांभाळी ॥

अशा मुक्त महंतांचीं वर्णनें कालिदासानें केलेलीं आहेत. शाकुंतलांतील सातव्या अंकांतील दोन श्लोक या ठिकाणीं कोणालाही आठवतील. मारीच ऋषि जेथें तपश्चर्या करीत होता त्या जागेचें वर्णन इंद्रसारथि मातलि करीत आहेः—

वल्मीकार्धनिमग्नमूर्तिरुरसा संदष्टसर्पत्वचा
कंठे जीर्णलताप्रतानवलयेनात्यर्थसंपीडितः।
अंसव्यापि शकुंतनीडनिचितं बिभ्रज्जटामंडलं
यत्र स्थाणुरिवाचलो मुनिरसावभ्यर्कबिंबं स्थितः

झाडाच्या खोडासारखा निश्चल असा हा मुनि सूर्यबिंबाकडे सारखी दृष्टि लावून बसलेला आहे. त्याचें अर्धेमुर्धे शरीर मुंग्यांच्या वारुळांत बुडून गेलें आहे ( वर वारुळ चढलें तरी त्याची त्याला दाद नाहीं ); छातीला सापाची कात लगटलेली आहे ( आंगावरून सर्पासारखे प्राणि कात टाकून गेले तरी त्याची त्याला क्षिति नाहीं ); जीर्ण झालेल्या झुडपांच्या गुंताळ्यांत सांपडल्यामुळें त्याच्या मानेवर मोठा भार पडतो आहे ( मानेभोंवतीं झुडपें वाढलीं आहेत ); त्याचा जटाभार खांद्याखालीं लोंबतो आहे आणि त्या जटेंत पक्षी घरटीं करून राहिले आहेत.

त्या "ब्रह्मानंदीं टाळी" लागलेल्या महर्षींचें दर्शन होतांच "नमस्ते कष्ट-तपसे" म्हणून राजाची मान लवली यांत नवल काय? ही तपश्चर्या साधणें म्हणजे फुकाची गोष्ट नाहीं आणि ही तपश्चर्या साधणारे संसारांतील अडचणींना भितील ही गोष्ट शक्य तरी आहे काय?

दुसरा श्लोक थोडा चमत्कृतियुक्त आहे:—

प्राणानामनिलेन वृत्तिरुचिता सत्कल्पवृक्षे वने
तोये कांचनपद्मरेणुकपिशे धर्माभिषेकक्रियाः।
ध्यानं रत्नशिलातलेषु विबुधस्त्रीसंनिधौ संयमो
यत्कांक्षंति तपोभिरन्यमुनयस्तस्मिंस्तपस्यंत्यमी॥

ज्या ठिकाणचें हें वर्णन आहे तें तपोवन सौंदर्याचें केवळ आगर होतें आणि हें वर्णन करतांना कवीच्या मनांत हिमालयांतील तपोवनें असलीं पाहिजेत हें उघड आहे.

दिवं यदि प्रार्थयसे वृथा श्रमः
पितुःप्रदेशास्तव देवभूमयः॥

असें हिमालयाचें वर्णन कुमारसंभवांत केलेलें आहे. या तपोभूमीकडे पाहून राजा दुष्यंताला मोठा विस्मय वाटला. कारण—

त्या वनांत कल्पवृक्ष कितीतरी होते. (त्यांच्याकडून वाटेल तें मिळालें असतें.) पण त्या कल्पवृक्षाखालीं बसून ते ऋषि फक्त वायु भक्षण करून उप-जीविका करीत होते. सुवर्णकमलांच्या परागामुळें ज्यांतील पाणी पिंगट झालें होतें (तेथें विहार करण्याची केवढी बहार असेल!) अशा सरोवरांचा फक्त धर्म्यकृत्यांप्रीत्यर्थ करावयास लागणाऱ्या स्नानांसाठीं ते ऋषि उपयोग करीत. रत्नांचीं शिलातलें तेथें होतीं पण त्यांवर बसून ते ध्यान करीत (झोंपत नव्हते). स्वर्गांतील अप्सरा तेथें होत्या; पण हे ऋषि तेथें संयमाचें प्रतिपालन करीत. दुसरे (सामान्य) मुनि तप करून जीं फळें मिळवूं पाहतात तीं सर्व जेथें (आयतीं सिद्ध) आहेत तेथें (त्यांची पर्वा न करतां) हे ऋषि तपश्चर्या करीत आहेत.

म्हणजे तपश्चर्या करून विनाशधर्म उपभोग मिळविणें हा मोक्ष नव्हे; मोक्ष त्यांच्या पलिकडे आहे; तो शाश्वतधर्म आहे. आणि त्या चिरंतन, शाश्वत आनंदा-

साठीं ते ऋषि समोरचा सर्व विषयांचा पसारा दूर सारून, त्यानें मन विकृत न होऊं देतां, तप करीत होते. या चित्रांतील माधुरी कांहीं अपूर्व आहे व आर्य-संस्कृतीची ध्येयरूपता त्यांत उत्कृष्ट दृग्गोचर होते.

४. ग्रंथांतील निरनिराळ्या भागांतील विवेचनांत आर्यसंस्कृतीच्याच स्वरूपाचें दिग्दर्शन झालेलें आहे; पण त्यांतील धृति ( परस्परपूरकता ), पराक्रमशीलता आणि आश्रमधर्म या तीन तत्त्वांचें थोडेंसें अधिक विवरण करावें असें आवश्यक दिसलें म्हणून तें केलें. त्यावरून अभ्युदय व मोक्ष, ऐहिक व पारलौकिक यांत समन्वय करण्याचा या संस्कृतीनें फार यशस्वी प्रयत्न केला होता असें दिसून येईल. त्याप्रमाणें वशित्वाला, आत्मवत्तेला, इंद्रियदमनाला आणि त्याचें साधन म्हणून तपस्वितेला या संस्कृतींत प्राधान्य होतें हेंही स्पष्ट होईल. इंद्रियाच्या आहारीं जाणें म्हणजे संस्कृति नव्हे; तर इंद्रियें आपल्या स्वाधीन ठेवून त्यांकडून आपलीं कार्यें यथायोग्य प्रकारें करून घेणें याला संस्कृति म्हणतात. तसेंच या संस्कृतींत ज्ञानाला फार महत्त्व होतें. त्याचाच कित्येकांनीं विपरीत अर्थ करून ज्ञान म्हणजे कर्मशून्यता असा नियम बसविला; तो नियम आर्यसंस्कृतीचा नाहीं; तो तिच्या तत्त्वाविरुद्ध आहे. कर्म आणि ज्ञान यांची योग्य सांगड म्हणजेच

पवनाग्निसमागमो ह्ययम् ।

असें वर्णन आहे. पण भाबडेपणाला, भोळेपणाला, दैववादाला या संस्कृतींत कोठेंही जागा नाहीं. या ठिकाणीं कर्म, पुनर्जन्म वगैरे तात्त्विक विचारांत खोल शिरण्याचें कारण नाहीं. पण या तात्त्विक विचारसरणींतून दैववाद निष्पन्न होऊं नये अशी खबरदारी घेतलेली या संस्कृतींत आपणांस आढळून येते. आतां ज्या गोष्टी आपणांस माहीतच नाहींत, जेथें सृष्टीचा नियमच निश्चित ठरलेला आहे, तेथें आपलें चालत नाहीं असें कबूल करणें हा प्रामाणिकपणा आहे, दैववाद नव्हे. अशा वेळींसुद्धां मनुष्यानें प्रयत्नाची परमावधि करावी अशीच शिकवण कालिदासाच्या ग्रंथांत सर्वत्र आहे. म्हणून तर इंद्राशीं सामना करण्याला बाळ रघु उभा राहिला; म्हणून तर रूपाचें वैय्यर्थ्य सिद्ध झाल्यावर प्रचंड तपश्चर्येचा मार्ग पार्वतीनें स्वीकारला; म्हणून तर दिलीपराजानें स्वदेहार्पणनिष्क्रयानें गाईचा प्राण वाचविण्याची एवढी खटपट केली. या प्रयत्नवादाची उभारणी धर्मा-वर—कर्तव्यनिष्ठेवर केलेली आहे. " स्वधर्मे निधनं श्रेय: " म्हणजे आपलें

कर्तव्य करीत असतांना मरण आलें तरी तें उत्तम, हा आर्यसंस्कृतीचा मोठा महत्त्वाचा सिद्धांत आहे. कर्तव्यपरिपालनाचे अनेक उदात्त प्रसंग विशेषतः रघुवंशाचे सर्ग वाचतांना आपल्या डोळ्यांपुढें येतात व आपणांला वरच्या वातावरणांत नेतात. तसेंच परोपकार हेंही आर्यसंस्कृतीचें मोठें महत्त्वाचें तत्त्व आहे.

"बलमार्तभयोपशांतये"

हा दंडक या बाबतींत लक्षांत ठेवण्यासारखा आहे. "त्यागाय संभृतार्थानां" यांतूनही तेंच तत्त्व निष्पन्न होतें.

धर्म म्हणजे कर्तव्य; त्याला अनुलक्षून सांगितलेलें जें आचरण तो सदाचार; त्याच्या विरुद्ध तो स्वेच्छाचार. आर्यसंस्कृतींत सदाचारावर निःसंशय भर आहे. कोणतें कर्तव्य आहे यावर सदाचार अवलंबून असतो. भगवद्गीताप्रसंगीं युद्ध करणें हें अर्जुनाचें कर्तव्य होतें, तो त्याचा धर्म होता; म्हणून दया वगैरे तत्त्वांच्या आड दडून तो जरी रणांगण सोडूं पहात होता तरी तसें करणें सदाचार नव्हे, अनाचार होईल, हें श्रीकृष्णानें त्याला स्पष्ट करून सांगितलें. रघुराजा व सिंह यांच्या संवादांत गाईसारख्या क्षुल्लक जनावरासाठीं राजानें आपला प्राण बळी देऊं नये असें सिंहानें निरनिराळ्या गोष्टी सांगून राजाच्या मनावर ठसविण्याचा प्रयत्न केला.

शस्त्रेण रक्ष्यं यदशक्यरक्षं
न तद्यशः शस्त्रभृतां क्षिणोति ।

ज्याचें शस्त्रानें रक्षण करायाचें त्याचें तसें रक्षण करणें शक्यच नाहीं ( शस्त्राचा उपाय चालत नाहीं ) असें झाल्यावर मग जरी तो पदार्थ नष्ट झाला तरी त्यामुळें शस्त्र धारण करणाराच्या यशाला धोका पोहोंचत नाहीं, हा न्यायही त्यानें राजाला सांगितला. पण राजानें दिलेलें उत्तर खणखणीत होतें—शंकराचा प्रभाव मला मान्य आहे पण माझ्या आहिताग्नि गुरूचें हें गोधन डोळ्यांसमोर नाश पावत असतां त्याची उपेक्षा करणें योग्य नाहीं. शिवाय मी क्षत्रिय आहें, संकटांतून त्रस्तांना वाचविणें हें माझें कर्तव्य आहे, तो माझा धर्म आहे आणि त्या धर्माला सोडून वागल्यावर मग मलीन झालेल्या या प्राणांची तरी काय किंमत आहे ? ते मागे राहून तरी फायदा काय ? ही जी कर्तव्यबुद्धीची जाणीव, ही जी धर्मवृत्ति, ही जी पतकरलेली जबाबदारी पार पाडण्याची अत्यंत तीव्र इच्छा ती

दैववादाला सर्वस्वीं विरुद्ध आहे; हिच्यांत दैवाला जिंकण्याची शक्ति आहे; आणि आर्यसंस्कृतींत ही धर्मवृत्ति फार महत्त्वाची आहे.

या धर्मवृत्तीची, धर्मरतीची प्रशंसा दिलीपाचें वर्णन करतांना आपल्या कवीनें वरचेवर केलेली आहे:—

उदाहरणार्थः—अप्यर्थकामौ तस्यास्तां धर्म एव मनीषिणः ।

त्या ज्ञानी, शहाण्या राजाचे अर्थ आणि काम हे धर्मस्वरूपच होते. म्हणजे त्याचें अर्थार्चन आणि कामसंपादन हींसुद्धां धर्मवृत्तीला अनुसरून होतीं. या दोन्ही गोष्टी माणसांच्या कर्तव्यांत येतात, त्या त्याज्य नाहींत. पण त्या विशिष्ट प्रमाणापलीकडे दूषणीय होतात. त्या प्रमाणाबाहेर न जाणें म्हणजे धर्म. आर्यसंस्कृति म्हणजे संन्यासमार्ग नव्हे, संन्यास हा त्या संस्कृतीनें प्रतिपादिलेल्या अनेक कर्तव्यांपैकीं एका विशिष्ट कालचें कर्तव्य होतें हें यावरून लक्षांत येईल. रामचंद्र राज्य करीत होता तेव्हां धाकट्या भावांना त्यानें अगदीं सारखेपणानें वागविलें असें वर्णन करतांना कवि म्हणतो

धर्मार्थकामेषु समां प्रपेदे
यथा तथैवावरजेषु वृत्तिम् ।

भावांच्या ठिकाणीं कशी समवृत्ति रामचंद्रानें ठेविली होती तर जशी धर्म, अर्थ आणि काम यांच्या ठिकाणीं ठेविली होती तशी. यावरून सहज लक्षांत येईल कीं अर्थ आणि काम यांना धर्माइतकेंच महत्त्व आहे, त्यांकडे दुर्लक्ष करावें असा आर्यसंस्कृतीचा उपदेश नाहीं. मात्र त्यांतच गुरफटून धर्माकडे किंवा मोक्षाकडे दुर्लक्ष करावें असेंही नाहीं. या चारी पुरुषार्थांसाठीं सारख्या धडाडीचे प्रयत्न करावेत; त्यांतील क्रम आणि एकसमयावच्छेदिता हीं लक्षांत ठेवून वागावें असा या म्हणण्याचा इत्यर्थ आहे. हें वागणें असतें कसें याचें रामचंद्राचेंच वर्णन करतांना सांगितलें आहे:—

तेनार्थवाँल्लोभपराङ्मुखेन
तेन घ्नता विघ्नभयं क्रियावान् ।
तेनास लोकः पितृमान्विनेत्रा
तेनैव शोकापनुदेन पुत्री ॥ १४–२३ ॥

तो राम लोभी नव्हता म्हणून लोक त्याच्यामुळें श्रीमंत होते. राजा किंवा राजसत्ता लोभी नसेल तरच लोक श्रीमंत असणें शक्य असतें. "राजा लुटि जरि प्रजा-

जनांला" किंवा करांचें ओझें जर बेसुमार वाढलें (त्याला कायदेशीर पद्धतीची लूट असें म्हणतां येईल) तर लोक अर्थवान् राहणार नाहींत; कारण जवळ अर्थ राहणार नाहीं म्हणून ते अर्थाचें उत्पादन किंवा संपादन करणार नाहींत. पण रामराज्यांत लुटीचें भय नव्हतें म्हणून लोक अर्थवान् होते. राजानेंही धन मिळवावें, अर्थ मिळवावा पण धर्म सोडूं नये हें तात्पर्य. नंतर रामाच्या राज्यांत सर्व क्रिया, निरनिराळे उद्योग व व्यवसाय, उत्तम प्रकारे चालत; कारण तो सर्व विघ्नांचा नाश करी. समाजांतील सर्व कार्यें सुरळीत चालण्याला त्या कार्यांत विघ्नें उपस्थित होत नसावींत; म्हणजे राजसत्तेनें हीं विघ्नें, हे प्रतिबंध नाहींसे करावेत, आपण होऊन तर मुळींच उभे करूं नयेत. तसेच तो लोक धर्मानें वागतात का नाहीं हें पहात असे, त्यामुळें सर्व लोक पितृमान् होते. पित्याचें कर्तव्य मुलांना नीट वळण लावणें आहे व राजसत्तेचेंही कर्तव्य लोकांना वळण लावणें हें आहे. तसाच तो रामचंद्र कोणावर कसलेंही संकट आलें, कोणाला कांहीं दुःख झालें तरी तें निवारण करी त्यामुळें सर्व लोक त्याच्या राज्यांत पुत्रवंत असल्याप्रमाणें होते. पुत्राचें काम मातापितरांना तोशीस न पडूं देणें हें आहे व रामचंद्र लोकांना शोक होऊं देत नसे. प्रत्यक्ष वाच्यार्थानें सुद्धां रामराज्यांत आईबापांच्या देखत मुलें मरत नसत. तेव्हां अशा प्रकारें हें धर्मप्रतिपालनाचें, कर्तव्यनिष्ठेचें वर्णन आहे. या कर्तव्यनिष्ठेलाच धर्मवृत्ति, धर्मरति अशीं नावें कवीनें दिलेलीं आहेत. हीं कामें एकदां वाटून दिल्यावर ज्यांकडे जीं आलीं तीं त्यानें उत्तम प्रकारें बजावावींत हा त्याचा धर्म आहे. यांची वाटणी करतांना योग्यतेचें तत्त्व टाकून ज्यांनीं जन्मावर भर दिला त्यांनीं कळत किंवा नकळत मोठा अनर्थ केला; पण त्यामुळें तीं समाजांत योग्य प्रकारें वाटावीं लागतात या तत्त्वाला बाध येत नाहीं.

राष्ट्राचा काय किंवा व्यक्तीचा काय, अभ्युदय होण्याला माणसें विषयांच्या, इंद्रियार्थांच्या आहारीं जाणारीं नसून इंद्रियांवर स्वामित्व चालविणारीं असावींत या तत्त्वाचा निर्देश मागें केला आहे व "वशित्व" हें उत्तमपणाचें,—व्यक्तीच्या, समाजाच्या आणि संस्कृतीच्या,—उत्तमपणाचें लक्षण आहे हें कधींही विसरून चालणार नाहीं. इंद्रियार्थांच्या आहारीं जाऊन माणूस केवळ स्वार्थी बनतो; पण या भागाच्या सुरवातीला दिलेल्या सुभाषितांत सांगितल्याप्रमाणें

गुणवत्तापि परप्रयोजना ।

असली पाहिजे; आपल्याजवळचे सर्व गुण दुसऱ्यांच्या उपयोगी पडले पाहिजेत,

म्हणजे गुण तर आपण संपादन केलेच पाहिजेत, आणि मग ते दुसऱ्याच्या उपयोगीं पडतील अशी योजना केली पाहिजे. जे गुण आपलेच आहेत त्यांचा आपल्याला उपयोग होतोच, पण केवळ आपल्याला उपयोग होणें हें कांहीं त्या गुणांच्या विपुलतेचें लक्षण नव्हे. आपण चांदीच्या ताटांत जेवावयास बसावयाचें आणि पाहुण्यांना पत्रावळी द्यावयाच्या ही श्रीमंतीची कल्पना दरिद्री लोकांची आहे. पण ज्याच्याकडे जेवतांना कितीही पाहुणे येवोत, त्यांची सर्व व्यवस्था मालकाच्या बरोबरीनें चांदीच्या किंवा सोन्याच्या ताटवाट्यांनीं होते त्याची श्रीमंती अस्सल दर्जाची हें स्पष्ट करून सांगण्याची आवश्यकता नाहीं. त्याप्रमाणें आपल्या गुणांनीं फक्त आपला स्वार्थ साधला तर त्यांत काय विशेष आहे ?

काकोपि जीवति चिराय बलिं च भुंक्ते

हें वचन प्रसिद्धच आहे. पण " गुणमत्तापि परप्रयोजना " असली म्हणजे ती गुणमत्ता आहे याबद्दल शंका रहात नाहीं. दुःखितांचा त्रास नाहींसा करण्यासाठीं आपलें बळ खर्च केलें पाहिजे. दरिद्री आहेत त्यांचें दारिद्र्य नाहींसें करण्यासाठीं आपला अर्थ खर्च केला पाहिजे. जे अज्ञान आहेत त्यांना " शहाणे करूनी सोडावें " म्हणून आपलें ज्ञान योजिलें पाहिजे. अशा प्रकारें आपुल्या आयुष्याचें सार्थक्य म्हणजे दुसऱ्याच्या उपयोगी पडण्यांत आहे हाही आर्यसंस्कृतीचा बहुमोल संदेश आहे. हा परोपकार करतांना पुष्कळ वेळां दुसऱ्याच्या भांडणांत पडावें लागतें व दुसऱ्यांच्या वाटेलाही जावें लागतें. अशा प्रकारची कार्यात्मक परोपकारवृत्ति आर्यसंस्कृतीनें उपदेशिलेली आहे. आज कित्येक शतकें जी " आपण बरें कीं आपलें काम बरें " ही ( त्याच्या दूषणीय अर्थानें ) वृत्ति प्रशंसेला पात्र होत आहे ती आर्यसंस्कृतीनें शिकविलेली नाहीं. स्वार्थासाठीं आपण होऊन तंटा करावयाचा नाहीं असें म्हणून वागलें तरी दुसरा माणूस तंटा करतोच. तेव्हां तंटा चुकत नाहीं व तो हुडकण्यासाठीं जाऊं नये पण तो चुकविण्यासाठीं लटपटी खटपटी करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. प्रसंग आला कीं शार्ङ्गरवाचा निर्भयपणा व सत्यवादित्त्व यांचा अवलंब केला पाहिजे.

५. कालिदासाच्या ग्रंथांतील वर्णनांच्या अनुरोधानें आर्यसंस्कृतीचें स्वरूप काय असावें हें पाहण्याचा थोडासा प्रयत्न येथें केलेला आहे. तो करतांना पूर्वी विवेचनांत आलेल्या गोष्टींची द्विरुक्ति होण्याचें भय फार; तरीसुद्धां ज्यांचा विशेष

उल्लेख करणें आवश्यक वाटलें त्यांची द्विरुक्तीही होऊं दिली आहे. आणखी एका पूर्वी आलेल्या गोष्टीचा पुनरुल्लेख करून हा भाग संपवूं. स्त्रीपुरुषसंबंधांत अनुरूपता असावी ही परिस्थिति कालिदासाला मान्य आहे; आणि अनुरूपतेंत परस्पर-प्रेम हें तो अवश्य गृहीत धरतो व त्याचें त्याला मोठें कौतुक वाटतें हें पार्वती-चरित्रावरून स्पष्ट होतें. तेव्हां या बाबतींत आर्यसंस्कृति ( कालिदासप्रणीत ) कोणता सिद्धांत सांगते असें पहावयाचें झाल्यास प्रथम गृहस्थाश्रम हा धर्मपत्नीमुळें होत असे; म्हणून विवाहसंस्था ही आर्यसंकृतीला मान्य होती हें लक्षांत ठेविलें पाहिजे. या संस्थेची उभारणी प्रेमावर व अनुरूपतेवर व्हावी असें कालिदासाचें स्पष्ट मत आहे. मुलांमुलींनीं आपणांस काय पाहिजे हें ठरवावें, पण पुढें आई-बापांना विचारून सर्व निश्चित करावें असेंही त्याचें मत स्पष्ट दिसतें व सर्व गोष्टींचा सर्व बाजूंनीं विचार करतां हेंच मत पुष्कळांना प्रशस्त वाटेल. अर्थात् आईबाप अगदीं हेकेखोर असले किंवा मुलें अगदीं मूर्ख असलीं तर काय करावयाचें हा प्रश्न निघेल आणि त्याचें उत्तर देतांना, हेकेखोरपणा आणि मूर्खपणा केल्यावर तें उत्तर कांहींही असलें तरी, वरील तत्वाला बाध येण्याचा संभव नाहीं. हेकेखोर किंवा मूर्ख माणसांशीं कसें वागावें यावरून वागण्याचा सर्वमान्य नियम घालतां येत नाहीं हें उघड आहे. परंतु सामान्यपणें लग्न ठरवितांना दोन्ही बाजूंच्या आप्तांचें साहाय्य घ्यावें, सर्व कांहीं " परीक्ष्य," विचारपूर्वक ठरवावें, हा मार्ग प्रशस्त होय. विशेषतः मुलींनीं पार्वतीचें अनुकरण करण्यास कधींही विसरूं नये व शकुंतलेचें अनुकरण करूं नये हा स्पष्ट ध्वनि शाकुंतल व कुमार-संभव यांतून निघतो. ज्या पार्वतीनें एवढी घोर तपश्चर्या करून शंकराचें प्रेम संपादन केलें तिनेंसुद्धां तें प्रेम संपादन झाल्यावर, आपल्या मनासारखें स्थळ एवढ्या प्रयत्नानें जमविल्यावर, सखीकडून त्याला

दाता मे भूभृतां नाथः प्रमाणीक्रियतामिति ।

असा निरोप पाठविला. कन्यादानाचा अधिकार पितरांचा आहे; तें कोणास द्यावयाचें याबद्दल मुलीचा कल त्यांनीं पाहिला पाहिजे. पार्वतीसारखी तेजस्विनी कन्या आणि हिमालयासारखा सुज्ञ पिता असला म्हणजे तंटा उपस्थित होण्याचें कारणच नाहीं. पण एकंदरींत मुलांमुलींच्या अगदीं मनाविरुद्ध मातापितरांनीं कांहीं करूं नये हें जितकें खरें तितकेंच त्यांचें नुकसान होत असलेलें त्यांनीं उघड्या डोळ्यांनीं पाहूं नये हेंहि खरें. आईबाप हट्टी असण्याचा जितका संभव आहे

तितकाच मुलांचें वागणें अज्ञानामुळें, पोरकटपणामुळें, भावनातिरेकामुळें वेडेपणाचें असण्याचा संभव आहे हेंहि खरें. तेव्हां या बाबतींत आत्यंतिक वृत्तीचा आश्रय न करतां मध्यस्थ वृत्तीचा आदर करावा ही कालिदासाची शिकवण योग्य दिसते. म्हणजे यांत संयमाची शिकवण प्रत्येकाला असली कीं विशेष दुर्धर प्रसंग ओढवण्याचें भय नाहीं. पार्वतीच्या सर्व चरित्राचें रहस्य हें आहे कीं उत्कृष्ट प्रेमाला मुद्दां अधिष्ठान उत्तम संयमाचें पाहिजे तेव्हांच

तथाविधं प्रेम पतिश्च तादृशः।

प्राप्त होत असतात. शंकराचें ज्ञान करून घेऊन मग ती त्याच्या प्राप्तीच्या प्रयत्नाला लागली. तें ज्ञान पुरें नव्हतें; पूर्ण ज्ञान तिला मदनदहनानंतर झालें. तेव्हां "अत: परीक्ष्य कर्तव्य" हा दंडक विवाहाच्या बाबतींत लक्षांत ठेविला पाहिजे.

उपरोक्त चर्चिलेल्या तत्त्वांचें अनुसरण करून आर्यांचा समाज पुष्कळ शतकें या देशांत सुखानें व भरभराटीनें राहिला असें दिसतें. पण पुढें जसजसें या तत्त्वांना केवळ तांत्रिक स्वरूप येऊं लागलें तसतशी परिस्थिति बदलूं लागली, वर्णाश्रमधर्मव्यवस्थेचें उज्वल स्वरूप नाहींसें होऊन ब्राह्मण हे लोभी झाले व क्षत्रिय चैनी आणि जुलमी झाले. तेव्हां सामान्य जनतेला सुखाचे दिवस संपले असें वाटूं लागलें. धर्मप्रतिपालनाच्या तत्त्वाला कर्मकांडाचें स्वरूप देण्यांत आलें व सदाचरणापेक्षां तांत्रिक आचरणाला पुण्याचरण म्हणण्याची प्रथा पडूं लागली. या सर्व गोष्टी कालिदासाचा काळ कोणताही धरला तरी त्यापूर्वी कांहीं शतकें व्हावयास लागल्या होत्या. जैनधर्म किंवा सर्वत्र कांहीं काळ फैलावलेला बुद्धधर्म हे त्यावेळच्या आर्यधर्माच्या विकृतावस्थेविरुद्ध बंड करणारे पंथ होत. पण आर्यसंस्कृतींल कित्येक स्थूल दोष त्यांना दिसले व त्या दोषांनाच नष्ट करण्याचें त्यांनीं एकांतिक प्रयत्न केले. वैदिक धर्मांतील कर्मठपणाचा निषेध करण्यासाठीं अहिंसेच्या तत्त्वाचा हास्यास्पद अतिरेक करणें किंवा कर्मकांडाला विरुद्ध म्हणून निष्क्रिय ध्यानधारणेचा अतिरेक करणें या ज्या गोष्टी घडल्या त्यानें आर्यसंस्कृतींतील दूषणें नाहींशीं झालीं नाहींतच; पण पुढें जेव्हां आर्यसंस्कृतीची पुनः स्थापना शंकराचार्यांनीं केली तेव्हां हीं व अशा तऱ्हेचीं त्यावेळचीं अत्यंत लोकप्रिय झालेलीं तत्त्वें आपल्या धर्मांत आहेत असें म्हणूनच त्यांना आपल्या प्रतिपक्षांचा पाडाव करतां आला. अशा प्रकारें प्रत्यक्ष व्यवहारांत या संस्कृतीचें ढासळत चाललेलें मंदिर अधिकच खिळ-

खिळें झालें. वादविवादांतील जय आणि प्रत्यक्ष खरा जय यांत पुष्कळ अंतर असतें हें खोटें नाहीं.

हा विषय संपवितांना एक सावधगिरीची सूचना केली पाहिजे. आर्यसंस्कृतीची या ठिकाणीं चर्चा केली आहे याचें कारण अशी संस्कृति होती व तिचें एके काळीं उज्वल स्वरूप होतें हें कालिदासीय वाङ्मयांत दिसतें तें स्पष्ट करावें हेंच होय. यांतील कोणतीं तत्त्वें आजच्या परिस्थितींत उपयोगी पडतील हा स्वतंत्र विचाराचा भाग आहे. यांतील कांहीं तत्त्वें इतकीं चिरंतन स्वरूपाचीं आहेत कीं तीं आजच्या काळींही मार्गदर्शक व्हावीं. पण येथें वर्णन केलेल्या गोष्टी जशाच्या तशा घेतल्या कीं आजच्या सर्व अडचणी मिटतील असें म्हणण्याचा येथें मुळींच हेतु नाहीं. त्या गोष्टी जशाच्या तशा घेणें सोपेंही नाहीं किंवा शक्यही नाहीं. वर्णाश्रमधर्माचें वर वर्णिलेलें स्वरूप उपकारक होतें असें म्हणणें म्हणजे जातिभेदाच्या आजच्या दुष्ट स्वरूपाचें समर्थन करणें नव्हे हें सुज्ञ वाचकांच्या लक्षांत येईलच. पण हा जातिभेद नाहींसा करून तेथें वर्णाश्रमव्यवस्था आणावी असें म्हणणें जितकें सोपें आहे तितकें करणें सोपें नाहीं हेंही अगदीं उघड आहे. या जातिभेदाला आतां कांहीं तरी नवा उपाय करावा लागेल; केवळ पूर्वीच्या वर्णाश्रमधर्माच्या गोष्टी बोलून तो निकालांत काढतां येणार नाहीं. तो नवा उपाय काय असावा याच्या विवेचनाचें हें स्थल नव्हे. पण हा नवा उपाय काढावा लागला तरी वर्णाश्रमधर्मव्यवस्थेचें मूळ स्वरूप काय होतें हें समजून घेण्याची आवश्यकता नाहींशी होत नाहीं. आर्यसंस्कृति म्हणून कांहीं नव्हतीच असें म्हणणाऱ्यांनीं जरा मागेंपुढें पाहून विधानें करावींत एवढी सूचना तरी त्यांना अशा तऱ्हेच्या चर्चेपासून घेतां येईल आणि तींतील तत्त्वांचा यथाकाळ व यथास्थळ उपयोग करून नव्या सुधारणेच्या कार्याला साहाय्य करतां येईल.

# भाग नववा

## समारोप

अमृतजलधेः पायं पायं पयांसि पयोधरः
किरति करकास्ताराकारा यदि स्फटिकावनौ ।
तदिह तुलनामानीयंते क्षणं कठिनाः पुनः
सततममृतस्यंदोद्गारा गिरः प्रतिभावताम् ॥

प्रतिभाशाली कवींच्या शब्दांना, वाक्यांना, कवितांना उपमा तरी कोणती द्यावी ? त्या कवींच्या वाणींतून, ज्यांतून अमृत गळत आहे असे उद्गार सारखे बाहेर पडत असतात. अमृतांत माधुर्य आहे, पुष्टि आहे, शाश्वत चिरंतन जीवन देण्याचें सामर्थ्य आहे तसेंच या कवींच्या कवितांत असतें. त्यांना उपमा देण्याचा प्रयत्न वरील सुभषितांत केला आहे. अमृताच्या सागरांत ( लवणयुक्त समुद्रांत नव्हे ) खूप पाणी पिऊन पिऊन मेघानें जर तारकांच्या आकाराच्या गारा स्फटिकाच्या भूमीवर ( माती दगडांत नव्हे ) उधळल्या तर त्यांची उपमा कवींच्या उद्गारांना देतां येईल. पण ती उपमा देखील पुरी पडणार नाहीं. कारण अमृताच्या झाल्या म्हणून काय झालें, गारा म्हणजे कठीणच; आणि प्रतिभाशाली कवींची वाणी मृदु असते. हें वर्णन कालिदासाच्या काव्याला बरोबर लागू पडतें. त्याच्या कवितांना अमृतस्यंदी उद्गार म्हणणें म्हणजे त्यांचें यथार्थ वर्णन करणें आहे. त्याच्या कवितांच्या असामान्य गुणांचें स्वरूप आविष्कृत करण्याचा लहानसा प्रयत्न या ग्रंथांत केलेला आहे. सुरवातीला विषयप्रवेश करतांना कालिदासाच्या थोरवीचें कौतुक शतकानुशतकें संस्कृत पंडित कसें करीत आले आहेत हें आपण पाहिलें व पाश्चिमात्य देशांतही त्याचें कविकुलगुरुत्व कसें मान्य झालें हें सांगितलें. कालिदास बरोबर केव्हां झाला हें सांगतां येत नाहीं व त्याच्या कालनिर्णयाच्या प्रश्नांत शिरणें हा या ग्रंथाचा हेतु नाहीं या गोष्टीचा उल्लेख करून, कालिदासानें रघुवंशाच्या आरंभीं ध्वनिरूपानें दिलेल्या काव्यव्याख्येचा थोडासा ऊहापोह करून नंतर त्याचीं काव्यें व नाटकें कोणकोणतीं आहेत याची थोडीशी माहिती दिली. कालिदासासंबंधीं जरी प्रत्यक्ष माहिती उपलब्ध नाहीं तरी त्याच्या ग्रंथांवरून त्याच्याविषयीं कांहीं

वैयक्तिक स्वभावविषयक वगैरे अनुमानें काढण्याचा आपण प्रयत्न केला व त्याच्या काव्यवाचनानें आनंद व बोध यांची प्राप्ति कशी होते हें पाहिलें. दुसऱ्या भागांत कालिदासाच्या कवितेच्या सामान्य स्वरूपाचें वर्णन आहे व समाज, स्त्रीपुरुष-संबंध, कर्तव्यव्यवस्था इत्यादि गोष्टींबद्दल तो सामान्यपणें काय सांगतो हें दाखविण्याचा प्रयत्न केलेला आहे. तिसऱ्या भागापासून त्याच्या काव्यसृष्टींत प्रत्यक्ष प्रवेश करून तेथें भेटणाऱ्या आबालवृद्धांचे विशेष पहाण्यास सुरवात होते. प्रथम त्याच्या बालसृष्टीचें अवलोकन केलें आहे व त्यानें वर्णिलेले बालक किती तेजस्वी व स्फूर्तिदायक आहेत याचें विवेचन केलेलें आहे. चौथा भाग स्त्रीसृष्टीला वाहिलेला आहे व त्यांत मुख्यत्वेंकरून पार्वती, सीता आणि शकुंतला यांचीं कालिदासानें काढलेलीं काव्यमय चित्रें स्पष्ट केलेलीं आहेत. पांचव्या भागांत निरनिराळ्या परिस्थितींतील पुरुषांचीं कवीनें काढलेलीं चित्रें दिलेलीं आहेत; त्यांत शंकर, रामचंद्र, दुष्यंत, कण्व, वाल्मीकि इत्यादि प्रमुख आहेत. या तीन्ही भागांतील विवेचन अगदीं नव्या पद्धतीनें असें केलेलें आहे व कालिदासानें निर्माण केलेल्या काव्यसृष्टीवर तें निराळा प्रकाश पाडल्याशिवाय राहणार नाहीं. सहाव्या भागांत कालिदासानें वर्णन केलेला आर्यांचा समाज ( ज्याला सध्यांच्या काळीं राष्ट्र नांव देण्याची प्रथा आहे ) कसा होता याचें सामान्यपणें कालिदासवाङ्मयाच्या आधारानेंच विवेचन केलेलें आहे. या भागाचें स्वरूप समाजशास्त्रीय अभ्यासपद्धतीला अनुसरून आहे. सातव्या भागांत कालिदासाच्या काव्यसौंदर्याचें परीक्षण केलेलें आहे आणि संस्कृत-साहित्यशास्त्रांत सांगितलेले ध्वनि, रस, अलंकार, रीति वगैरे निकषांचा उपयोग करून तें काव्य किती आल्हाददायक आहे हें दाखविलें आहे. कालिदासाच्या काव्यांचा निरनिराळ्या, जुन्या व नव्या, दृष्टींनीं अभ्यास करून त्यांतून कालिदासाची ध्येयात्मक विचारसरणी काय आहे व आर्यांच्या संस्कृतीचीं तत्त्वें तो काय सांगतो याचें थोडक्यांत विवेचन आठव्या भागांत आहे. वास्तविक ग्रंथांत सर्वत्र याच विषयाचें विवेचन करणें हा हेतु असल्यामुळें हा आठवा भाग तात्पर्यरूप आहे; व आर्यसंस्कृति म्हणून एक विशेष गुणसंपन्न व आजच्या काळींही आपल्याला मार्गदर्शक होणारी संस्कृति होती हें त्यांत कालिदासाच्या आधारानें सिद्ध करण्याचा प्रयत्न केलेला आहे. अशा प्रकारें आधुनिक काव्यनिरीक्षणाच्या पद्धतीचा उपयोग करून महाकवि कालिदासाच्या कृतींचा परिचय करून घेण्याचा हा प्रयत्न आहे.

२. काव्याबद्दल निरनिराळ्या उपपत्ति निघत आहेत; दुर्दैवानें त्यांपैकीं बऱ्याचशा " आत्मपर " म्हणजे " आत्मसमर्थनपर " आहेत व त्यांचा बहुतेक वेळां इत्यर्थ " आम्ही केलेलें काव्य सर्वोत्तम; त्यांत आहे तें ज्यांत असेल तें उत्तम काव्य;" आणि याहीपुढें जाऊन कोणी असें म्हणतात कीं " आम्हांखेरीज काव्य कोणास समजत नाहीं; तेव्हां आमचें म्हणणें ज्यांना अमान्य ते मूर्ख." कालिदासासारखे जे महाकवि आहेत त्यांना असल्या स्वतःपुरता व्याख्या करण्याची आवश्यकता नाहीं. " मला जेवढे गुण मिळाले तेच परीक्षा उतरण्याचें प्रमाण " असें एखाद्या परीक्षेंत न उतरणाऱ्या विद्यार्थ्यानें म्हणावें तसाच प्रकार कधीं कधीं आपणांला कवि म्हणवून घेण्याची ज्यांना हांव आहे किंवा आपण कवि आहोंत असा ज्यांना भ्रम झालेला आहे असे कित्येक जण करीत असतात. कालिदासाचा या बाबतींतील दंडक फार योग्य आणि समर्पक आहे.

पुराणमित्येव न साधु सर्वं
न चापि काव्यं नवमित्यवद्यम् ।
संतः परीक्ष्यान्यतरद्भजन्ते
मूढः परप्रत्ययनेयबुद्धिः ॥

केवळ काव्य जुनें आहे म्हणून चांगलें होत नाहीं; आणि नवें आहे म्हणून तें दूषणीय होत नाहीं. सज्जन जे आहेत ते परीक्षा करून त्यांतील उत्तम कोणतें तें ठरवितात. मूर्ख लोक मात्र दुसऱ्यांच्या ( स्वार्थी ) अभिप्रायावर अवलंबून राहतात. तेव्हां कालिदास जुन्याचा अभिमानी नव्हता व निंदकही नव्हता; तसाच तो नव्याचा अभिमानी नव्हता आणि निंदकही नव्हता. येथें प्रश्न जुनें कोणतें आणि नवें कोणतें हा नाहीं; प्रश्न आहे तो उत्तम काव्य आहे का नाहीं हा आहे. आणि उत्तम काव्य असल्यावर त्यानें परीक्षणाला भिण्याचें कारण नाहीं.

हेम्नः संलक्ष्यते ह्यग्नौ विशुद्धिः श्यामिकापि वा

सोन्याची परीक्षा—तें शुद्ध का हिणकस—अग्नीच करतो. वाचकांच्या पिढ्यान् पिढ्या जेव्हां वरचेवर चर्चा करून एकाद्या कवीला उत्तमच म्हणतात तेव्हां त्याच्या कवित्वाबद्दल शंका रहात नाहीं व त्याला प्रथितयश म्हणतात. माझी कृति मी जाहिरातखाच्या जोरावर एक दोन दिवस गाजविली व तेंच मोठ्यांत मोठें यश समजा असा ढोलगें वाजवून आग्रह धरला म्हणजे कांहीं कवित्वाची पदवी प्राप्त होत नसते.

कालिदासासारखा कवि हा शतकानुशतकें आपल्या प्रभावानें तळपत असतो; त्याचें अध्ययन जितकें अधिक करावें तितके त्याचे अर्थकोष आणि सौंदर्यभांडार हीं खुलीं होतात आणि त्याबद्दलचें कौतुक अधिक वाढत जातें. तेव्हां उत्तम काव्या-बद्दलचे जे निकष ठरले आहेत त्याला आपलें काव्य उतरत नाहीं म्हणून ते निकष त्याज्य आहेत असा अट्टाहास करणाऱ्यांचा अहंकार आणि उद्धटपणा मात्र व्यक्त होतो; त्यांच्या कवित्वाबद्दल त्यामुळें प्रत्यय येत नाहीं. महाकवीच्या काव्यांत प्रत्ययाला आलेलीं लक्षणें हींच उत्तम काव्याचीं लक्षणें होतात आणि अशा काव्याचा अभ्यास हेंच तीं लक्षणें समजण्याचें व अंगीं बाणण्याचें साधन आहे. काव्य निर्माण होण्याला काव्यशक्ति म्हणजे प्रतिभा लागते. ही नैसर्गिक असावी लागते; अभ्यासानें कांहीं प्रमाणांत ही साध्य होईल, परंतु

वाचमर्थोनुधावति

वाणीमागून उत्तम अर्थ धावतो आहे असें होण्याला अंगचीच शक्ति पाहिजे. पण केवळ शक्तीनें भागत नाहीं. प्रख्यात अमेरिकन शास्त्रज्ञ व संशोधक प्रोफेसर एडीसन यानें अलौकिक बुद्धिमत्तेची ( Genius ) अशी व्याख्या केली आहे :

Genius is one per cent inspiration and ninetynine per cent perspiration. एक टक्का स्फूर्ति आणि नव्याण्णव टक्के उद्योग म्हणजे अभ्यास मिळून अलौकिक बुद्धिमत्ता होत असते. त्याच अर्थाचें वाक्य मम्मटाच्या सुप्रसिद्ध काव्यप्रकाशांत आहे :—

शक्तिर्निपुणता लोकशास्त्रकाव्याद्यवेक्षणात् ।
काव्यज्ञशिक्षयाभ्यास इति हेतुस्तदुद्भवे ॥

काव्याचा उद्भव होण्याला शक्ति म्हणजे कवित्वबीजरूप संस्कारविशेष हा लागतोच, पण त्याशिवाय निपुणता, म्हणजे अभ्यास करून आलेली योग्यता पाहिजे. त्यांत लोकस्थितीचें ज्ञान, छंदःशास्त्र, व्याकरणशास्त्र, साहित्यशास्त्र इत्यादिकांचें ज्ञान आणि महाकवींच्या काव्यांचा उत्कृष्ट अभ्यास यांचा समावेश होतो. आणि काव्यज्ञ जे आहेत त्यांच्यापासूनही शिक्षण घेतलें पाहिजे. या तीन्ही गोष्टींच्या समवा-यानें काव्य निर्माण होतें; यांतील एखाद्या गोष्टीनेंच भागत नाहीं असें मम्मटाचें स्पष्ट सांगणें आहे; मग यांतील एकाही गोष्टीचा वारासुद्धां ज्यांना लागला नाहीं ते वाऱ्यासारखे बरळूं लागले तर त्यांचें ऐकून कसें चालेल ?

३. कालिदासाजवळ या तीन्ही गोष्टींचा समवाय होता हें उघड आहे आणि त्याची प्रतिभाशक्ति तर लोकोत्तर होती. म्हणूनच एकापेक्षां एक सरस अशी काव्यरचना त्यानें करून ठेविली. पूर्वकवींचा तो गौरवपर उल्लेख करतो;

आपरितोषाद्विदुषां न साधु मन्ये प्रयोगविज्ञानम् ।

असें म्हणून विद्वान् म्हणजे मर्मज्ञ लोकांबद्दल तो आपला आदर व्यक्त करतो. तसें करतांना त्याला आपल्या काव्यगुणांचा विश्वास आहे; पण तो विश्वास कितीही बळकट असला तरी शहाण्यांनीं शहाणें म्हणावें अशी त्याची इच्छा आहे. आतां-पर्यंत केवळ काव्यदृष्टीनें कालिदासाच्या कवितेंतील आनंद रसिकांनीं लुटला. आतां शिवेतरक्षति व्हावी—जें कल्याणदायक नाहीं तें नाहींसें व्हावें—या दृष्टीनें या महाकवीचें निरीक्षण करण्याची वेळ आली आहे आणि कल्याणप्राप्ति करून देण्याचें सामर्थ्यही या महाकवींत विपुल आहे. या भरतखंडाचा आगामि काळ उज्ज्वळ होण्याचा त्याच्या काव्यगंगेंत मज्जन करून तेथून स्फूर्ति संपादन करणें हाही एक उपाय आहे. त्याचें हिमालयवर्णन वाचलें म्हणजे या आपल्या देशाचें स्मरण होऊन त्याच्या सौंदर्याबद्दल आपला अभिमान जागृत होतो आणि आगरकरांच्या भाषेंत बोलावयाचें म्हणजे जगांतील एक उत्तम देश आपल्या वांटणीला आल्याबद्दल धन्यता वाटते. आपल्या प्राचीन इतिहासाचा संस्कार कालिदासाच्या वाणीवर सर्वत्र दिसून येतो. उपनिषदें आणि रामायण-महाभारत यांच्या कथांचा आणि विचारांचा ठसा त्याच्या काव्यांत वरचे-वर प्रचीतीला येतो. त्याच्या ग्रंथांचें ससंदर्भ अध्ययन करावयाचें म्हणजे लोक-शास्त्रकाव्याद्यवेक्षण करावेंच लागतें आणि त्यांत जें कांहीं उत्तम आहे, चिरंतन आहे, ध्येयरूप आहे, स्फूर्तिदायक आणि उदात्त आहे त्यांचें वर्णन तो इतक्या हृदयंगम प्रकारानें करतो कीं आपणाला न कळत त्यांतील अंतरंग आपल्या अंतःकरणांत शिरतें. अशाच कवीला राष्ट्रीय कवि म्हणतात. तो राष्ट्राबद्दल, संस्कृतीबद्दल प्रेम व सदभिमान उत्पन्न करतो. कालिदास केवळ महाकवि होता असें नाहीं, तर तो आर्यसंस्कृतीचाही महाकवि आहे; अलीकडच्या भाषेंत बोलावयाचें म्हणजे तो आमचा राष्ट्रीय महाकवि आहे. आमच्या राष्ट्राचें, इतिहासाचें, संस्कृतीचें उज्ज्वल स्वरूप तो आम्हांला स्पष्ट करून दाखवितो आणि हें सर्व उत्तम कवींच्या मार्गानें तो करतो—म्हणजे हें त्यानें केलें आहे हें आपणाला न कळतां त्याचा

परिणाम मात्र सुज्ञ आणि रसिक वाचकांवर होतो. हेतु हा काव्यांत वाच्य असूं नये पण तो ध्वनिरूप असतोच व ध्वनिरूपता जितकी रमणीय तितकी काव्याची पायरी वरची. कालिदासाच्या काव्याची पायरी फार वरची आहे याबद्दल सुज्ञ पंडितांत, काव्यमर्मज्ञ रसिकांत एकवाक्यता आहे. त्याच्या कवितेचे निनाद आज दोन हजार वर्षें आसेतुहिमाचल निघताहेत आणि त्याच्या काव्यानंदानें तृप्त होऊन त्याला सर्वत्र धन्यवाद मिळत आले आहेत. त्याच्या शब्दरचनेंतील अद्भुत माधुर्य हें जरी भाषांतरातीत आहे तरी त्याच्या अर्थगौरवानें आपल्या पराक्रमाचा झेंडा सातासमुद्रापलीकडेही उभविलेला आहे. जगांतील उत्तमोत्तम कवींत कालिदासाचें स्थान उन्नत आहे हा सिद्धांत आतां सर्वत्र मान्य झालेला आहे. कवीचे शब्द ही एक रत्नभांडार उघडण्याची किल्ली आहे. त्या किल्लीच्या साहाय्यानें त्या कवींचीं अपूर्व अर्थभांडारें, सौंदर्यभांडारें, रसभांडारें, पहावयास मिळतात, लुटावयास सांपडतात. कवींची काव्यसंपत्ति हें राष्ट्राचें अद्भुत धन आहे. परक्यांनीं तें कितीही लुटलें तरी स्वदेशांत तें आहे तसें आणि आहे तितकें रहातें; कमी पडत नाहीं. म्हणून तर शेक्सपीयर-विषयीं बोलतांना कार्लाईल म्हणाला—"शेक्सपीयर जाऊं द्या का हिंदुस्थानांतील ब्रिटिश साम्राज्य जाऊं द्या? साम्राज्याची पर्वा कोण करतो? तें गेलें तरी बेहेत्तर, पण आमचा शेक्सपीयर मात्र आम्ही जाऊं देणार नाहीं!" आणि जरी आमचें साम्राज्य गेलें असलें तरी आम्ही अद्यापि कालिदासासारख्यांच्या बळावर जगांत छाती वर काढून चालूं शकूं!

४. ग्रंथाचा शेवट करतांना ज्या महाकवीच्या काव्यानंदाची स्वतःला झालेली प्रचीती वाचकांना कळविण्यासाठीं हा प्रयत्न केला त्याच्याच काव्यमय वाणीचा आशीर्वाद घेणें उचित होईल. शाकुंतलाच्या शेवटीं हा आशीर्वाद आहे:

प्रवर्ततां प्रकृतिहिताय पार्थिवः
सरस्वती श्रुतमहतां महीयसाम्।
ममापि च क्षपयतु नीललोहितः
पुनर्भवं परिगतशक्तिरात्मभूः॥

लेखनसमाप्ति—
गुरुवार, आश्विन वद्य २ शके १८५९
ता. २१ ऑक्टोबर १९३७